इत्यादि वेदपरत्वें भिन्न भिन्न आहेत. त्यांचा स्मृतीमध्येंच अंतर्भाव होतो[1]. त्याप्रमाणेंच महाभारत व पुराणें यांचाही स्मृतीमध्येंच समावेश होतो[2].

धर्म समजण्याचें तिसरें साधन सदाचार ( शिष्टांचा आचार ) होय[3]. हा देशपरत्वें भिन्नभिन्न असतो[4]. शिष्टाचारप्राप्त कांहीं विधि, उपनयन व विवाह इत्यादि प्रसंगीं करावयाचे असतात.

हल्लीं ज्यास धर्मशास्त्र असें म्हणतात त्यांत श्रौतकर्मांचें ( यज्ञ कर्मांचें ) विवेचन ( शास्त्रार्थ प्रयोग इत्यादि ) येत नसून मुख्यत्वें करून खालील विषयांचें विवेचन येतें.

| | | | |
|---|---|---|---|
| १ संस्कार | ४ श्राद्ध | ७ प्रतिष्ठा | १० शांति |
| २ आचार | ५ दान | ८ प्रायश्चित्त | ११ व्यवहार (विवाद निर्णय.) |
| ३ कालनिर्णय | ६ उत्सर्ग | ९ शुद्धि | १२ व्रतें |

वेदांचा अर्थ प्रायः गूढ असल्यामुळें व त्यांत सदरहू विषयांपैकीं फक्त कांहीं विषयांचा मात्र प्रसंगोपात्त त्रोटक उल्लेख असल्यामुळें त्यांपासून धर्माचें संपूर्ण ज्ञान होणें शक्य नाहीं, याकरितां धर्माचा निर्णय स्मृति व सदाचार, यांवरूनच केला पाहिजे; त्यांपैकीं स्मृतिग्रंथांत कित्येक विषयांची न्यूनता[5] व कित्येक विषयांच्या संबंधानें परस्पर विरोध[6], असें असल्यामुळें, तसेंच आचारही देशानुसार भिन्नभिन्न होत असल्यामुळें त्यात्या विरोधांची विषयभेदानें वगैरे व्यवस्था करून धर्माचा निर्णय करण्याचें काम मीमांसादि शास्त्रांचें ज्ञान नसणाऱ्या सामान्य मनुष्यांच्या बुद्धीस अशक्य आहे. यासाठीं धर्माचें रहस्य जाणणाऱ्या विद्वान् लोकांनीं त्या संबंधानें

---

१ ‘ गृह्याणि स्मृतिरूपाण्येव ’ ( आचाराध्यायावरील वीरमित्रोदयाची टीका.

२ इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत् । बिभेत्यल्पश्रुताद्वेदो मामयं प्रतरिष्यति ॥ ( महाभारत ) । श्रीमन्मध्वाचार्य व शङ्कराचार्य यांनीं व्याससूत्राच्या आपापल्या भाष्यांत महाभारतान्तर्गत भगवद्गीतेचा स्मृतिशब्दानें पुष्कळ ठिकाणीं उल्लेख केला आहे. ।

३ आचारप्रभवो धर्मः ( विष्णुसहस्रनाम ) ।

४ अथ खलु उच्चावचा जनपदधर्मा ग्रामधर्माश्च तान्विवाहे प्रतीयादिति सूत्रतः पदार्थस्वरूपे इव तत्क्रमेऽपि समत्वाद्देशाचारप्रामाण्यस्य ( प्रयोगरत्न ).

५ आसां ( स्मृतीनां ) परस्परनिरपेक्षत्वेऽपि साकाङ्क्षाणां परिपूरणमन्यतः क्रियते । ( मिताक्षरा )

६ तर्कोऽप्रतिष्ठः श्रुतयो विभिन्ना नैको ऋषिर्यस्य वचः प्रमाणम् । धर्मस्य तत्वं निहितं गुहायां महाजनो येन गतः स पन्थाः ॥ ( महाभारत वनपर्व )

केलेला निर्णयच सर्वांनीं मानिला पाहिजे. अशा तऱ्हेनें विद्वान् लोकांनीं केलेल्या ग्रंथास ' **निबंध** ' असें म्हणण्याची रूढी आहे.

असे निबंधग्रंथ बरेच आहेत, त्यांपैकीं सर्वांत जुना निबंध हेमाद्रीनें केलेला **'चतुर्वर्गचिंतामणि'** हा होय. त्या नंतर पराशरमाधव, कालमाधव, मदनरत्न, धर्मवृत्ति, प्रयोगरत्न, निर्णयसिंधु, मयूख (बारा), संस्कारकौस्तुभ, स्मृतिकौस्तुभ, संस्काररत्नमाधा, धर्मसिंधु, इत्यादि ग्रंथ धर्मशास्त्रावर झाले आहेत. यांपैकीं चतुर्वर्गचिंतामणि व मयूख, या ग्रंथांत धर्मशास्त्रांतील सर्व विषयांचें विवेचन असून बाकीच्या ग्रंथांत कांहीं विवक्षित विषयांचेंच विवेचन आहे. प्रस्तुतच्या संस्कारकौस्तुभग्रंथांत षोडश संस्कारां-संबंधानेंच विवेचन केलें आहे.

' संस्कार ' शब्द ' घञ् ' प्रत्ययान्त असून त्याचा अर्थ शुद्ध करणें असा आहे. गर्भाधानादि संस्कारांपासून शरीरशुद्धि होते व ती झाल्यानें मनाची शुद्धि होते, त्या नंतर निष्कामकर्मांचें आचरण होऊन, श्रवण, मनन व निदिध्यासन, यांच्या द्वारें मोक्षाची प्राप्ति होते[४], म्हणून संस्कार हे परंपरेनें मोक्षप्राप्तीस कारणीभूत आहेत. हे संस्कार गौतमानें अठ्ठेचाळीस व अंगिरानें पंचवीस सांगितले आहेत. ते खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| १ गर्भाधान | २ पुंसवन | ३ सीमंतोन्नयन | ४ विष्णुबली |
| ५ जातकर्म | ६ नामकर्म | ७ निष्क्रमण | ८ अन्नप्राशन |
| ९ चौल | १० उपनयन | ११ महानाम्नीव्रत | १२ महाव्रत |

---

१ ईसवी सन १२१२ च्या सुमारास देवगिरीचा राजा ' **रामदेवराव यादव** ' याचे पदरीं ' **हेमाद्री** ' हा पंडित होता. याज्ञवल्क्यस्मृतीवरील सुप्रसिद्ध टीका मिताक्षरा इचा कर्ता विज्ञानेश्वर हा हेमाद्रीच्या पूर्वीचा आहे. मिताक्षराटीकेसही कित्येक ठिकाणीं ' निबंध ' असें म्हणण्यात येतें.

२ हा प्रचंड ग्रंथ समग्र छापला नसून त्यांतील ' व्रतखंड ' वगैरे काहीं भाग मात्र कलकत्याकडे छापले आहेत.

३ याच ग्रंथांतील प्रथम श्लोक पहा.

४ आत्मा वारे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः ( वृहदारण्यकोपनिषत् )

५ ते येणेंप्रमाणें:—१ गर्भाधान. २ पुंसवन. ३ सीमंतोन्नयन. ४ जातकर्म. ५ नामकर्म. ६ अन्नप्राशन ७ चौल. ८ उपनयन. ९ ते १२ चार वेदव्रतें. १३ समावर्तन. १४ विवाह. १५ ते १९ पंचमहायज्ञ. २०-२६ सात पाकसंस्था. २७-३३ सात हविर्यज्ञ संस्था. ३४-४० सात यागसंस्था. ४१-४८ आत्मगुण आठ.

१३ उपनिषद्व्रत १४ गोदानव्रत १५ समावर्तन १६ विवाह
१७ आग्रयण १८ अष्टका १९ श्रवणाकर्म २० आश्वयुजीकर्म
२१ प्रत्यवरोहण २२ स्थालीपाक २३ उत्सर्जन २४ उपाकर्म
२५ पंचमहायज्ञ

या पंचवीस संस्कारांमध्यें, १ नैमित्तिक, २ वार्षिक, ३ मासिक, व ४ नित्य, असे चार भेद आहेत. त्यांत गर्भाधानापासून विवाहान्त सोळा संस्कार, हे नैमित्तिक होत. स्थालीपाक खेरीजकरून आग्रयणापासून उपाकर्मान्त सात संस्कार हे वार्षिक. स्थालीपाक हा मासिक व पंचमहायज्ञ हा नित्य, असें आश्वलायनानें सांगितलें आहे. या पंचवीस संस्कारांपैकीं नैमित्तिक म्हणून सांगितलेले गर्भाधानापासून विवाहान्त जे सोळा संस्कार तेवढ्यांचेंच या संस्कारकौस्तुभग्रंथांत विवेचन केलें आहे. मात्र विष्णुबलि संस्काराच्या ऐवजीं या ग्रंथांत 'अनवलोभन' हा संस्कार घेऊन सोळा या संख्येशीं मेळ घातला आहे. यावरून विवाहान्त १५ संस्कार व सोळावा अन्त्यसंस्कार अशी कित्येकांची समजूत आहे ती चुकीची आहे हें कोणासही कळून येईल. या ग्रंथांत प्रथम संस्कारांचें नांव त्यानंतर त्यासंबंधाचा शास्त्रार्थ व शेवटीं त्यांचा प्रयोग अशा तऱ्हेनें विषयांची मांडणी केलेली आहे शास्त्रार्थ व प्रयोग, नुसत्या सोळा संस्कारांसंबंधाचेच नसून त्या त्या संस्कारांच्या अंगभूत जीं जीं कर्में त्यांचेही आहेत ते या ग्रंथाच्या आरंभीं अनुक्रमणिका दिली आहे त्यावरून कळतील. अंगभूत असलेल्या अवांतर कर्मांसह विवाहान्त सोळा संस्कार सांगितल्यानंतर शेवटीं स्थालीपाक व पिण्डपितृयज्ञ असे दोन संस्कार कित्येक पुस्तकांत सांगितले आहेत, परंतु ते प्रक्षिप्त आहेत असें, ग्रंथकारानें आरंभीं ' अथ षोडशसंस्काराः ' ( आतां सोळा संस्कार सांगतों. ) अशी प्रतिज्ञा करून ग्रंथास आरंभ केला आहे, त्यावरून दिसून येतें. आम्ही पाठभेद पाहण्याकरितां पुस्तकें जमविलीं होतीं त्यांपैकीं ( च ) नांवाचें वे. रा. रा लक्ष्मणाचार्य कालगांवकर यांचेकडील पुस्तक व ( ज ) नांवाचें वै. वा. कांताचार्य पंडितराव यांचेकडील पुस्तक, या दोन पुस्तकांत विवाहहोमसमाप्तीपर्यंतच ग्रंथ आहे, यावरूनही आम्हीं वर केलेल्या विधानास बळकटी येते.

या ग्रंथांत सांगितलेले सोळा संस्कार हे प्रत्येकांस आवश्यक आहेत, असें जरी मानण्यांत येतें तरी त्यांपैकीं गर्भाधान, उपनयन, समावर्तन व विवाह, एवढे मात्र संस्कार करण्याचा हलीं प्रचार आहे. बाकीच्या संस्कारांसंबंधानें बहुतेक प्रायश्चित्तावरच भागविलें जातें. यावरून आपणास धर्माभिमानी म्हणविणाऱ्या लोकांचीही धर्मा-

संबंधानें किती अनास्था होत चालली आहे याची कल्पना सहज करितां येण्यासारखी आहे. अशा तऱ्हेनें अनास्था होऊं लागल्यामुळें हीं कर्में चालविणारे भिक्षुक लोक यांना लोकांकडून मिळत असलेला आश्रय कमी झाला व त्यामुळें पूर्वीप्रमाणें याज्ञिककर्म करणारे व त्यांतील विषयासंबंधानें कोणी प्रश्न विचारल्यास त्यांस समर्पक उत्तर देणारे असे याज्ञिक अलीकडे क्वचितच आढळण्यांत येतात. बहुतेक याज्ञिकांना प्रयोग-ग्रंथांत असलेल्या संस्कृतपङ्क्तींचा अर्थ न कळल्यामुळें कोणकोणत्या मंत्रानें काय काय करावें हें कळण्यास अडचण पडते, तेव्हां अशा लोकांस आम्हीं केलेल्या या भाषांतरापासून बराच उपयोग होईल यांत शंका नाहीं.

या ग्रंथाचा कर्ता '**अनंतदेव**' हा गोदावरीच्या तीरीं (पैठणांत ?) रहाणारा ऋग्वेदी ब्राह्मण होता. म्हणून या ग्रंथांत वरील सोळा संस्कारांसंबंधानें प्रथम शास्त्रार्थ सांगून नंतर जे प्रयोग सांगितले आहेत त्यांत प्रथम ऋग्वेदीब्राम्हणांसंबंधानेंच प्रयोग दिले आहेत. त्या नंतर क्वचित् स्थळीं इतरांच्या संबंधाचे प्रयोग आहेत. हा ग्रंथकार मोठा मीमांसक होता असें या ग्रंथांतील अनेक उल्लेखांवरून व विशेषतः दत्तकप्रकरणावरून दिसून येतें. याच ग्रंथकारानें '**स्मृतिकौस्तुभ**' नांवाचा दुसरा एक ग्रंथ केला आहे, त्यांत यानीं आपल्या पूर्वजांविषयीं व आश्रयदात्याविषयीं माहिती दिली आहे. त्यावरून पहातां, याच्या बापाचें नांव '**आपदेव**' असें होतें. '**मीमांसान्यायप्रकाश**' किंवा '**आपदेवी**' नांवाचा मीमांसाशास्त्रावर संक्षिप्तग्रंथ प्रसिद्ध आहे त्याचा कर्ता हाच '**आपदेव**' होय. या आपदेवाच्या बापाचें नांवही **अनंतदेवच** होतें. यावरून मुलास आज्याचें नांव ठेवलें होतें हें स्पष्ट होतें. ही चाल महाराष्ट्रांत प्रचलित आहे. आपदेवास हा पुत्र झाला त्यावेळीं त्याचा बाप वारला होता, कारण वडील जिवंत असल्यास त्याचें नांव मुलास ठेवीत नाहींत. आपदेवाच्या आज्याचें नांवही **आपदेवच** होतें व पणज्याचें नांव '**एकनाथ**' असें होतें. हे सर्व गोदावरीच्या कांठीं रहात होते. इतकी स्पष्ट माहिती मिळते. प्रस्तुतग्रंथाचा कर्ता '**अनंतदेव**' यास '**जीवदेव**' नांवाचा एक धाकटा भाऊ होता, असें याच ग्रंथांतील पृ. ६३७ मध्यें "**अथ गोत्रप्रवर निर्णयो मदनुजजीवदेवकृत एवास्मिन्नवसरे प्रदर्श्यते**" (आतां गोत्रें व प्रवर यांचा निर्णय माझा धाकटा भाऊ जीवदेव यानें केला आहे, तोच येथें सांगतों.) असें लिहिलें आहे त्यावरून सिद्ध होतें. स्मृतिकौस्तुभांतील माहितीवरून गोदावरीच्या कांठीं यांचें वास्तव्य होतें, असें दिसतें, तथापि हे त्याच्या मूळघराण्याचें

ठिकाण असावें, कारण अनंतदेव यांनीं '**बाजबहादुरचंद्र**' याच्या आज्ञेनें स्मृतिकौस्तुभग्रंथ तयार केल्याचें त्याच ग्रंथाच्या आरंभीं लिहिलें आहे. त्यावरून हा ग्रंथ करतेवेळीं हा उत्तरहिंदुस्थानांत **आल्मोरा** किंवा **नैनीताल** येथें असावा असें दिसतें.

'**बाजबहादुर**' या नांवानें प्रसिद्ध राजा म्हणजे माळव्यांत मांडू किंवा मांडवगड येथें होऊन गेला, परंतु हा मुसलमान असल्यामुळें अनंतदेव ज्या बाजबहादुराच्या आश्रयास होता तो हा नसला पाहिजे, कारण अनंतदेवानें आपल्या आश्रयदात्याचें जें वर्णन केलें आहे, त्या वर्णनावरून तो हिंदु होता असें दिसतें. तेव्हां असें दुसरें नांव कोठें मिळतें याबद्दल शोध करितां इंपिरियल ग्याझेटियर मधून जी माहिती मिळाली ती पुढें दिली आहे.

" हिमालयानजीक **नैनीताल** व **आल्मोरा** या प्रांतांत प्राचीनकाळीं चांद किंवा चन्द्र नांवाच्या वंशाचे राजे होते. हे आपणांस चन्द्रवंशीयराजे म्हणत, व भारतांतील पुरुषांशीं आपला बंधुत्वाचा संबंध जोडीत. या प्रांतामधील पुष्कळ स्थानांशींही महाभारताच्या नांवांचा संबंध आजपावेतों जोडिला जातो.

या वंशांतील मूळ पुरुष **सोमचन्द्र** हा अलहाबाद नजीक झुशी या ठिकाणाहून येऊन सुमारें दहाव्या शतकांत कालीकुमायुन प्रांतांतील चंपावत या स्थानीं आपलें राज्य स्थापिता झाला. ईसवी सन १५६३ सालीं आसपासच्या राजेरजवाड्यांवर चांदराजांचें वर्चस्व स्थापित झालें व यावेळीं या वंशांतील राजा '**कल्याणचन्द्र**' यानें **आल्मोरा** येथें आपली राजधानी केली. याचा मुलगा '**रुद्रचन्द्र**' हा अकबर बादशाहाचा समकालीन असून त्यावेळीं म्हणजे ईसवी सन १५८७ मध्यें लाहोरास जाऊन यानें बादशाहाचा अधिकार कबूल केला. मुसलमानी इतिहासकारांच्या लिहिण्यावरून असें कळतें कीं ईसवी सनाच्या चवदाव्या शतकांत **ग्यानचंद** ( ज्ञानचंद्र ) नांवाच्या या वंशांतील राजानें दिल्लीस जाऊन तेथील सुलतानापासून भाबर व तराई प्रांत, या मुलखाची थेट गंगानदीपर्यंत सनद मिळविली व सन १४८८ पासून ते १५०३ पर्यंत **किरतिचन्द** ( कीर्तिचंद्र ) यानें नैनीतालप्रांतांवर वर्चस्व स्थापन करून तो या सर्व प्रांताचा पहिला राजा झाला. पुढें दिल्लीस मोंगलाई अंमल सुरू झाला त्या वेळीं मुसलमान अधिकाऱ्यांना या पर्वतप्रांतातील संपत्तीसंबंधी कांहीं विलक्षण कल्पना असल्यामुळें त्यांनीं या प्रांतावर स्वारी केली व कांहीं मैदानांतील प्रांतही काबीज

केला, तथापि पर्वतांतील भागांत मुसलमानाचा पगडा बसला नाहीं, व हा प्रांत चांद वंशांतील राजाकडेच राहिला. पुढें ईसवी सन १६३८ पासून १६७८ पर्यंत **बाजबहादुर** हा राज्य करीत असतां त्यानें दिल्लीस जाऊन बादशाहाची भेट घेऊन सख्य केलें. सन १६५५ मध्यें गारवालच्या विरुद्ध मोंगलसैन्य गेलें त्या वेळीं हा स्वतः त्यास मदत करण्यास जाऊन त्यानें तराई प्रांत पुनः आपल्या अधिकाराखालीं आणिला. सन १६७५ मध्यें यानें आपल्या राज्यांत डोईपटी बसवून तीरकमखंडणी म्हणून दिल्लीच्या बादशाहास देऊं लागला." या एकंदर हकीगतीवरून हाच बाजबहादुर अनंतदेवाचा आश्रयदाता असावा अशी खातरी वाटते, कारण स्मृतिकौस्तुभ-ग्रंथांत बाजबहादुरचंद्र याची वंशावळी दिली आहे ती:—

| स्मृतिकौस्तुभ | | ग्याझेटियर मधील राजे. | |
|---|---|---|---|
| ज्ञानचंद्र | १४ वें शतक | सोमचंद्र | १० वे शतक. |
| कल्याणचंद्र | १५६३ | किरतिचंद (कीर्तिचंद्र) | १४८८ ते १५०३ |
| रुद्रचंद्र | १५८७ | ज्ञानचंद्र | १४ वे शतक |
| लक्ष्मणचंद्र | १५८७ ते १६३८ | कल्याणचंद्र | १५६३ |
| त्रिमल्लचंद्र | | रुद्रचंद्र | १५८७ |
| नीलचंद्र | | बाजबहादुरचंद्र | १६३८ ते १६७८ |
| बाजबहादुरचंद्र | १६३८ ते १६७८ | | |

याप्रमाणें आहे. वर दिलेल्या ग्याझेटियरमधील माहितींत कौस्तुभाच्या वंशावळीपैकीं ज्ञानचंद्र, कल्याणचंद्र, रुद्रचंद्र व बाजबहादुरचंद्र इतकीं नांवें संगतवार दिसतात. ग्याझे-टियरमध्यें सांगितलेला सोमचंद्र हा यांचा पूर्वज असावा, वरील वंशावळींत जे सनांचें आंकडे दिले आहेत ते ग्याझेटियर मधून घेतलेले आहेत त्या आंकड्यांवरून विचार करितां वंशावळींतील ज्ञानचंद्र हा ग्याझेटियर मधील कीर्तिचंद्रानंतरचा त्याचा मुलगा किंवा नातू असावा कारण, स्मृतिकौस्तुभांतील वंशावळींत कल्याणचंद्राचा बाप ज्ञानचंद्र, असें लिहिलें असल्यामुळें तो कल्याणचंद्राच्या कालाच्या ( १५६३ ) पूर्वीचा असला पाहिजे, तेव्हां तो कीर्तिचंद्र व कल्याणचंद्र यांच्या कालामध्यें जे ६० वर्षांचे अंतर आहे त्यावेळांत तो असावयास पाहिजे. ग्याझेटियरमधील चवदाव्या शतकांतील ज्ञानचंद्र हा कीर्तिचंद्राचा पूर्वज असावा. याप्रमाणें मानिलें म्हणजे ग्याझेटियर मधील माहिती व स्मृतिकौस्तुभांतील वर्णन यांचा बरोबर मेळ बसतो. रुद्रचंद्राचा काल व

बाजबहादुरचंद्र याचा काल यामध्यें ५१ वर्षांचें अंतर आहे, तितक्या अवधींत लक्ष्मणचंद्र, त्रिमल्लचंद्र व नीलचंद्र, हे राजे झाले असावे. असें मानलें म्हणजे कोणतीही अडचण येत नाहीं. या माहितीप्रमाणें बाजबहादुरचंद्र याचा काल १६३८ पासून १६७८ पर्यंत असल्यामुळें त्याच्या आज्ञेनें ग्रंथ करणारा अनंतदेव यानें १६३८ नंतर व १६७८ च्या पूर्वीं हा ग्रंथ केला असें सिद्ध होतें.

आम्हीं जी ही माहिती दिली आहे त्याचा योग्य विचार केल्यास आमचे मित्र रा. रा. **गोविंद सखाराम सरदेसाई** बी. ए. व रा. रा. **मंगेश कमलाकर नाडकर्णी** बी. ए. एल्. एल्. बी. यांनीं थोड्या दिवसापूर्वीं '**विवाहविधिसार**' या नांवाचें एक पुस्तक केलें आहे त्याच्या प्रस्तावनेंत संस्कारकौस्तुभग्रंथाचा कर्ता अनंतदेव याचा काल १९५० असल्याचें जें लिहिलें आहे तें चुकीचें आहे असें कोणासही वाटल्या-वांचून राहणार नाहीं.

हें पुस्तक छापतांना हल्लींचे विद्याधिकारी मे रा. रा. मसाणीसाहेब व त्यांचे प्रतिनिधि यांनीं योग्य त्या सवलती देऊन छापण्याचें काम पुरें करून घेतलें याबद्दल आम्हीं त्यांचे फार आभारी आहों.

मुंबई वगैरे ठिकाणच्या सारखे मराठी व संस्कृत कामें करणारे कंपाझिटर लोक येथें मिळत नसूनही लक्ष्मीविलासप्रेसचे मॅनेजर रा. पटेल छोटालाल लालभाई यांनीं आपल्या प्रेसमध्येंच हें काम शेवटास नेलें याबद्दल त्यांचेही, आम्हीं आभारी आहों.

अखेरीस ज्यांच्या प्रेरणेनें व महनीय आश्रयानें हें भाषांतर तयार होऊन छापण्यांत आलें ते **श्रीमंत सरकार सयाजीराव महाराज गायकवाड** यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानून ही प्रस्तावना पुरी करितों.

बडोदें.
ता. १० माहे जुलाई सन १९१४

भाषांतर करणार,
**वेंकटाचार्य गजेंद्रगडकर.**
शास्त्री बडोदा कॉलेज

## मूळप्रत शुद्ध करण्याकरितां मिळविलेल्या पुस्तकांचें वर्णन.

( क ) सातारा येथील वे. रा. रा. श्रीधरभट्ट माटे यांच्या संग्रहातील पुस्तक. हें पुस्तक शके १७८४ सालीं लिहिलेलें आहे. यांत अष्टकान्वष्टकाश्राद्धाच्या प्रयोगाच्या समाप्तीपर्यंत ग्रंथ आहे.

( ख ) सातारा येथील वे. शा. सं. रा. रा. बाळाचार्य गजेंद्रगडकर यांच्या संग्रहांतील पुस्तक. यांत दर्शस्थालीपाक समाप्त होऊन नंतर व्यतिषङ्गप्रयोग सांगितला आहे. या पुस्तकावर ग्रंथ कधीं लिहिला त्याची मिति नाहीं.

( ग ) संगममाहुली येथील वे. रा. रा. राजारामभट्ट गोडबोले यांनीं वे रा. तांबे शास्त्री यांच्या संग्रहांतील पुस्तक दिलें, तें चांगलें शुद्ध असून त्यांत अन्वष्टका–श्राद्धाच्या समाप्तीपर्यंत ग्रंथ आहे. सदर पुस्तक शके १७४५ सालीं लिहिलें आहे.

( घ ) श्रीक्षेत्र काशी येथील वे. शा. सं. रा. रा. वीरेश्वरशास्त्री द्रवीड यांनीं खरेदी करून पाठविलें तें. यांत दर्शस्थालीपाकाच्या समाप्तीपर्यंत ग्रंथ आहे. या पुस्तकावर मिति घातली नाहीं.

( ङ ) बडोदें येथील वे. रा. रा. पांडुरंगभट्ट गुरुजी यांचे संग्रहांतील पुस्तक. हें पुस्तक शुद्ध व सुवाच्य असून यांत अन्वष्टका श्राद्धाच्या प्रयोगा पर्यंत ग्रंथ आहे. सदरहू पुस्तक शके १७२८ सालीं लिहिलें आहे.

( च ) वे. शा. सं. रा. रा. लक्ष्मणाचार्य कालगांवकर यांनीं सावंतवाडीहून पाठविलेलें पुस्तक. सदर पुस्तकांत विवाहहोमसमाप्तीपर्यंत ग्रंथ आहे. सदर पुस्तक सामान्य शुद्ध असून त्यावर मिति नाहीं.

( छ ) मुंबई येथें रा. रा. काशीनाथ वासुदेव खांडेकर यांनीं जगदीश्वर छापखान्यांत शके १८०४ सालीं छापलेलें हें फार अशुद्ध आहे.

( ज ) कोल्हापुर येथील वे. रा. रा. कांताचार्य पंडितराव यांचे संग्रहांतील. यांत विवाहहोमसमाप्तीपर्यंत ग्रंथ असून त्यावर मिति नाहीं.

( झ ) मिरज येथील वे. रा. रा. गणेशशास्त्री कोडोलीकर वकील यांच्या संग्रहांतील. सदर पुस्तक प्रायः शुद्ध असून त्यांत दर्शस्थालीपाकसमाप्तीपर्यंत ग्रंथ आहे.

( ञ ) वाई येथील वे. शा. सं. रा. रा. बाळकृष्णाचार्य रड्डी यांनीं पाठविलेलें. सदरहू पुस्तक फारच शुद्ध असल्यामुळें त्याची आम्हांस फारच मदत झाली सदर पुस्तकांत दर्शस्थालीपाकाच्या समाप्तीपर्यंत ग्रंथ आहे.

ज्या सद्गृहस्थांनीं पाठभेद पहाण्यांकरितां वर लिहिलेलीं पुस्तकें आम्हांस दिलीं त्यांचे आम्हांवर फार उपकार आहेत.

---

संस्कारकौस्तुभग्रंथाच्या भाषांतरासंबंधानें

# सूचना.



सदरहू भाषांतर होतां होईल तितकें मूळ ग्रंथास धरून मराठीभाषेंत सुबोध अशा रीतीनें केलें आहे. तथापि यांतील विषय कठीण असल्यामुळें जीं स्थळें समजण्यास कठीण अशीं वाटलीं त्यांवर व पूर्वमीमांसेतील अधिकरणांचा जेथें जेथें उल्लेख आला आहे त्यांवर खुलासा होण्याकरितां सविस्तर टीपा दिल्या आहेत. तसेंच पूर्वमीमांसा, धर्मशास्त्र, ज्योतिष व याज्ञिक यांतील जे पारिभाषिक शब्द आहेत ते तसेंच ठेवणें भाग पडलें, त्या शब्दांचाही वर्णानुक्रमानें शेवटीं एक कोश दिला आहे. सदरहू कोशांतील शब्दांचा या ग्रंथांत उपयोगी पडणारा इतकाच मात्र अर्थ दिला आहे. जेथें मुळांतील अर्थाची परिपूर्ति होण्याकरितां कांहीं नवीन शब्द घालणें भाग पडलें, त्या ठिकाणीं [ ] अशा चतुष्कोणी कंसांत ते शब्द घातले आहेत व भाषांतरांतील शब्दांच्या अर्थाचा वगैरे खुलासा होण्याकरितां ( ) असा कंस करून त्यांत अर्थाचा खुलासा केला आहे. सदरहू मूळग्रंथाची छापील प्रत फार अशुद्ध होती ती निरनिराळ्या ठिकाणच्या अनेक प्रतींवरून मोठ्या प्रयत्नानें शुद्ध करून मग भाषांतर केलें आहे भाषांतराच्या कामीं आमचे मित्र वे. शा सं रा. रा. लक्ष्मणाचार्य कालगांवकर यांनीं आम्हांस पुष्कळ मदत केली याबद्दल आम्हीं त्यांचे आभारी आहों.

वेंकटाचार्य.

॥ श्रीलक्ष्मीनृसिंहो विजयते ॥

## मराठीभाषांतरासह संस्कारकौस्तुभाची

# अनुक्रमणिका.



पृष्ठ.

पृष्ठ.

पृष्ठ.

पृष्ठ.

पृष्ठ.

पृष्ठ.

पृष्ठ.

पृष्ठ.

पृष्ठ.

श्री.

# संस्कारकौस्तुभ, मराठीभाषांतरासहित.

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुचरणारविन्दाभ्यां नमः ।
श्रीलक्ष्मीनृसिंहाभ्यां नमः ।

**अथ संस्कारकौस्तुभप्रारम्भः । गर्भाधानप्रभृतिविहितानेकसंस्कारशुद्धे चित्तादर्शेसकलमुनयो यं प्रपश्यन्ति देवम् ॥ चन्द्रादित्याऽनलभताडितां भाप्रवाहे निदानं वन्दे वेदैः शिरसि निहितं पालकं पाण्डवानाम् ॥ १ ॥ नत्वा हरिगुरुचरणौ वादिरणौघे जयप्रदं विदुषाम् ॥ मधुनाशनमोदावहमधुना संस्कार-कौस्तुभं तनुमः ॥ २ ॥**

श्रीमन्नारायणं नत्वा सच्चिदानन्दविग्रहम् ॥
संस्कारकौस्तुभव्याख्यां महाराष्ट्रीं समारभे ॥ १ ॥
न्यायव्याकरणार्णवर्णतरणीं निःशंक जो राघव
वेदान्तादिमतातिदुर्गममहाकान्तारकण्ठीरव ॥
त्या धर्मज्ञ दयालु पूज्य गुरुतें भावें **अनन्ताव्हया**
आधीं वंदुनि **वेंकटेश** करितो ग्रंथास आरंभ या ॥ २ ॥
श्रीमद्गायकवाडवंशविभवप्रख्यातसन्मौक्तिकें
विद्यावृद्धिपरें **सयाजिनृवरें** आज्ञापिलें कौतुकें
यत्नें यास्तव कौस्तुभार्थ रचितों भाषेंत देशाचिया
ज्ञाता यास हि कौस्तुभापरि धरो कण्ठीं करोनी दया ॥ ३ ॥

**आतां संस्कारकौस्तुभास आरंभ करतों.** गर्भाधान इत्यादि [ श्रुति व स्मृतींत ] सांगितलेल्या अनेक संस्कारानीं शुद्ध झालेल्या चित्तरूपदर्पणामध्यें मुनि ज्या देवाला पाहतात; चन्द्र, सूर्य, अग्नि, तारका व विद्युत् (वीज) यांच्या कांतिप्रवाहास जो कारण आहे, व वेदांतानीं शिरोभागीं ( उपनिषदांत ) जो स्थापित केला आहे असा जो पां-डवांचा पालक [ श्रीकृष्ण ] त्यास मीं नमस्कार करतों. ॥१॥ हरिगुरुचरणांस नमस्कार करून वादी लोकांशीं चाललेल्या युद्धामध्यें ( वादविवादामध्यें ) विद्वान् लोकांना जय देणारा व मधुसूदनास आनंद देणारा, अशा **संस्कारकौस्तुभ** ग्रंथास आह्मीं आतां आरंभ करितों. ॥ २ ॥

---

१ क. ख. झ. रथाघे ।

**अथ षोडशसंस्काराः ॥ तत्र गर्भाधानं प्रथममुच्यते । इतरसंस्कारान्प्रति उपजीव्यत्वेन तस्यैव स्मृतिकर्तृभिः गृह्यसूत्रकारैश्च ' गर्भाधानमृताविति ' ' उपनिषदि गर्भलम्भनमिति ' च प्रथमनिर्देशात् । तदुपयोगितया दुष्टरजोदर्शनशान्तिं वक्तुं प्रथमरजोदर्शने[1] शुभाशुभसूचकानि कथ्यन्ते ।**

आतां **सोळा संस्कार**. त्यांत **गर्भाधान** प्रथम सांगतों. कारण इतर संस्कारांस ते मूलभूत असल्यामुळें **स्मृतिकारांनीं** व **गृह्यसूत्रकारांनीं**ही ' गर्भाधानमृतौ ' असा व ' उपनिषदि गर्भलम्भनं ' असा त्याचाच प्रथमतः निर्देश केला आहे. त्यांस ( गर्भाधानास ) उपयोगी अशी जी दुष्टरजोदर्शनशांति ती सांगण्याकरितां प्रथम रजोदर्शनासंबंधानें शुभसूचक व अशुभसूचक [ लक्षणे ] सांगतों.

**तत्र[2] प्रथमरजोदर्शने मासफलम् भृगुः । चैत्रे स्यात्प्रथमर्तौ तु नारी वैधव्यभागिनी । वैशाखे धनपुत्राढ्या ज्येष्ठे रोगान्विता तथा । शुचौ मृतप्रजा प्रोक्ता श्रावणे धनधान्यभाक् । नभस्ये दुर्भगा क्लिष्टाऽप्याश्विने च पयस्विनी[3] । ऊर्जेऽप्यायुष्मती नारी मार्गशीर्षे बहुप्रजा । पौषे तु पुंश्चली नारी माघे पुत्रसुखान्विता । फाल्गुने श्रीमती नारी रजोमासफलं क्रमात् इति ।**

त्यांतप्रथमरजोदर्शनासंबंधानें **मासफल भृगु** सांगतोः—चैत्रमासीं प्रथमरजोदर्शन झालें असतां त्या स्त्रीस वैधव्य येईल, वैशाखांत झालें असतां ती स्त्री धन व पुत्रसंपन्न होईल, ज्येष्ठांत रोगिणी, आषाढांत तिची संतति जगणार नाहीं, श्रावणांत धनधान्ययुक्त, भाद्रपदांत दुर्भाग्य प्राप्त होऊन क्लेश होतील, आश्विनांत पुष्कळ दूध असणारी, कार्तिकांत पुष्कळ आयुष्य असणारी, मार्गशीर्षांत पुष्कळ संतति होणारी, पौषांत व्यभिचारिणी, माघांत पुत्रसुख असणारी व फाल्गुनमासांत संपत्तीनें युक्त अशी स्त्री होईल. याप्रमाणें क्रमानें मासफल समजावें.

**अथ तिथिफलम् । श्रीधरीये गुरुः । प्रथमायां पतिं हन्ति द्वितीयायां सुखं भवेत् । तृतीयायां श्रियै स्याच्च चतुर्थ्यां वृषली भवेत् । पञ्चम्यां पुत्रला-**

---

१ छ. तत्स्वरूपमुक्तं विधानपारिजाते । नाभिमूले स्थितं पुष्पं चतुर्दलसमन्वितम् । तस्मिन्सर्वाश्च दधते गर्भसंभवकारणम् । अधोमुखं स्थितं स्त्रीणां बाल्ये तु मुकुलीकृतम् । बाल्यात्परवयःप्राप्तौ मुकुलं विकसद्भवेत् । उत्फुल्ले कुसुमे स्त्रीणां स्वभावेन स्रवद्रजः । तदाप्रभृति सर्वासां मासिमासि ऋतुर्भवेत् । **रजोदर्शने.** २ ख. छ. व्यतिरिक्तेषु सर्वेषु पुस्तकेषु अथ । ३ ङ यशस्विनी ।

**भश्च षष्ठ्यां चारित्र्यविक्रया । सप्तम्यां पुत्रवृद्धिः स्यादष्टम्यां पुत्रनाशनम् । नवम्यां रुदती नित्यं दशम्यां धर्मशालिनी । एकादश्यां पतिस्निग्धा द्वादश्यां क्रन्दिनी भवेत् । त्रयोदश्यां मानधना त्वपरा बहुदोषकृत् । पर्वण्यन्यगृहीता स्याद्विद्यादेवं तिथेः फलम् । इति ॥**

आतां तिथीचें फळ श्रीधर ग्रंथांत **गुरुः**—प्रतिपदेस पतीचा नाश, द्वितीयेस सुख, तृतीयेस संपत्ति, चतुर्थीस अनाचार करणारी (व्यभिचारिणी), पंचमीस पुत्रलाभ, षष्ठीस व्यभिचारिणी, सप्तमीस पुष्कळ पुत्र, अष्टमीस पुत्रनाश, नवमीस नित्य रोदन, दशमीस धर्माचरण, एकादशीस पतीविषयीं प्रेम, द्वादशीस आक्रोश, त्रयोदशीस मानवती, चतुर्दशीस पुष्कळ दोष करणारी, पूर्णिमा व अमावास्येस परपुरुषासक्त, याप्रमाणें तिथीचें फल समजावें.

**कश्यपोऽपि । अष्टमीषष्ठ्यमारिक्ताद्वादशीसंक्रमेऽपि च । वैधृतौ च व्यतीपाते ग्रहणे चन्द्रसूर्ययोः । विष्ट्यां सन्ध्यासु निद्रायां दुर्भगा प्रथमार्तव इति ॥**

**कश्यप ही:**—अष्टमी, षष्ठी, अमावास्या, रिक्तातिथी ( ४।९।१४ ) द्वादशी, संक्रांत, वैधृति, व्यतीपात, चन्द्र सूर्यांचें ग्रहण, विष्टि, ( भद्रा ) व संधिकालांत किंवा निद्रावस्थेंत प्रथमरजोदर्शन झालें असतां [ ती स्त्री ] दुर्भगा ( दुर्दैवी ) होते.

**अथ पूर्वाण्हादीनां फलम् । स्मृतिरत्ने । शुभञ्चैव तु पूर्वाण्हे मध्यान्हे मध्यमं फलम् । अपराण्हे तु वैधव्यं पूर्वरात्रे शुभं भवेत् । मध्यरात्रे मध्यमं स्यात्परारात्रे शुभान्वितेति । स्मृतौ । प्रातःकाले सुतधना सायान्हे सर्वभोगिनी । मध्यान्हे तु भवेद्वेश्या निशीथे विधवा भवेत् इति ।**

आतां पूर्वाण्ह* इत्यादिकांचें फल **स्मृतिरत्नांतः**—पूर्वाण्हांत [ प्रथमरजोदर्शन झालें तर ] शुभदायक, मध्यान्हांत मध्यम, अपराण्हांत वैधव्य प्राप्ति, पूर्वरात्रीं शुभदायक, मध्यरात्रीं मध्यम, व परारात्रीं शुभदायक, या प्रमाणें [ फळ समजावें ] **स्मृतींतः**—प्रातः:कालीं [ प्रथम रजोदर्शन झाल्यास ] पुत्रवती, सायान्हकालीं सर्वप्रकारच्या भोगांनीयुक्त, मध्यान्हकालीं व्यभिचारिणी व मध्यरात्रीं विधवा होईल. या प्रमाणें [ सांगितलें आहे ].

---

* दिवसाच्या मध्यभागच्या दोन घटिका मध्यान्हकाल, त्या पूर्वींचा पूर्वाण्ह व नंतरचा अपराण्ह होय. ( धर्मसिंधु० प० १ )

---

१ क. ख. भागि ।

अथ वारफलम् ॥ रुग्णा पतिव्रता दुःखी पुत्रिणी भोगभागिनी । पतिप्रिया क्लेशभागा सूर्यवारादिषु क्रमात् ॥ भानुवारे भवेद्व्याधिः सोमवारे पतिव्रता । दुःखिता भौमवारे तु बुधे सौभाग्यसंयुता । श्रीसंयुता गुरोर्वारे पतिभक्ता भृगोर्दिने । मन्दवारे निराशास्यात्प्रथमतौ रजस्वला इति ।

आतां वारांचें फलः—रविवारीं रोगी, सोमवारीं पतिव्रता, मंगळवारीं दुःखी, बुधवारीं पुत्रवती, गुरुवारीं व्यभिचारिणी, शुक्रवारीं पतीस आवडणारी, शनिवारीं क्लेश भोगणारी याप्रमाणें रविवारापासून क्रमानें फल समजावें. रविवारीं प्रथमरजोदर्शन झालें असतां व्याधि होईल. सोमवारीं पतिव्रता, मंगळवारीं दुःखी, बुधवारीं सौभाग्यवती, गुरुवारीं लक्ष्मीनें युक्त, शुक्रवारीं पतीवर प्रेम ठेवणारी, शनिवारीं निराश होईल. या प्रमाणें वारफल समजावें.

अथ नक्षत्रफलम् ॥ गर्गः । सुभगा चैव दुःशीला वन्ध्या पुत्रसमन्विता धर्मयुक्ता व्रतघ्नी च परसन्तानमोदिनी । सुपुत्रा चैव दुष्पुत्रा पितृवेश्मरता सदा । दीना प्रजावती चैव पुत्राढ्या चित्रकारिणी । साध्वी पतिव्रता नित्यं सुपुत्रा कष्टचारिणी । स्वकर्मनिरता हिंस्रा पुण्या पुत्रादिसंयुता । नित्यं धनव्ययासक्ता पुत्रीधान्यसमन्विता । मूर्खाचारा पुण्यवती दस्रर्क्षादेः क्रमात् फलम्[४] ।

आतां नक्षत्रांचें फलः गर्गः—१ सौभाग्यवती, २ वाईटस्वभावाची, ३ वांझ, ४ पुत्रयुक्त, ५ धर्मयुक्त, ६ व्रतनाश करणारी, ७ दुसऱ्याचे मुलांचा आनंद मानणारी, ८ चांगल्यापुत्रानीं युक्त, ९ वाईटपुत्रानीं युक्त, १० नेहमीं बापाच्या घरीं राहणारी, ११ दीन, १२ प्रजेनें युक्त, १३ पुत्रानें युक्त, १४ आश्चर्यकारककर्म करणारी, १५ चांगली, १६ पतिव्रता, १७ चांगल्यापुत्रानीं युक्त, १८ कष्ट भोगणारी, १९ आपल्या कामांत तत्पर, २० क्रूर, २१ पुण्यकर्म करणारी, २२ पुत्रादिकांनीं युक्त, २३ नेहमीं खर्च करणारी, २४ कन्या असणारी, २५ धान्यानें युक्त, २६ मूर्खाप्रमाणें आचरण करणारी, २७ पुण्यवान, याप्रमाणें आश्विनीनक्षत्रापासून क्रमानें फल समजावें.

---

१ ज व्य. स पु भग । २ खव्य. स. पु. दुः पु. । ३ क. ख. पुत्र ४ छ. पतिव्रताया दुष्टेषु प्रथमं स्याद्रजो यदि । पत्युस्तस्या भवेन्मृत्युस्त्रिपूर्वादिषु भेषु च । मघाशक्रादित्यदित्यवन्हिभेषु च वा भवेत् । तत्रापि स्यान्महाशोको दारिद्र्यं चानपत्यता । तद्दोषपरिहारार्थं कुर्याच्छान्तिं यथाविधि । तोषयेज्जपहोमाभ्यां तत्तन्नक्षत्रदेवताः । आचार्यादीन्समभ्यर्च्य भोजयेच्छक्तितो द्विजान् । तत्तुष्टौ तु कृतायाञ्च सर्वारिष्टं प्रणश्यतीत्याश्वलायनस्मृतौ ।

**अथ लग्नफलम् ॥ मेषे सव्यभिचारा स्यात् वृषभे परभोगिनी । मिथुने धनशोभाढ्या कर्कटे व्यभिचारिणी ॥ पुत्राढ्या सिंहराशौ तु कन्यायां श्रीमती भवेत्[१] । विचक्षणा[२] तुलायां तु वृश्चिके तु पतिव्रता । दुश्चारिणी धनुःपूर्वे अपरे च पतिव्रता । मकरेत्वन्नहीना तु कुंभे निर्धनयुक्तता[३] । मीने विचक्षणा लग्ने ग्रहसंस्था विवाहवदिति ।**

**आतां लग्नाचें फलः**—मेषलग्नीं व्यभिचारिणी, वृषभलग्नीं परपुरुषासक्त, मिथुन-लग्नीं द्रव्य व भोग यांनीं युक्त, कर्कलग्नीं व्यभिचारिणी, सिंहलग्नीं पुत्रसंपन्न, कन्यालग्नीं संपत्तियुक्त, तुलालग्नीं चतुर, वृश्चिकलग्नीं पतिव्रता, धनुर्लग्नाच्या पूर्वभागांत दुराचारी व उत्तर भागांत पतिव्रता, मकरलग्नीं अन्नास महाग, कुंभलग्नीं दरिद्री, मीनलग्नीं चतुर, याप्रमाणें [ स्त्री ] होईल. लग्नीं असलेल्या ग्रहांचें फल विवाहाप्रमाणें समजावें.

---

**अथ योगफलानि । दैवज्ञमनोहरे । आद्यर्त्तौ दुर्भगा नारी विष्कंभेचे-द्रजस्वला । वंध्याचैवातिगंडे च शूले शूलवती भवेत् । गंडे तु पुंश्चली नारी व्याघाते चात्मघातिनी ॥ वज्रे च स्वैरिणी प्रोक्ता पाते च पतिघातिनी । परिघे मृत वंध्या च वैधृतौ पतिमारिणी ॥ शेषाः शुभावहा योगा यथानाम फलप्रदाः ।**

**आतां योगांचीं फलें दैवज्ञमनोहरांतः**—विष्कंभयोगांत प्रथमरजोदर्शन झालें असतां ती स्त्री भाग्यहीन होईल, अतिगंडांत वंध्या, व शूलयोगांत शूलव्याधियुक्त होईल, गण्डयोगांत परपुरुषासक्त, व्याघातांत आत्मघात करणारी, वज्रयोगांत स्वच्छंद आचरण करणारी, व्यतीपातांत पतीचा घात करणारी, परिघांत मृतप्रजा व वैधृतियो-गांत पतीचा नाश करणारी अशी होईल. बाकीचे योग शुभदायक असून ते आपल्या नांवाप्रमाणें फल देणारे आहेत.

**अन्यत्रापि नृसिंहः ॥ परिघस्य तु पूर्वार्धे व्यतीपाते च वैधृतौ । संध्या-सूपप्लवे विष्ट्यामशुभं प्रथमार्त्तवम् । व्याघाते नव शूले तु नाड्यः पंच चतुर्दशेति । अत्र संख्ययोर्विकल्पः ।**

अन्यत्रही **नृसिंहः**—परिघयोगाचा पूर्वार्ध, व्यतीपात, वैधृति, संधिकाल, ग्रहण व भद्रा यावर प्रथमरजोदर्शन अशुभ होय. व्याघातयोगांत [ पहिल्या ] नऊ व शूलयोगांत

---

१ ङ. तथा । २ ङ. विल । ३ ङ. निधन ।

पांच किंवा चवदा घटका [ अशुभ होत ] येथें ( पांच किंवा चवदा या ठिकाणीं ) संख्येचा विकल्प समजावा.

अथ लग्नसंस्थग्रहफलानि। वसिष्ठः । वैधव्यमष्टमस्थेऽर्के चंद्रे क्षीणेऽरुचिर्भवेत् । अंगारके भर्तृहीना बुधेचेदनपत्यता ॥ दौर्भाग्यमिंद्रसचिवे सापत्न्यं भार्गवे भवेत् । प्रव्रज्या सूर्यपुत्रे तु राहौ तु कलहः सदा । अशुभं चैव केतौस्याज्जामित्रे शुभदाः शुभाः । अष्टमस्थ इत्यस्य सप्तम्यंतेषु प्रत्येकमनुषंगः । जामित्रे सप्तमस्थाने । नरसिंहोऽपि । लग्नस्य सप्तमस्थाने सूर्यो वैधव्यकारकः । पुत्रहानिकरो भौमो बुधः सत्पुत्रदो भवेत् । बृहस्पतिर्धनायुष्यं शुक्रः साकल्यमेव च । शनैश्चरे तु वंध्या स्याद्राहौ तु मरणं ध्रुवम् । चंद्रे सद्गुणसंयुक्ता देवरातमताच्छुभमिति ।

**आतां लग्नीं असलेल्या ग्रहांचीं फळें सांगतों. वशिष्ठः**—[ लग्नापासून ] अष्टमस्थानीं सूर्य असल्यास वैधव्य प्राप्त होईल. चंद्र असल्यास कांतिक्षीण होईल, मंगळ असल्यास भर्त्याचा नाश होईल. बुध असल्यास मूल होणार नाहीं. गुरु असल्यास दुर्दैवी. शुक्र असल्यास सापत्नभाव प्राप्त होईल ( नवरा दुसरी स्त्री करील ). शनि असल्यास नवरा कोठें तरी सोडून जाईल अथवा संन्यास घेईल. राहू असल्यास नेहमीं भांडण होईल. केतु असल्यास अशुभ होईल. सप्तमस्थानीं शुभ ग्रह असल्यास शुभदायक होत. ' अष्टमस्थे ' या पदाचा प्रत्येक सप्तम्यंत ( अर्के इत्यादि ) पदांशीं अन्वय समजावा. जामित्र=सप्तमस्थान, **नरसिंहहीः**—लग्नाच्या सप्तमस्थानीं सूर्य असल्यास तो वैधव्य देणारा आहे. मंगळ असल्यास पुत्रनाश होईल. बुध असल्यास सत्पुत्र होईल. गुरु असल्यास धन व आयुष्य प्राप्त होईल. शुक्र असल्यास फलप्राप्ति ( अपत्य प्राप्ति ) होईल. शनी असल्यास वांझपणा येईल. राहू असल्यास निश्चयानें मरण येईल. चंद्र असल्यास चांगल्या गुणानीं युक्त होईल. **देवराताच्या** मतानें शुभ होईल.

अथ वस्त्रफलम् । गर्गः । सुभगा श्वेतवस्त्रा स्यात् दृढवस्त्रा पतिव्रता । क्षौमवस्त्रा क्षितीशास्यान्नववस्त्रा सुखान्विता । दुर्भगा जीर्णवस्त्रा स्याद्रोगिणी रक्तवाससा । नीलांबरधरा नारी विधवा पुष्पिता ततः । मलिनांबरधरा नारी दरिद्रास्याद्रजस्वला । वस्त्रेस्युर्विषमारक्तबिंदवः पुत्रमाप्नुयात् । समाश्चेत्कन्यका चेति फलंस्यात्प्रथमार्त्तवे इति ।

---

१ क. झ. फल्यं ख. कल्यं घ. युज्यं । २ घ. प्रदा । ३ क. ख. ग. घ. ङ. च. झ. रस्त्वारो ।

**आतां वस्त्रांचें फल. गर्गः**—पांढरें वस्त्र असल्यास सौभाग्य प्राप्त होईल. वस्त्र बळकट असल्यास पतिव्रता होईल. रेशमीवस्त्र असल्यास राज्यप्राप्ति होईल. वस्त्र नवें असल्यास सुख प्राप्त होईल. जुनें वस्त्र असल्यास भाग्यहीन होईल. तांबडें वस्त्र असल्यास रोगिणी होईल. निळ्या वस्त्रावर स्त्रीस रजोदर्शन झाल्यास विधवा होईल. मळकट वस्त्रावर स्त्री रजस्वला झाल्यास दारिद्र्य येईल. वस्त्रावर रक्ताचे डाग विषम ( १—३—५ इत्यादि ) असल्यास पुत्र होईल. सम ( २—४—६ इत्यादि ) असल्यास कन्या होईल. याप्रमाणें पहिल्या रजोदर्शनाचें फल समजावें.

**अथ स्थानफलम् । ग्रामात् बहिः परग्रामे नारी स्याद्व्यभिचारिणी ॥ पतिव्रता पतिस्थाने सुभगा गृहमध्यतः। ग्राममध्ये तु वृद्धिश्च विधवा च दिगंबरा। उपरागे च दुःशीला आयुष्यं जलसंन्निधौ। धनमध्ये तु कन्याया धनधान्यसमृद्धिदेति ॥ देवरातः । संमार्जनीकाष्ठतृणाग्निशूर्पान् हस्ते दधाना कुलटा तदा स्यात् । तल्पोपभोगे तपसि स्थिता चेत् दृष्टे रजो भाग्यवती तदा स्यादिति ।**

**आतां स्थानाचें फल.** गांवाच्या बाहेर व परगांवीं [ रजोदर्शन झालें असतां ] ती स्त्री व्यभिचारिणी होईल. पतीच्या घरीं झालें असतां पतिव्रता होईल. घराच्या मध्यभागीं ( माजघरांत ) झालें असतां सौभाग्य प्राप्त होईल. गांवांत झालें असतां समृद्धि होईल. नग्न असताना झाल्यास विधवा होईल. ग्रहणांत झालें असतां वाईट स्वभावाची होईल. उदकाजवळ झालें असतां आयुष्य प्राप्त होईल. धनसन्निध झालें असतां धनधान्याची समृद्धि करणारी अशी होईल. **देवरातः**—केरसुणी, लांकडें, गवत, अग्नि आणि सूप हे पदार्थ हातांत असून [ प्रथमरजोदर्शन होईल तर ] ती स्त्री व्यभिचारिणी होईल. शय्येवर अथवा तप करीत असतां रजोदर्शन झाल्यास [ ती स्त्री ] भाग्यवान् होईल.

**अथ प्रथमरजोदर्शने शिष्टाचारः। कश्यपः। प्रथमर्त्तौ तु पुष्पिण्याः पतिपुत्रवतीस्त्रियः । अक्षतैरासनं कुर्युस्तस्मिंस्तामुपवेशयेत् । हरिद्रापुष्पगंधादीन् दद्यात्तांबूलकं स्रजम् । आशिषो वाचयेयुस्ताः पतिपुत्रवती भव । दीपैर्नीराजनं कुर्यात्[1] सदीपे[2] वासयेत् गृहे । ताः सर्वाः पूजयेत् पश्चात् गंधपुष्पाक्षतादिभिः । लवणापूपमुद्गादि दद्यात्ताभ्यः स्वशक्तित इति[3†] ।**

१ ग. र्युः । २ क ख. च ज. पैः । ३† छ. इदं च सर्वं शुभाशुभनिरीक्षणं ' प्रथमर्तौ द्वितीये वा शुभाशुभनिरीक्षणम् । कर्तव्यं ज्ञातिभिः सम्यग्धर्मशास्त्रविधानत इति ।

**आतां प्रथमरजोदर्शन झालें असतां शिष्टाचार [ सांगतों ]** प्रथमरजोदर्शन झालें असतां पुत्रवती अशा सुवासिनी स्त्रियांनीं त्या न्हाणवली करितां अक्षतांचें आसन करून त्यावर तिला बसवावें. नंतर तिला हळद गंध फुलें इत्यादि व तांबूल आणि माळ द्यावी. नंतर तिला सौभाग्यवती व पुत्रवती हो असा आशीर्वाद द्यावा. व दिव्यानीं ओवाळून ( औक्षणकरून ) दिवा असलेल्या घरांत ( मखरांत ) बसवावें. नंतर त्या सर्व स्त्रियांनां गंध पुष्प, अक्षता इत्यादि देऊन त्यांची पूजा करावी व त्यांना यथाशक्ति मीठ अनरसे व मूग वगैरे द्यावे.

**अथ सर्वर्तुसाधारणनियमानाह । वसिष्ठः । त्रिरात्रं रजस्वला अशुचिर्भवति सानांज्यान्नाभ्यंज्यान्नाप्सु स्नायादधः शयीत न दिवा स्वप्यान्नाग्निं स्पृशेन्न रज्जुं सृजेन्न दंतान् धावयेन्न मांसमश्नीयान्न ग्रहान्निरीक्षेत नाश्लीलं किंचिदीरयेत्[1] न खर्वेण[2] पिबेदंजलिना वा पिबेल्लोहेनायसेन वा विज्ञायत इति । लोहेन ताम्रेण । तथा या नखानि निकृंतते तस्यै कुनखी या प्रलिखते तस्यै खलतिर्या पर्णेन पिवति तस्या उन्मादुक इति तैत्तिरीयश्रुतौ नखनिकृंतनं भूमौ रेखाकरणं पर्णेन पानं च निषिद्धम्[3] । यद्यपि दक्षेण अंजनाभ्यंजने स्नानं प्रवासं दंतधावनम् । न कुर्यात्सार्त्तवा नारी ग्रहाणामीक्षणं तथेति स्नानमात्रं निषिद्धम् । तथाप्युपरागादि निमित्तकस्नाने प्रसक्ते वसिष्ठेन नाप्सु-स्नायादिति मज्जनं निषिध्यते । अतएव पराशरेण नियमः स्मर्यते । स्नाने नैमित्तिके प्राप्ते नारी यदि रजस्वला । पात्रान्तरिततोयेन स्नानं कृत्वा व्रतं चरेत् । सिक्तगात्रा भवेदद्भिः सांगोपांगा कथंचन । न वस्त्रपीडनं कुर्यान्नान्यद्वासश्च धारयेदिति ।**

---

१ क. ख. घ. ङ कंचिदाचरेत् । २ ग. च. खर्वे, ङ. नृतनखर्परेण । ३ । छ **बौधायनेऽपि** । अथ यदा मलवद्वासा स्यान्नैनया सह संवदेन्न सहासीत नास्यान्नमद्याद्ब्रह्महत्यायै ह्येषावर्णं (?) प्रतिमुच्यास्तेऽथो कालपान्याहुरभ्यंजनं वा स्त्रिया अभ्यंजनमेव प्रतिगृह्य कामगन्यादिति नैनामुपनयेन्नारण्येन पराचीनां न स्नातीति वाभ्यंक्ते न प्रतिलिखते नाभ्यंक्ते न दन्तान्धावते न नखानि निकृन्तते न कृणत्ति न रज्जुं सृजति न पर्णेन पिवति न खर्वेणेति । अनया संभाषणे प्रतिप्रसवो **धर्मप्रश्ने** । ब्रह्माध्येष्यमाणो मलवद्वासस्थो न संभाषितुं ब्राह्मणेन संभाष्य तया संभाषेत । संभाष्य तु ब्राह्मणेनैव संभाष्याधीयीतैवं तस्याः प्रजा निश्रेयसमिति वचनाद्विधवादि संभाषणे नैतत्कार्यमिति **हरदत्तः** । शौचगानरोदनहसनपाननारीयुतानुलेपनदिवास्वप्नदन्तधावनमौनकायिकवाचिकमानसिकदेवतार्चननमस्काररजस्वलाङ्गस्पर्शनसंभाषणरजोवस्त्राणां संत्यागं न कुर्यादिति विशेषः । ४ ङ. प्युपवर्ण्यते । स्नानेनैमित्तिके० ।

**आतां सर्व ऋतुकाळीं पाळण्याचे नियम वसिष्ठानें** सांगितले आहेत तेः—रजस्वला स्त्री तीन रात्रीपर्यंत अशुचि ( अशुद्ध ) असते. तिनें अंजन ( नेत्रांत काजळ घालणें ) व अभ्यंग करूं नये, उदकांत स्नान करूं नये, दिवसा व जमीनीवर निजूं नये, अग्नीस स्पर्श करूं नये, दोरी वळूं नये, दांत घांसूं नयेत, मांस खाऊं नये, ग्रहांकडे ( नक्षत्रांकडे ) पाहूं नये, अश्लील ( बीभत्स ) आचरण करूं नये. खर्वानें. ( ओणव्यानें, मातीच्या भांड्यानें किंवा डाव्या हातानें ) ओंजळीनें, तांब्याच्या किंवा लोखंडाच्या भांड्यानें पाणी पिऊं नये. **लोह=तांबें.** त्याप्रमाणेंच **'या नखानि निकृंतते तस्यै कुनखी या प्रलिखते तस्यै खलतिर्या पर्णेन पिबति तस्या उन्मादुकः'** ( जी नखें कुरतुडते तिला वाईट नखांची संतति होते, जी [ भुईवर ] रेघा ओढते तिला टक्कल पडलेली व जी द्रोणानें पाणी पिते तिला वेडी अशी संतति होते ). या **तैत्तिरीय** श्रुतींत, नखें कुरतुडणें, जमीनीवर रेघा ओढणें व पानानें ( द्रोणानें ) पाणी पिणें यांचा निषेध सांगितला आहे. अंजन, अभ्यंग, स्नान, प्रवास, दांत घांसणें व नक्षत्र दर्शन, हीं कृत्यें रजस्वला स्त्रीनें करूं नयेत. याप्रमाणें **दक्षानें** जरी स्नानाचा निषेध सांगितला आहे तथापि ग्रहण वगैरे संबंधानें स्नान करणें प्राप्त झालें असतां, **वसिष्ठानें** ' नाप्सु स्नायात् ' ( उदकांत बुडी मारून स्नान करूं नये ) या वाक्यावरून मज्जनाचा ( बुडी मारून स्नानाचा ) निषेध केला आहे. [ यावरून नैमित्तिक स्नान प्राप्त झालें असतां इतर प्रकारांनीं स्नान करण्यास हरकत नाहीं असें सिद्ध होतें ] ह्मणूनच **पराशरानें** नियम सांगितला आहे कीं:—नैमित्तिक स्नान प्राप्त झालें असतां स्त्री रजस्वला असेल तर तिनें भांड्यानें पाणी घेऊन स्नान करावें व व्रताचें ( पुढें सांगितल्याप्रमाणें ) आचरण करावें. तिनें सर्व अवयव पाण्यानें भिजवावे, वस्त्र पिळूं नये व दुसरें वस्त्र नेसूं नये.

**रजस्वलायाः प्रथमदिननिर्णयस्तु पारिजाते चतुर्विंशतिमते । पूर्वांशयोस्तु रात्रौचेज्जननं मरणं रजः । दृष्टं पूर्वदिनादित्वं तृतीये तूत्तरेऽहनि । केचिद्देवोदिते सूर्ये जननं मरणं तथा । रजो वा दृश्यते स्त्रीणां यस्याहस्तस्य शर्वरी । अपरेत्वर्धरात्रात्प्राक् मृतौ रजसि सूतके । पूर्वमेव दिनं प्राहुः ऊर्ध्वं चेदुत्तरेऽहनि इति । अत्र देशाचारतो व्यवस्था ।**

**रजस्वलास्त्रीचा पहिला दिवस कोणता धरावा याविषयीं निर्णय, पारिजातग्रंथांत चतुर्विंशतिमतानें सांगितला आहेः**—रात्रीचे [ तीन भागांपैकीं ] पहिल्या दोन भागांत जर जनन, मरण, किंवा रजोदर्शन होईल तर तो दिवस पहिला

समजावा. तिसऱ्या भागांत झाल्यास पुढील दिवस पहिला समजावा. कित्येक ज्या दिवशीं सूर्योदय झाल्यानंतर दिवसा किंवा रात्रीं जनन, मरण किंवा स्त्रियांस रजोदर्शन होईल [ तो दिवस प्रथम समजतात ]. दुसरे कित्येक मध्यरात्रीचे पूर्वी जनन, मरण किंवा रजोदर्शन झाल्यास तो पहिला दिवस समजतात व मध्यरात्रीचे पुढें झाल्यास पुढचा दिवस पहिला समजतात. याविषयीं देशाचाराप्रमाणें व्यवस्था समजावी.

**स्नातायाः कालान्तरे पुनः रजोदर्शने त्रिरात्रव्रताभावे व्यवस्थोक्ता तत्रैव संग्रहे । ऋतुस्नाता तु या प्रौढा पुनरेव रजस्वला । स्नानात्सप्तदशाहे च शौचेनैव शुचिर्भवेत् । अष्टादशाहे त्वेकाहं व्यहमेकोनविंशतौ । विंशत्प्रभृत्युत्तरेषु त्रिरात्रमशुचिर्भवेत् । एतद्यस्याः किंचिदूने पूर्णे वा मासि रजोनियमस्तद्विषयम् । कश्यपस्तु । एकादशाहेत्वेकाहं द्विरात्रं द्वादशेऽहनि । ऊर्ध्वं त्रिरात्रं विज्ञेयमिति कुंडलिनोदितम् इति । एतत्पक्षादूर्ध्वं यस्या रजोनियमस्तद्विषयम् ।**

रजस्वला स्त्रियांनीं स्नान केल्यानंतर पुनः रजोदर्शन झाल्यास त्रिरात्र व्रताचें ( तीन दिवस विटाळ मानण्याचें ) कारण नाहीं. याविषयीं व्यवस्था **पारिजात** ग्रंथांतच **संग्रह**नांवाच्या ग्रंथाच्या वचनानें सांगितली आहे तीः—जी प्रौढ स्त्री ऋतुस्नान केल्यानंतर सतरा दिवसांचे आंत पुनः रजस्वला होईल ती नुसत्या स्नानानेंच शुद्ध होते. अठराव्या दिवशीं [ रजोदर्शन झाल्यास ] एक दिवस, एकोणिसाव्या दिवशीं झाल्यास दोन दिवस, व विसाव्या दिवसापासून पुढें झाल्यास तीन दिवस, याप्रमाणें अशुचि समजावी. ज्या स्त्रीस एक महिन्यानें किंवा महिना भरण्यास थोडे दिवस कमी असतांना रजोदर्शन होतें तिच्या संबंधानें हा नियम समजावा. " अकराव्या दिवशीं [ रजोदर्शन झाल्यास ] एक दिवस, बाराव्या दिवशीं दोन दिवस व त्यापुढें तीन दिवस [ अशुचि असते ] असें **शेषानें** सांगितलें आहे " असें जें **कश्यपाचें** वचन आहे तें पंधरा दिवसांनंतर ज्या स्त्रीस रजोदर्शन होत असतें तिच्या संबंधानें समजावें.

**अथ रजस्वला शुद्धिप्रकारः स्मृत्यर्थसारे । रजस्वला षष्टिमृत्तिकाभिः शौचं कृत्वा मलं प्रक्षाल्य दंतधावनपूर्वकं संगवे स्नायादिति [1] ।**

---

१ छ.[1] स्नानोत्तरं विशेषः । स्नात्वान्यपुरुषं नारी न स्पृशेत्तु रजस्वला । यदि स्पृशेत्तदा प्रायश्चित्तमाह । ईक्षेद्धि भास्करं देवं ब्रह्मकूर्चं ततः पिबेत् । केवलं पंचगव्यं च क्षीरं वा चात्मशुद्धय इति लैङ्गे ।

**आतां रजस्वलेच्या शुद्धीचा प्रकार सांगतों. स्मृत्यर्थसारांतः**—रजस्वला स्त्रीनें साठ वेळा मृत्तिका लावून [ आर्तव संबंधी ] मलाचें प्रक्षालन करून संगवकालीं ( दिवसाच्या पांचभागांपैकीं दुसऱ्या भागांत ) दांत घांसून स्नान करावें [ म्हणजे ती शुद्ध होते ].

**ज्वरितायाः शुद्धिस्तु संग्रहे । आतुरा चेदृतुमती तस्याः स्नानं कथं भवेत्। स्पृष्ट्वा तु तां परा स्नायात् दशकृत्वो त्वनातुरा। वासोभिर्दशभिश्चैव परिधाप्य यथाक्रमम्। ब्राह्मणान् भोजयित्वाथ पुण्याहेन विशुद्ध्यति । आतुराणां तु सर्वेषां एवं शुद्धिर्विधीयत इति ।**

[ रजस्वला स्त्रीस ] ज्वर येत असेल तर तिच्या शुद्धीचा प्रकार **संग्रहांत** सांगितला आहे:—( **प्रश्न** ) रजस्वला स्त्री ज्वरानें पीडित असल्यास तिनें स्नान कसें करावें ? ( **उत्तर** ) दुसऱ्या एक चांगल्या स्त्रीनें तिला स्पर्श करून दहा वेळां स्नान करावें. व [ एक स्नानास एक अशीं ] क्रमानें तिला ( रजस्वला स्त्रीला ) दहा वस्त्रें नेसावयास द्यावीं, नंतर ब्राम्हणभोजन व पुण्याहवाचन केलें म्हणजे शुद्धि होते. सर्व ज्वरितांची [ स्नानाचा प्रसंग पडल्यास ] याप्रमाणेंच शुद्धी समजावी.

**रजस्वलयोः परस्परं संसर्गे शुध्युपायः स्मृतिमंजर्यां । उदक्ये द्वे तु संस्पृष्टे सवर्णे चैकभर्तृके। तयोः स्नानं मिथः स्पर्शे पंचगव्यं ततः पिबेत् । सवर्णे योनिसंबंधे सगोत्रे च रजस्वले । मिथः स्पृशेदमत्या तु स्नानमात्रेण शुद्ध्यति । मत्यैकरात्रं नाश्नीयात् पंचगव्यं पिबेत्ततः । उदक्ययोर्यदान्योन्यमसंबंधः सवर्णयोः । स्पृशेदमत्या स्नात्वा च तस्मिन्नाद्यात् शुचिर्भवेत्। मत्या तु नाद्यादाशुद्धेर्भुक्त्वाचेत्प्रतिवासरम् । उपोषणं तदा केचिदाहुस्तद्दिनसंख्यया । उपवासे न शक्ताचेत्तत्समं दानमाचरेत् । संभाषेतां स्पृशेतां वा ब्राह्मण्यौ च रजस्वले । आस्नानकालान्नाश्नीतामुभे मत्या मिथः क्वचित् । स्नात्वोपवासं कुर्यातां पंचगव्येन शुद्ध्यतः । एवमभ्यासतः शुद्ध्यै प्रायश्चित्तं समाचरेत् । मत्या रजस्वलान्योन्यं 'वृषली ब्राह्मणी भवेदित्यतः पूर्वं स्पृष्ट्वेति शेषः । ब्राह्मण्याः कृच्छ्रमेकं तु शूद्री पादेन शुद्ध्यति ।**

**दोन रजस्वलास्त्रियांचा परस्पर स्पर्श झाला असतां शुद्धीचा उपाय**

१ ग. सर्वासां.

**स्मृतिमंजरीग्रंथांत सांगितला आहेः**—एकाच वर्णाच्या दोन सापत्न स्त्रियांचा एकमेकांस स्पर्श झाला असतां त्यांनीं स्नान करून नंतर पंचगव्य प्राशन करावें. सवर्ण, सगोत्र अथवा ज्यांचा कांहीं संबंध आहे अशा दोन रजस्वलास्त्रियांचा न कळतां परस्पर स्पर्श झाला असतां त्या केवळ स्नानानें शुद्ध होतात. बुद्धिपूर्वक [ स्पर्श केल्यास ] एक दिवस उपोषण करून नंतर पंचगव्य प्राशन करावें. परस्पर संबंध नसलेल्या अशा ज्या दोन सवर्ण रजस्वला स्त्रिया त्यांचा परस्पर नकळत स्पर्श होईल तर त्यांनीं त्या दिवशीं उपोषण केल्यानें शुद्धि होते. बुद्धिपूर्वक स्पर्श केला असतां शुद्धि होईपर्यंत त्यांनीं खाऊं नये. खाल्लें असतां पुढें तितके दिवस उपोषण करावें असें कित्येक म्हणतात. उपोषण करण्याचें सामर्थ्य नसेल तर त्या पुरतें दान करावें. दोन ब्राम्हणांच्या रजस्वला स्त्रिया एखादे वेळीं परस्पर बुद्धिपूर्वक स्पर्श करतील अथवा संभाषण करतील तर त्यांनीं स्नानकालापर्यंत कांहीं खाऊं नये. व स्नानानंतर उपवास व पंचगव्य प्राशन करावें म्हणजे त्या उभयतां शुद्ध होतात. वारंवार याप्रमाणें [स्पर्श व संभाषण] करीत गेल्यास शुद्धीकरितां प्रायश्चित केलें पाहिजे. रजस्वला ब्राम्हणस्त्रीनें, शूद्र जातीच्या रजस्वला स्त्रीस जाणून स्पर्श केल्यास ब्राम्हणाची स्त्री शूद्राच्या स्त्रीप्रमाणें होते. ' **वृषली ब्राह्मणी भवेत्** ' याच्या पूर्वी 'स्पृष्ट्वा' असा अध्याहार समजावा. ब्राम्हणस्त्रीनें एक कृच्छ्र व शूद्रस्त्रीनें पादकृच्छ्र याप्रमाणें प्रायश्चित करावें म्हणजे शुद्धि होते.

**कश्यपः । रजस्वला सूतिका वा चाण्डालं यदि संस्पृशेत् । आस्नानकालान्नाश्नीयादतिकृच्छ्रं समाचरेत् ॥ ज्ञानतः स्पर्शे चैतत् । चांडालं सा[1]त्त्वा नारी संस्पृशेद्भोजनांतरे । वाग्यता बहिरासीत स्नानकालादुपोषिणी । प्राजापत्यं चरेत्पश्चात्पंचगव्यं ततः पिबेत् । विप्रान् द्वादश संख्याकान् भोजयित्वा तु शुद्ध्यति । पुष्पिणी संस्पृशेन्मोहादशुद्धं वा नरं स्पृशेत् । स्नानादर्वाङ् भुंजीत भुक्त्वा कृच्छ्रं समाचरेत् । मोहात् अज्ञानतः । स्पृष्ट्वोदकी पंचनखान् द्विशफैकशफान् पशून् । अंडजानि च सर्वाणि नाद्यादास्नानवासरात् । पराशरः । रजस्वला यदा दष्टा शुना जंबूकरासभैः । पंचरात्रं निराहारा पंचगव्येन शुद्ध्यति । ऊर्ध्वं तु द्विगुणं नाभेर्वक्त्रेतु त्रिगुणं तथा । चतुर्गुणं स्मृतं मूर्ध्नि दंशेऽन्यत्र व्रती भवेदिति ।**

---

१ च. छ. दृष्टा । ग. घ. ङ. स्पृष्टा ।

**कश्यपः**—रजस्वला किंवा बाळंतीण यांनीं चांडालास स्पर्श केल्यास स्नानकालापर्यंत त्यांनीं कांहीं खाऊं नये व नंतर अतिकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. हें [ प्रायश्चित ] बुद्धिपूर्वक स्पर्श केल्यास समजावें. रजस्वला स्त्री भोजन करीत असतां तिनें चांडालास स्पर्श केल्यास स्नानकालापर्यंत उपोषित राहून व मौन धारण करून बाहेर असावें. नंतर प्राजापत्यकृच्छ्र करून पंचगव्य प्राशन करावें, व बाराब्राम्हणांस भोजन घालावें. म्हणजे शुद्ध होते. [ एखाद्यानें ] अज्ञानामुळें रजस्वला स्त्रीस अथवा अशुचि मनुष्यास (सूतकी वगैरेस ) स्पर्श केला असतां स्नानाच्या पूर्वी त्यानें भोजन करूं नये. केल्यास कृच्छ्र प्रायश्चित करावें. ' **मोह=अज्ञान** ' रजस्वला स्त्रीनें पांच नखांचे, दोन किंवा एक खुरांचे, अशा पशूंस किंवा सर्व प्रकारच्या अंडजप्राण्यांस स्पर्श केल्यास तिनें स्नानाच्या दिवसापर्यंत भोजन करूं नये. **पराशरः**—कुत्रा, कोल्हा किंवा गाढव यांनीं रजस्वला स्त्रीस दंश केल्यास तिनें पांच दिवस उपोषित राहून पंचगव्य [ प्राशन करावें ] म्हणजे ती शुद्ध होते. नाभीच्या वर दंश केल्यास दुपट, तोंडाला दंश केल्यास तिपट व मस्तकास दंश केल्यास चौपट [ प्रायश्चित्त समजावें. ] इतर ठिकाणीं दंश केल्यास [ पूर्वी सांगितल्याप्रमाणें ] व्रत करावें.

**अथ दुष्ट[1]रजोदर्शने[2]शांतिमाह शौनकः । आर्त्तवानां तु नारीणां शांतिं वक्ष्यामि शौनकः । अन्नपुत्रादिलाभाय दंपत्योरभिवृद्ध[3]ये । पंचमेऽन्हि चतुर्थेऽन्हि ग्रहातिथ्यपुरःसरम् । तस्मिन्नहनि कर्त्तव्य ऋतुहोमो विधानतः । आचार्यं वरयेत् प्राज्ञो भुवनेश्वरितुष्टये । होमार्थं च जपार्थं च वरयेदृत्विजो बहून् । यजमानो द्विजैः सार्धं शांतिहोमं समाचरेत् । गृहादीशानदिग्भागे देवतापूजनाय च । द्रोणप्रमाणधान्येन व्रीहिराशित्रयं भवेत् । कुंभत्रयं न्यसेद्राशौ तंतुवस्त्रादि वेष्टयेत् । पूरयेत्तीर्थसलिलैः प्रतिकुंभं पृथक् पृथक् । सूक्तेनाथ नवर्चेन प्रसुव आप इत्यथ । ऋचा याःप्रवतस्तद्वद्वायत्र्या च ततः क्रमात् । मध्यकुंभे क्षिपेद्धान्यमौषधानि च हेम च । ततश्च पंचरत्नानि गंधपुष्पाक्षतादिकान् ।**

**आतां दुष्ट रजोदर्शनाच्या संबंधानें शौनकानें शांति सांगितली आहे तीः**—मीं शौनक स्त्रियांच्या रजोदर्शनासंबंधी शांति सांगतों. त्यापासून नवराबायकोची कल्याणवृद्धि होऊन अन्न पुत्र इत्यादिकांचा लाभ होतो. चवथ्या किंवा पांचव्या

---

१ क. ख. ग. घ. ङ. च. अतिदुष्ट. २ क. ख. ग. घ. च. ञ. । न निर्णये
३ ग. ङ. च. रति ।

दिवशीं ग्रहांचा सत्कार ( ग्रहमख ) करून त्यादिवशीं यथाविधि ऋतु होम करावा. बुद्धिमान् मनुष्यानें भुवनेश्वरीचा संतोष होण्याकरितां आचार्य वरावा. ( नेमावा ) होमाकरितां व जपाकरितां पुष्कळ ऋत्विज वरावे. यजमानानें ब्राम्हणासहवर्तमान शांतीकरितां होम करावा. घराच्या ईशान्य दिशेस देवतांची पूजा करण्याकरितां द्रोण ( ३२ शेर ) परिमित भाताच्या तीन राशी ( ढीग ) कराव्या व त्यावर तीन कुंभ ठेवावे. त्या कुंभांस सूत व वस्त्र इत्यादिकांनीं वेष्टन करावें. नंतर त्यांपैकीं प्रत्येक कुंभ, तीर्थोदकांनीं निरनिराळा भरावा. त्यांचे मंत्रः—'**प्रसुवआपः**' हे नऊ ऋचांचें सूक्त, '**याः प्रवत**' ही एक ऋचा, व **गायत्री**, हे क्रमानेंच होत. मधल्या कुंभांत धान्यें, औषधें, ( पुढें सांगितलेलीं ) सुवर्ण, पंचरत्नें, गंध, पुष्प व अक्षता इत्यादि पदार्थ टाकावे.

**औषधानि च वक्ष्यंते मुनिभिः शांतिकारणात्[१]। औदुंबरः कुशा दूर्वा राजीवं चंपबिल्वकाः। विष्णुक्रांताथ तुलसी वर्हिषः शंखपुष्पिका । शतावर्यश्वगंधा च निर्गुंडी सर्षपद्वयम्। अपामार्गः पलाशश्च पनसो जीवकस्तथा। प्रियंगवश्च गोधूमव्रीहयोऽश्वत्थ एव च। क्षीरं च दधि सर्पिश्च पद्मपत्रं तथोत्पलम्। कुरंटकत्रयं गुंजा वचाभद्रकमुस्तका इति। द्वात्रिंशदौषधानीह यथासंभवमाहरेत्। गजाश्वरथवल्मीकसंगमाद्ध्र[२]दगोकुलात्। राजद्वारप्रदेशाच्च मृदमानीय निक्षिपेत्। कुंभस्थापन इत्येतत् तत्तन्मंत्रेण कारयेत्। मृत्तिकां चौषधादीनि मंत्रेण प्रक्षिपेत् क्रमात् । कुंभोपरि न्यसेत्पात्रं कांस्यं वा ताम्रमेव वा । मृण्मयं नवंपात्रं वा स्वस्य वित्तानुसारतः। पात्रोपरिन्यसेद्वस्त्रं प्रतिमां भुवनेश्वरीं । तन्मूल्यं वा न्यसेत्तत्र इंद्राणीं च पुरंदरम् । आचार्यः पूजयेद्देवीमंगाद्यावरणानि च । अन्यो वा पूजनं कुर्यात् गायत्र्या मंत्र सारया। इंद्राणीं पूजयेद्देवीमिंद्राणीमासुनारिपु । क्रमेण पूजयेदिंद्रमिंद्रत्वावृषभं वयम्। अनेन विधिनाचार्यः पूजयेद्देवतात्रयम् । आवाहनादि सकलैरुपचारैः पृथक् पृथक्। तन्मध्यमं स्पृशन् कुंभं मंत्रेण भुवनेश्वरीम्। जपेदाचार्य आहोमाच्छ्रीसूक्तं च जपेत्ततः। स्पृशन् वै दक्षिणं कुंभं ऋत्विगेको जपेदथ। चत्वारि रुद्रसूक्तानि चतुर्मन्त्रोत्तराणि च। संस्पृशन्नुत्तरं कुंभं श्रीरुद्रं रुद्रसंख्यया। शन्न-इंद्राग्निसूक्तं च तत्र चैव स्पृशन् जपेत्। कुंभस्य पश्चिमे देशे शांतिहोमं समाचरेत्।**

ऋषींनीं शांतीकरितां औषधें सांगितलीं आहेत तीं:—१ उंबर, २ कुश,

१ ङ. कर्माणि। २ क. ख. ङ. झ. वेणु।

३ दूर्वा, ४ कमळ, ५ चांफा, ६ बेल, ७ विष्णुक्रांत, ८ तुलसी, ९ वाळा, १० शंखाहुळी, ११ शतावरी, १२ आस्कंद १३ निर्गुंडी, १४ पांढऱ्या मोहोऱ्या, १५ लाल मोहोऱ्या, १६ अघाडा, १७ पळस, १८ फणस, १९ कांटेरी आसण, २० राळे, २१ गहूं, २२ भात, २३ पिंपळ, २४ दूध, २५ दहीं, २६ तूप, २७ कमळाचें पान, २८ कमळ, २९ तीन प्रकारच्या कोरांटी, ३० गुंजा, ३१ वेखंड व ३२ नागरमोथे हीं बत्तीस औषधें किंवा त्यांपैकीं मिळतील तीं आणावीं. १ गजस्थान, २ अश्वस्थान, ३ रथस्थान, ४ वारूळाची जागा, ५ संगमस्थान, डोह, ६ गाईचा गोठा, ७ राजद्वाराचा प्रदेश, इतक्या ठिकाणाहून मृत्तिका आणून ती ( कुभांत ) घालावी. कुंभ स्थापन करणें वगैरे कृत्यें त्या त्या मंत्रांनीं करावीं. मृत्तिका व औषधें वगैरे, मंत्र म्हणून क्रमानें टाकावीं. कुंभावर आपल्या शक्तीप्रमाणें तांब्याचें अथवा कांशाचें किंवा मातीचें नवें पात्र ( पूर्णपात्र ) स्थापन करावें. व त्यावर वस्त्र ठेऊन त्यांत भुवनेश्वरीची प्रतिमा अथवा प्रतिमेची किंमत ठेवून [ बाजूच्या दुसऱ्या दोन कुंभांवर ] इंद्राणी व इंद्र यांची स्थापना करावी. आचार्यानें सर्व मंत्रांत श्रेष्ठ अशा गायत्रीमंत्रानें भुवनेश्वरीची व अंगदेवता आणि आवरणदेवता यांची [ त्या त्या देवतेच्या मंत्रानीं ] पूजा करावी. किंवा दुसऱ्या कोणी करावी. '**इंद्राणी मासुनारिषु**' या मंत्रानें इंद्राणीची व '**इंद्रत्वा वृषभं वयं**' या मंत्रानें इंद्राची पूजा करावी. याप्रमाणें आचार्यानें आवाहनादिक सर्व उपचारांनीं तीन देवतांची निरनिराळी पूजा करावी. नंतर आचार्यानें मध्यम कुंभास स्पर्श करून गायत्रीमंत्रानें भुवनेश्वरीचा जप, होम होईपर्यंत करावा. नंतर श्रीसूक्ताचा जप करावा. नंतर एका ऋत्विजानें दक्षिणकुंभास स्पर्श करून चार रुद्र सूक्तें ( पुढें सांगितलेलीं ) व चार मंत्र यांचा जप करावा. उत्तरकुंभास स्पर्श करून रुद्राचा अकरा वेळ जप व '**शन्न इंद्राग्नी**' या सूक्ताचा जप [ एका ऋत्विजानें ] करावा. कुंभांच्या पश्चिमभागीं शांतिहोम करावा.

**अन्वाधानं ततः कुर्यात् होमतंत्रं[1] समाचरेत्। पूर्णपात्रनिधानान्तं कृत्वाचार्यो द्विजैः सह। दूर्वाभिस्तिलगोधूमैः पायसेन घृतेन च। पायसं श्रपयेत्तत्र सावित्रं च हविश्च तत्[2]। कृत्वाज्यभागपर्यंतं हविरुद्वासनादिकम्। तिसृभिश्चैव दूर्वाभिरेकैका चाहुतिर्भवेत्। आभिर्मंत्रप्रयुक्ताभिर्गायत्र्या[3] जुहुयात् क्रमात्। अष्टोत्तरसहस्रं तु शतमष्टोत्तरं तु वा। तिलमिश्रैश्च गोधूमैर्द्रव्येणाज्याहुतीर्हु-**

१ घ. कर्म। २ घ. वा। ३ छ अभिमन्त्र्य।

नेत् । जुहुयात्पायसेनैव आज्येन च हुनेत् क्रमात्[१] । हविश्चतुष्टयेनैव समसंख्यया ॥ गायत्र्यैव च होतव्यं हविरत्र चतुष्टयम् । ततः स्वि हुत्वा रज्जुप्रहरणं तथा । अयाश्चेत्यादिभिर्हुत्वा समुद्रादूर्मिसूक्ततः । तामाज्यधारां तां पूर्णाहुतिमथाचरेत् । परिषेचनपर्यंतं होमशेषं समा सहौषधिस्थितैस्तत्र प्रतिकुंभस्थितोदकैः । ऋतुमत्यां स्थिता शांतिर्दंप सुखाय च । शांतिरभिषेकः ।

नंतर आचार्यानें अन्वाधान करून पूर्णपात्रस्थापनांत होमाचें कर्म करून ब्राह्म वर्तमान, दूर्वा, तिलमिश्र गोधूम, पायस (खीर) व तूप [हे सर्व जमवावें.] पायस ह्या केलेल्या अग्नीवरच शिजवावा. हें सर्व हविर्द्रव्य सवितृदेवतेचें समजावें. हविरु पासून आज्यभागापर्यंत कर्म करून, [प्रथम दूर्वांचा होम करावा.] तीन तीन दूर्वां एक आहुति समजावी. याप्रमाणें गायत्री मंत्रानें अष्टोत्तरसहस्र ( १००८ ) अष्टोत्तरशत ( १०८ ) होम करावा. तिलमिश्रितगहूं, आज्य व पायस क्रमानेंच होम करावा. या चार हविर्द्रव्यांनीं गायत्री मंत्रानें सारख्याप्रमाणानें करावा. नंतर स्विष्टकृत् होम करून रज्जु प्रहरण करावें. नंतर ' **अयाश्चाग्ने** या [ प्रायश्चित्त ] होम करून ' **समुद्रादूर्मि०** ' या सूक्तानें पूर्णाहुति द्यावी. व षेचनपर्यंत होमाचा शेष समाप्त करावा. नंतर प्रत्येक कुंभांत असलेल्या औष उदकांनीं ऋतुमती स्त्रीस अभिषेक करावा त्यापासून दंपत्यास सुख प्राप्त **शांति=अभिषेक.**

अथाभिषेकमंत्राश्च प्रोच्यंते शौनकादिभिः । आपोहिष्ठेति न सूक्तेन च ततः परम् । इंद्रोअंगतृचेनेव पावमानैः क्रमेण तु । शृणवच्चनः, स्वस्तिदात्रिंश एकया । त्र्यंबकेणाथ मंत्रेण जातवेदस एक समुद्रज्येष्ठा इत्यादि चतुर्भिश्च प्रसिद्धकैः । त्रायंतामिति मंत्रैश्च त्रिभि र्यथाक्रमम् । इमा आपस्तृचेनैव देवस्यत्वेति मंत्रतः । मंत्रेणाथ तमीशानं रुद्र इत्यथ । तमुष्टुहीति मंत्रेण भुवनस्य पितरं तथा । यातेरुद्रेति मंत्रेण शिवसं मंत्रतः । इंद्रत्वा वृषभं वयं मंत्रैश्चैवाभिषेचयेत् । सा च वस्त्रान्तरं धृत्वा पुन वसेत्सती[३] । उपवासोऽत्र समीपावस्थानम् । विप्रान् विधिवदभ्यर्च्य गंधपु

---

१ क. झ. मात् अष्टाविंशतिभिश्चैवाथवा चाष्टसंख्यया । २ ङ. ण. च. छ. गानेन ३ ख. दिति ।

**तादिभिः । धेनुं पयस्विनीं दद्यादाचार्याय च भूषणैः । सदक्षिणमनड्वाहं प्रद्द्याद्रुद्रजापिने । ऋत्विग्भिश्चापि सर्वेभ्यो दद्याद्वै दक्षिणां ततः । महाशांतिं प्रजप्याथ विप्राशीर्वचनं ततः । ब्राह्मणान् भोजयेत्पश्चाद्भुञ्जीत स्वजनैः सह ।**

आतां अभिषेकाचे मंत्र शौनकादिकांनीं सांगितले आहेत ते असेः—'आपोहिष्ठा' हें नऊ ऋचांचें सूक्त, '**इंद्रोअंग०**' या तीन ऋचा, **पावमानमंत्र**, ( '**त्रिभिष्ट्वं देव०**' इत्यादि सात ऋचा ) **उभयंशृणवच्चनः०** '**स्वस्तिदाविशः०**' **त्र्यंबकंयजामहे०** '**जातवेदसे०**' **समुद्रज्येष्ठाः,०** इत्यादि प्रसिद्ध अशा चार ऋचा, '**त्रायंतामिह०**' या तीन ऋचा, '**इमाआपः०**' या तीन ऋचा, '**देवस्यत्वा०**' हा मंत्र, '**तमीशानं०**' '**त्वमग्नेरुद्रो०**' **तमुष्टुहि०** '**भुवनस्यपितरं०**' '**यातेरुद्र०**' शिवसंकल्प मंत्र ( **यज्जाग्रतो०** इत्यादि सहा ऋचा ) व '**इन्द्रत्वावृषभंवयं०**' या मंत्रांनीं अभिषेक करावा. नंतर ऋतुमती स्त्रीनें दुसरें वस्त्र नेसून पुनः [ पती जवळ ] बसावें. येथें '**उपवास=जवळवसणें.**' नंतर गंध, पुष्प, अक्षता इत्यादिकांनीं ब्राह्मणांची यथाविधि पूजा करून आचार्यास भूषणासुद्धां पुष्कळ दूध देणारी अशी गाय द्यावी. व रुद्राचा जप करणारा ब्राह्मण यास दक्षिणेसह वृषभदान करावें. नंतर सर्व ऋत्विजांना दक्षिणा द्यावी. नंतर शांतिसूक्त म्हणवून ब्राह्मणांचा आशीर्वाद घ्यावा. व ब्राह्मणभोजन करून नंतर स्वजनासह भोजन करावें.

**स्मृतौ । ब्राह्मणान् भोजयित्वा तु दैवज्ञं भोजयेत्ततः । एवं यः कुरुते शांतिं शौनकोक्तप्रकारतः । तदनिष्टं तु सकलं सद्य एव विनश्यतीति । 'जपेदाचार्य इति' अन्वाधानात्मकहोमतंत्रारंभपर्यंतमित्यर्थः । अनेनैवाशयेनान्वाधानं ततः कुर्यादिति श्लोके आचार्यग्रहणम् । ततश्च अग्निस्थापनादिग्रहपूजान्तं यजमानेन कर्तुमुचितम् । श्रपयेत्तत्रेति गृहासिद्धान्नग्रहणं व्यावर्त्यते । सावित्रं च हविश्च तदित्यत्र तच्छब्देन हविश्चतुर्थ्यत्यागकाले 'सवित्रे' इति चतुर्थ्यंतेन देवतोद्देशः कार्य इति ज्ञाप्यते । लभ्यते चात्र मंत्रसंवादः । 'पार्वणौ' इति तद्धितविसंवादिनो मंत्रात् पूर्णमासायेत्युद्देशोऽङ्गीक्रीयते याज्ञिकैः । संवादे तु कैमुतिकन्यायेनैव तत्सिद्धिः ।**

**स्मृतींतः**—"ब्राह्मणांस भोजन घालून नंतर ज्योतिषी यास भोजन घालावें. याप्र-

१ क. ख. ग. च. क्ष. क्तां प्र०

माणें शौनकानें सांगितलेल्या प्रकारानें जो शांति करतो, त्याचें सर्व अनिष्ट तत्काल नाहींसें होतें" असें सांगितलें आहे. मागें '**जपेदाचार्यः**' असें [मूळग्रंथांत] सांगितलें आहे तो जप 'अन्वाधानरूपहोमकर्म आरंभ करीपर्यंत करावा' असा अर्थ समजावा. याच अभिप्रायानें पुढें '**अन्वाधानं ततः कुर्यात्**' या श्लोकांत 'आचार्य' पद घातलें आहे. नंतर पुढील, अग्निस्थापनापासून ग्रहांच्या पूजेपर्यंत कर्म, यजमानानें करणें योग्य आहे. '**श्रपयेत्तत्र**' या वचनानें [ पायस; स्थापन केलेल्या अग्नीवर शिजविण्यास सांगितलें आहे. त्यावरून ] तें घरांत ( लौकिकाग्नीवर ) शिजविलेलें नसावें असें बोधित होतें. तें हविर्द्रव्य सूर्यदेवतेचेंच समजावें. ( '**सावित्रं च हविश्च तत्**) यांतील **तत्** या शब्दावरून दूर्वा इत्यादि चार हविर्द्रव्यांचा होम करतेवेळीं '**सवित्रे**' असा चतुर्थ्यंत देवतेचा उद्देश ( निर्देश ) करावा ( '**सवित्रे इदं न मम**' असें म्हणावें ) असें ज्ञापित होतें. आणि असें करण्याविषयीं ( '**सवित्रे**' असा देवतेचा निर्देश करण्याविषयीं ) [ होमाच्या ] मंत्राचा अर्थही अनुकूल आहे. [ '**स्रुवेण पार्वणौ*** **होमौ जुहोति**' या सूत्रांतील. ] '**पार्वणौ**' या तद्धितविसंवादी ( तद्धितप्रत्ययाच्या अर्थास न जुळणाऱ्या) [**ऋषभं वाजिनं वयं**० या होमाच्या] मंत्रार्थाच्या अनुकूलतेनें [होम केल्यानंतर ] '**पूर्णमासाय**' असा उद्देश ( देवतेचा निर्देश ) याज्ञिक लोक स्वीकारतात, तर मग [प्रस्तुत प्रसंगीं होममंत्राच्या देवतेस स्मृतिवचनांतील '**सावित्रं**' यांतील तद्धिताचा ] संवाद ( तद्धित प्रत्ययार्थाची अनुकूलता ) असल्यामुळें तीच देवता घ्यावी हें सहज सिद्ध होतें.

**नचैवं भुवनेश्वरीदैवत्यहोमाभावापत्तिः। वाचनिकत्वेन इष्टत्वात्। वस्तुतस्तु षुञ् प्राणिप्रसव इति धातोर्व्युत्पन्नः सवितृशब्दः प्रकृतफलदातृत्वेन प्रथमप्रयाजे समिच्छब्दोऽग्नेरिव लिङ्गानादरेण भुवनेश्वरीप्रतिपादक इति न विरोधः।**

आतां असें केल्यानें भुवनेश्वरीदेवतेला उद्देशून होम होत नाहीं अशी अडचण येते, अशी शंका करूं नये. कारण वचनानें उक्त ( शौनकानें '**आचार्यं वरयेत्प्राज्ञो भुवनेश्वरितुष्टये। होमार्थं च**' ) अशा प्रत्यक्ष वचनानें ती सांगितलेली असल्यामुळें

---

* "स्रुवेण पार्वणौ होमौ जुहोति" या सूत्राचा अर्थ, स्रुव्यानें पर्वदेवतेस उद्देशून होम करावा' असा आहे. म्हणून '**पर्वणे इदं**' असा उद्देश करणें प्राप्त होतें. परंतु याज्ञिक लोक तसा उद्देश न करितां पूर्णमासेष्टीच्या दिवशीं '**पूर्णमासाय इदं**' असा व दर्शेष्टीच्यावेळीं '**अमावास्याया इदं**' असा उद्देश करीत असतात. परंतु हा उद्देश '**सास्यदेवता**' ( पा. ४।२।२४ ) या सूत्रानें केलेला जो तद्धित अणप्रत्यय तदंत जो पार्वणशब्द त्याच्या अर्थाशीं विरुद्ध आहे.

[या होमाची] ती देवताही इष्ट आहे. वस्तुतः (वास्तवीक पाहिलें तर) **'षुञ् प्राणिप्रसवे'*** या धातूपासून निष्पन्न झालेला **'सवितृ'** हा शब्द, प्रस्तुत फल ( संततिरूपफल ) देणाऱ्या अर्थाचा वाचक असल्यामुळें, प्रथम प्रयाजांत **'समित्**† **'** हा शब्द जसा [ स्त्रीलिंगी असून पुल्लिंगी असणाऱ्या ] अग्नीचा वाचक आहे त्याप्रमाणें लिंगाची विवक्षा न धरितां भुवनेश्वरी देवतेचाच वाचक आहे म्हणून विरोध येत नाहीं.

**मुख्यदक्षिणाशक्तौ निष्क्रयो दक्षिणा देया । तमाह कात्यायनः । ' दशकार्षापणा धेनाविति, अष्टावनड्डुहिस्मृताः ' इति च । कार्षापणमाह नारदः । कार्षापणो दक्षिणस्यां दिशि रौप्यः प्रवर्तते । पणैर्निबद्धः पूर्वस्यां षोडशैव पणाः सन्त्विति ।**

मुख्य दक्षिणा देण्याचें सामर्थ्य नसल्यास निष्क्रय ( किंमत ) दक्षिणा द्यावी. ती **कात्यायनानें** सांगितली आहेः—धेनुबद्दल दहा कार्षापण व वृषभाबद्दल आठ कार्षापण समजावे. **नारदानें** कार्षापणाचें स्वरूप सांगितलें आहेः—दक्षिणदेशांत रुप्याचा कार्षापण असतो व पूर्वदेशांत सोळा पण ( पैसे ) म्हणजे एक कार्षापण मानतात.

**अथ[1] रजोदर्शनशांतिप्रयोगः । बहुतरदोषदुष्टे प्रथमरजोदर्शने द्वितीयादिरजोदर्शनोत्तरं, स्वल्पदोषदुष्टे तु तदनंतरमेव गर्भाधानप्रत्यासन्नदिने सा कार्या ।**

**आतां रजोदर्शनाच्या शांतीचा प्रयोग सांगतों.** प्रथमरजोदर्शनाचेवेळीं पुष्कळ दोष असल्यास दुसऱ्या इत्यादि रजोदर्शनानंतर व थोडे दोष असल्यास त्याचवेळीं गर्भाधानाच्या जवळच्या दिवशीं शांति करावी.

**कर्ता पत्न्या सह कृतस्नानादिनित्यक्रियः पवित्रपाणिराचम्य देशकालौ संकीर्त्य ' अस्याः मम भार्यायाः प्रथमरजोदर्शने ईदृशदुष्टमासादिसूचितसर्वारिष्टपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सग्रहमखां शौनकोक्तां शांतिं करिष्य ' इति संकल्प्य, गणपतिपूजनादि—आचार्यऋत्विग्वरणान्तं कुर्यात् । आचार्यस्तु यथा**

---

* हल्लींच्या धातुपाठांत ' **षुञ् प्राणिप्रसवे** ' असा धातु नसून ' **षूङ् प्राणिप्रसवे** ' असा धातु दिवादिकांत ( ४ थ्यागणांत ) आहे.

† ' **समिधो यजति** ' यांतील ' **समित्** ' शब्द मूळचा स्त्रीलिंगी असून त्या लिङ्गाची विवक्षा न करतां तो पुल्लिंगी अग्नीचा वाचक मानला आहे.

---

१ क. ख. ग. घ. ङ. ज. अथ शां.

**स्वर्गे शक्रादीनां बृहस्पतिः। तथा त्वं मम यज्ञेऽस्मिन्नाचार्यो भव सुव्रत**
**यस्य। अस्य यागस्य निष्पत्तौ भवन्तोऽभ्यर्थिता मया। सुप्रसन्नैः[1] प्रकर्तव्यं श**
**विधिपूर्वकमित्यृत्विजाम्। ततो गंधवस्त्रादिभिः यथाशक्ति तेषां पूजनम्।**

कर्त्यानें पत्नीसहवर्तमान स्नान इत्यादि नित्य कर्मे करून हातांत पवित्र करून प्राणायाम केल्यावर देशकालांचा उच्चार करावा. नंतर " **अस्या मम** याः **प्रथमरजोदर्शने ईदृशदुष्टमासादिसूचितसर्वारिष्टपरिहारद्वारा श्रीपर** **प्रीत्यर्थं सग्रहमखां शौनकोक्तां शान्तिं करिष्ये** " असा संकल्प करून ग पूजनापासून आचार्य व ऋत्विक् यांच्या वरणापर्यंतचें कर्म करावें. " **आच** **यथा स्वर्गे शक्रादीनां बृहस्पतिः। तथा त्वं मम यज्ञेऽस्मिन्नाचार्यो भव सुव्र** मंत्रानें आचार्यवरण करावें, " **अस्य यागस्य निष्पत्तौ भवंतोऽभ्यर्थिता** **सुप्रसन्नैः प्रकर्तव्यं शांतिकं विधिपूर्वकं** " या मंत्रानें ऋत्विजांचें वरण नंतर गंध, वस्त्र, इत्यादिकांनीं त्यांची यथाशक्ति पूजा करावी.

**तत आचार्यः पवित्रपाणिः देशकालौ संकीर्त्य यजमानानुज्ञया आच** **करिष्ये इति संकल्प्य, यदत्रसंस्थितमिति प्राच्यादिदिक्षु प्रादक्षिण्येन स** **विकीर्य, 'शुचीव' इति ऋचा पंचगव्येन तथैव प्रोक्ष्य 'आपोहि** **तृचेन शुद्धाभिरद्भिस्तथैव प्रोक्ष्य, कृतांजलिः 'स्वस्त्ययनंतार्क्ष्यं' इति मं** **देवतां संप्रार्थ्य भुवनेश्वर्यादिप्रतिमात्रयस्य अग्न्युत्तारणं कुर्यात्। अग्निः सा** **सूक्तस्य वैश्वानरोऽग्निस्त्रिष्टुप्। अग्न्युत्तारणे विनियोगः। अग्निपदरहितेन** **सप्तिमितिसूक्तेनाभिषिच्य, पुनरग्निपदयुक्तेन तेनैवाभिषिंचेत्। इत्यग्न्युत्ता**

नंतर आचार्यानें हातांत पवित्र घालून व देशकालांचा उच्चार करून " **नानुज्ञया आचार्य कर्म करिष्ये** " असा संकल्प करून ' **यदत्र संस्थितं** ' त्रानें पूर्वदिशेकडे प्रदक्षिणाकार पांढऱ्या मोहऱ्या टाकाव्या. नंतर ' **शुचीवोह** या तीन ऋचांनीं पंचगव्यानें तसेंच ( प्रदक्षिणाकार ) प्रोक्षण करून '**आपो** या तीन ऋचांनींही तसेंच प्रोक्षण करावें. नंतर हात जोडून ' **स्वस्त्ययनंता** या दोन मंत्रांनीं देवतेची प्रार्थना करून भुवनेश्वरी इत्यादि तीन प्रतिमांचें **अग्न्यु** करावें. "[ तें असें ] **अग्निः सप्तिमितिसूक्तस्य वैश्वानरोऽग्निस्त्रिष्टुप्, अग्न्यु** **विनियोगः** " [ असें म्हणून नंतर ] ' **अग्निःसप्तिं०** ' हें सूक्त, '**अग्नि**' या

१ क. नैश्च. २ क. सहितेन.

उच्चार न करितां, म्हणून अभिषेक करावा, पुनः ' अग्नि ' या पदाचा उच्चार करून तेंच सूक्त म्हणून अभिषेक करावा. **याप्रमाणें अग्न्युत्तारण समजावें.**

**ततो गृहादीशान्यां मध्ये तद्दक्षिणोत्तरयोश्च[1] महीद्यौरिति मंत्रावृत्त्या भूमिं स्पृष्ट्वा, । ओषधयः समिति द्रोणप्रमाणव्रीहिभिः तेषु देशेषु राशित्रयं कुर्यात् । ' पलं सुवर्णाश्चत्वारः कुडवं प्रस्थमाढकम् । द्रोणं च खारिका चेति पूर्वपूर्वाच्चतुर्गुणम् ' इति षोडशप्रस्थात्मको द्रोणः ।**

नंतर घराच्या ईशान्यभागीं स्थल योजून त्यांत मध्यभागीं, व त्याची दक्षिण व उत्तरबाजू अशा तीन ठिकाणीं, ' **महीद्यौः** ' हा मंत्र प्रत्येक वेळां म्हणून, भूमीस स्पर्श करावा. त्या तीन प्रदेशांचे ठिकाणीं द्रोण परिमाण तांदूळ घेऊन त्याच्या तीन राशी ' **ओषधयः सं०** ' या मंत्रानें कराव्या. " चार सुवर्ण ह्मणजे एक पल. त्याच्यापुढें कुडव, प्रस्थ, आढक, द्रोण व खारिका हीं उत्तरोत्तर परिमाणें मागील परिमाणांपेक्षां चौपटीनें जास्त आहेत. यामुळें सोळा प्रस्थ झाले ह्मणजे एक द्रोण होतो.

**ततः आकलशेष्विति मध्यदक्षिणोत्तरक्रमेण प्रक्षालितमव्रणमकलङ्कं[2] कुंभत्रयमासादयेत् । प्रसुवआपइत्यस्य सूक्तस्य सिंधुक्षित्प्रैय्यमेधो नद्यो जगती । कलशेषूदकपूरणे विनियोगः । प्रसुव आप इति सूक्तं । याः प्रवत इत्यस्य वसिष्ठो नद्यः शक्करी । कलशेषूदकपूरणे विनियोगः । याः प्रवत इति ऋक् । प्रतिकलशं पूरणादिमन्त्राणामावृत्तिः । ततो गंधद्वारामिति गंधं, या ओषधीरिति सर्वौषधिः, ओषधयः समितियवांश्च, त्रिषु[3] कलशेषूक्तक्रमेण क्षिपेत् । हेमपंचरत्नप्रक्षेपोत्तरं वा गंधादिप्रक्षेप इति वक्ष्यामः ।**

नंतर मध्य, दक्षिण व उत्तर याप्रमाणें क्रम धरून, प्रक्षालन केलेले व ज्यानां व्रण किंवा डाग नाहीं असे तीन कुंभ त्या राशींवर ' **आकलशेषु०** ' या मंत्रानें स्थापन करावे. " **प्रसुव आपइत्यस्य सूक्तस्य सिंधुक्षित् प्रैय्यमेधो नद्यो जगती । कलशेषूदकपूरणे विनियोगः । याः प्रवत इत्यस्य वसिष्ठो नद्यः शक्करी । कलशेषूदकपूरणे विनियोगः** " ' **प्रसुव आपः०** ' हें सूक्त व **याः प्रवत०** ही ऋचा [ म्हणून कलशांत उदक घालावें. ] पाणी घालण्याचे वगैरे मंत्रांची प्रत्येक कलशपूरणाचेवेळीं आवृत्ति करावी. ( ह्म० प्रत्येक वेळां ते मंत्र ह्मणावे. ) नंतर ' **गंधद्वारां०** ' या मंत्रानें

१. छ. तश्च. २ क. च. कालकं. ३ क. ख. ग. घ. ङ. च. त्रिष्वप्युक्त.

गंध, ' **या ओषधीः०** ' या मंत्रानें सर्वौषधि, व ' **ओषधयः सं०** ' या मंत्रानें य तिन्हीं कलशांत पूर्वीं सांगितलेल्या क्रमानें टाकावे. सुवर्ण व पंचरत्नें टाकल्यावर गंध दिक टाकावे असाही एक पक्ष आहे तो पुढें सांगूं.

**ततो मध्यकुंभे[1] गायत्र्या यवव्रीहितिलमाषकंगुश्यामाकमुद्गान् क्षिप्त्वा । 'सप्त द्रव्यप्रक्षेपो न गायत्र्येति वृद्धाः' । तथैव उदुंबरकुशदूर्वारक्तोत्पलचंपकबिल्वविष्णु क्रांतातुलसीबर्हिश्शंखपुष्पीशतावर्यश्वगंधानिर्गुंडीरक्तपीतसर्षपापामार्गपलाशपन सजीवकप्रियंगुगोधूमव्रीह्यश्वत्थदधिदुग्धघृतपद्मपत्रनीलोत्पलसितरक्तपीतकुरंटक गुंजावचाभद्रमुस्तकाख्यानि द्वात्रिंशदौषधानि[2], यथासंभवं वा प्रक्षिप्य । त्रि ष्वपि कलशेषु ' हिरण्यरूप ' इति हिरण्यं, 'सहिरत्नानीति' पंचरत्नानि, ' गंधद्वार मिति' गंधं, 'याः फलिनीरिति ' पुष्पफलानि, गजाश्वरथ्यावल्मीकसंगमह्रदगो ष्ठमृदः, ' स्योनापृथिवीति ' प्रक्षिप्य, ' या ओषधीरिति ' सर्वौषधीः, ' ओषधय समिति' यवान्, 'कांडात्काडादिति दूर्वाः, 'अश्वत्थेव' इति पंचपल्लवान्[3] निक्षिप्य युवासुवासा इति सूत्रेण वाससा वा वेष्टितान्कलशकंठान् कृत्वा पुष्पमालादिभि कलशान् भूषयेत् ।**

नंतर मध्यम कुंभांत यव, व्रीहि (तांदूळ), तीळ, उडीद, राळे, सांवे व मूग हीं सप्त धान्यें गायत्री मंत्रानें घालावीं. हीं सप्त धान्यें घालतेवेळीं गायत्री मंत्र म्हणा वयास नको असें कित्येक वृद्ध म्हणतात. त्याप्रमाणेंच उंबर, कुश, दूर्वा, तांबडे कमळ, चंपक, बिल्व, विष्णुक्रांता, तुलसी, बर्हिष् (भटोरा), शंखपुष्पी (सांखवेल), शतावरी, अश्वगंधा, निर्गुंडी, तांबड्या व पिंवळ्या मोहऱ्या, अघाडा, पळस, फणस, जीवक (असाणा), राळे, गहूं, साळी, पिंपळ, दूध, दहीं, तूप, कमळाचें पान, निळें कमळ, पांढरी तांबडी व पिंवळी कोरांटी, गुंजा, वचा (वेखंड), भद्रक, (नागरमोथा) व मुस्तक (मोथा) हीं बत्तीस औषधें, किंवा त्यांपैकीं मिळतील तितकीं, तिन्हीं कलशांत टाकून, ' **हिरण्यरूपः०** ' या मंत्रानें सुवर्ण, ' **सहिरत्नानि०** ' या मंत्रानें पंचरत्नें, ' **गंधद्वारां०** ' या मंत्रानें गंध. ' **याः फलिनीः०** ' या मंत्रानें पुष्पें व फळें टाकावीं. गजस्थान, अश्वस्थान, रस्ता, वारूळ, नदीसंगम, डोह, व गोठा इतक्या ठिकाणच्या मृत्तिका ' **स्योना पृथिवी०** ' या मंत्रानें, व ' **या ओषधीः०** ' या

---

१. क. ङ. च. मध्यम । २ घ. नि सर्वाणि ३ ख. प्रक्षिप्य.

मंत्रानें सर्वौषधि, '**ओषधयःसं०**' या मंत्रानें यव, '**कांडात्कांडात्०**' या मंत्रानें दूर्वा, व '**अश्वत्थेव०**' या मंत्रानें पंचपल्लव, कुंभांत टाकावे. '**युवासुवासाः०**' या मंत्रानें कलशांच्या कंठांस सूत्र किंवा वस्त्र गुंडाळून फुलांच्या माळा इत्यादिकांनीं ते कलश सुशोभित करावे.

**ततः कलशानामुपरि धातुमयं वैणवं मृण्मयं वा पूर्णपात्रत्रयं स्वशक्त्यनुसारेण पूर्णादर्वीति मंत्रावृत्त्या निधाय। तदुपरि श्वेतवस्त्रत्रयं चंदनादिकृताष्टदलयुक्तं न्यसेत्। मध्यमे स्थापितप्रतिमायां भुवनेश्वरीमावाहयेत्[1]। गायत्र्याविश्वामित्रो भुवनेश्वरी गायत्री। भुवनेश्वरीपूजने विनियोगः। भुवनेश्वरीमावाहयामि। एवं दक्षिणकलशे इंद्राणीं। इंद्राणीमासु वृषाकपिरिंद्राणी पंक्तिः। इंद्राणीपूजने विनियोगः। इंद्राणीमास्विति ऋक् १ एवमुत्तरकलशे। इंद्रत्वा विश्वामित्र इंद्रो गायत्री इंद्रपूजने वि० 'इंद्रत्वा०' इति ऋक् १ ततो मध्यमकलशे। अंगाद्यावरणदेवताभ्यो नमः। अंगाद्यावरणदेवता आवाहयामीत्यावाह्य। सप्रणवगायत्र्यन्ते अंगाद्यावरणसहितायै भुवनेश्वर्यै आसनं समर्पयामीत्येवं षोडशोपचारैः भुवनेश्वरीं संपूज्य। उक्तमंत्राभ्यां कांडानुसमयेन इंद्राणींद्रयोः षोडशोपचारैः पूजां कुर्यात्। अशक्तौ भुवनेश्वर्या सहैव पदार्थानुसमयेन, नाममंत्राभ्यां वा तयोः पूजनम्।**

नंतर आपल्या शक्तीप्रमाणें धातूंचीं, वेणुमय ( कळकाचीं ) किंवा मातीचीं तीन पूर्णपात्रें त्या तीन कुंभांवर '**पूर्णादर्वी०**' हा मंत्र प्रत्येक वेळीं म्हणून स्थापन करून, त्यांवर चंदनादिकांनीं ज्यांवर अष्टदल काढलें आहे अशीं तीन वस्त्रें ठेवावीं. त्यांपैकीं मध्यमकुंभावर स्थापित केलेल्या प्रतिमेच्या ठिकाणीं भुवनेश्वरीदेवतेचें पुढील मंत्रानें आवाहन करावें. "**गायत्र्या विश्वामित्रो भुवनेश्वरी गायत्री, भुवनेश्वरी पूजने विनियोगः** [प्रणवासुद्धां गायत्रीमंत्र उच्चारून] **भुवनेश्वरीमावाहयामि**" असें म्हणून आवाहन करावें. याप्रमाणेंच दक्षिणेकडील कुंभावर "**इंद्राणीमासु वृषाकपिरिंद्राणी पंक्तिः। इंद्राणीपूजने विनियोगः। इंद्राणीमासु०**" या ऋचेनें इंद्राणीचें आवाहन करावें. त्याप्रमाणेंच उत्तरेकडील कुंभावर "**इंद्रत्वा विश्वामित्र इंद्रो गायत्री। इंद्रपूजने विनियोगः। इंद्रत्वा०**" या ऋचेनें इंद्राचें आवाहन करावें. नंतर मध्यम कुंभावर

[1] छ. अथ भुवनेश्वरी ध्यानम्। उद्यद्दिनद्युतिमिन्दुकिरिटां तुङ्गकुचां नयनत्रययुक्तां। स्मेरमुखीं वरदाङ्कुशपाशाभीतिकरां प्रभजे भुवनेश्वरीम्।

" **अंगाद्यावरणदेवताभ्योनमः अंगाद्यावरणदेवता आवाहयामि** "या मंत्रानें आवरण देवतांचें आवाहन करावें. प्रणवासुद्धां गायत्रीचा उच्चार करून " **अंगाद्यावरण सहितायै भुवनेश्वर्यै आसनं समर्पयामि** " याप्रमाणें षोडशोपचारांनीं भुवनेश्वरीची पूजा करावी. नंतर पूर्वीं सांगितलेल्या मंत्रांनीं कांडानुसमयानें (पृथक् पृथक्) इंद्राणी व इंद्र यांची षोडशोपचार पूजा करावी. शक्ति नसेल तर भुवनेश्वरीच्या पूजेबरोबरच पदार्थानुसमयानें ( एकतंत्रानें ) इंद्राणी व इंद्र यांची पूजा करावी. किंवा **इंद्राण्यैनमः, इंद्रायनमः** या नाममंत्रांनींच त्यांची पूजा करावी.

**ततो मध्यमं[1] कुंभं स्पृष्ट्वा आचार्योऽष्टसहस्रमष्टशतं वा गायत्रीं जप्त्वा श्रीसूक्तं जपेत् । हिरण्यवर्णामिति पंचदशर्चस्य सूक्तस्य कर्दमानंदचिक्लीतेंदिरासुता[2] ऋषयः, । श्रीर्देवता । आद्यास्तिस्रोऽनुष्टुभः, तत एका प्रस्तारपंक्तिः, ततो द्वे त्रिष्टुभौ, ततोष्टावनुष्टुभोऽन्त्या प्रस्तारपंक्तिः । जपेवि० । ॐहिरण्यवर्णामिति सूक्तम् ।**

नंतर मध्यम कुंभास स्पर्श करून आचार्यानें एक हजार आठ किंवा एकशें आठ गायत्रीचा जप करून नंतर श्रीसूक्ताचा जप करावा. "**हिरण्यवर्णामिति पंचदशर्चस्य सूक्तस्य कर्दमानंदचिक्लीतेंदिरासुता ऋषयः, श्रीर्देवता, आद्यास्तिस्रोऽनुष्टुभः, तत एका प्रस्तारपंक्तिः, ततो द्वे त्रिष्टुभौ ततोष्टावनुष्टुभोऽन्त्या प्रस्तारपंक्तिः जपेविनियोगः ॐ हिरण्यवर्णां०** " हें सूक्त म्हणावें.

**तत एक ऋत्विक् दक्षिणकुंभे रुद्रसूक्तानि जपेत् । यथा कद्रुद्रायेति नवर्चस्य सूक्तस्य घोरः कण्वो रुद्रो गायत्री । अन्त्यानुष्टुप् । जपेवि० । कद्रुद्रायेति सूक्तम् । इमारुद्रायतवस इत्येकादशर्चस्य सूक्तस्य कुत्सो रुद्र आद्या नव जगत्योऽन्त्ये द्वे त्रिष्टुभौ । जपे वि०। इमारुद्रायेति सूक्तं। आतेपितरिति पंचदशर्चस्य सूक्तस्य गृत्समदो रुद्रस्त्रिष्टुप्। जपेवि०। आतेपितर्मरुतांसुम्नमेत्विति सूक्तम् । इमारुद्रायस्थिरधन्वन इति चतसृणां वसिष्ठो रुद्र आद्यास्तिस्रो जगत्योऽन्त्या त्रिष्टुप् । जपेविनि० । इमारुद्रायस्थिरधन्वने० ४ । आवोराजानं वामदेवो रुद्रस्त्रिष्टुप् । जपे वि० । आवोराजानमध्व० । तमुष्टुहीत्यस्य भौमोऽत्री रुद्रस्त्रिष्टुप् । जपे वि० । तमष्टुहियःस्विषुः० । भुवनस्यपितरमृजिश्वा रुद्रस्त्रिष्टुप् । जपे वि० । भुवनस्य-**

१ घ. ध्य कुं. २ छ. तादय ।

पितरं० ऋक् । त्र्यंबकं वासिष्ठो रुद्रोऽनुष्टुप् । जपे विनि० । त्र्यंबकं० ऋक् । अन्य ऋत्विगुत्तरकलशं स्पृशन् । एकादशावृत्तिभी रुद्रं जपेत् । ततः शन्नइंद्राग्नीति पंचदशर्चस्य सूक्तस्य वासिष्ठो विश्वेदेवास्त्रिष्टुप् । जपे विनि० । शन्नइंद्राग्नीति सूक्तम् ।

नंतर एका ऋत्विजानें दक्षिणकुंभास स्पर्श करून रुद्रसूक्तें पठन करावीं. तीं येणें प्रमाणें:—" **कद्रुद्रायेति नवर्चस्य घोरः कण्वो रुद्रो गायत्री । अंत्यानुष्टुप् । जपे विनियोगः**" । [ असें म्हणून ] '**कद्रुद्राय०**' हें सूक्त म्हणावें. " **इमारुद्राय तवस इत्येकादशर्चस्य सूक्तस्य कुत्सो रुद्र आद्या नव जगत्योऽन्त्ये द्वे त्रिष्टुभौ । जपे विनियोगः । इमारुद्राय०** " हें सूक्त म्हणावें. " **आतेपितरिति पंचदशर्चस्य सूक्तस्य गृत्समदो रुद्रस्त्रिष्टुप् । जपे विनियोगः । आतेपितर्मरुतां०**" हें सूक्त म्हणावें. " **इमारुद्रायस्थिरधन्वन इति चतसृणां वसिष्ठो रुद्र आद्यास्तिस्रो जगत्योऽन्त्या त्रिष्टुप् । जपे विनियोगः । इमारुद्रायस्थिरधन्वने०** " या चार ऋचा म्हणाव्या. " **आवो राजानं वामदेवो रुद्रस्त्रिष्टुप् । जपे विनियोगः । आवो राजानं० । तमुष्टुहि इत्यस्य भौमोत्री रुद्रस्त्रिष्टुप् । जपे विनियोगः । तमुष्टुहि० । भुवनस्यपितरम् ऋजिश्वा रुद्रस्त्रिष्टुप् । जपे विनियोगः । भुवनस्यपितरं० । त्र्यंबकं वासिष्ठो रुद्रोऽनुष्टुप् । जपे विनियोगः । त्र्यंबकं०**" । दुसऱ्या ऋत्विजानें उत्तरेकडील कलशास स्पर्श करून रुद्राच्या अकरा आवृत्ति कराव्या. नंतर " **शन्नइंद्राग्नी इति पंचदशर्चस्य सूक्तस्य वसिष्ठो विश्वेदेवास्त्रिष्टुप् । जपे विनियोगः** " [याप्रमाणें म्हणून] '**शन्नइंद्राग्नी०**' [ या सूक्ताचें पठन करावें. ]

**मध्यकुंभपश्चिमे स्थंडिले अग्निस्थापनाग्निध्याने कृते । स्थापितकुंभैशान्यां वेद्यादौ नवग्रहाणां तदंगदेवतानां च तत्तन्मंत्रैरावाहनादि कुर्यात् । तद्यथा[1] । प्रणवस्य परब्रह्म ऋषिः । परमात्मा देवता । दैवीगायत्री छंदः । व्याहृतीनां क्रमेण विश्वामित्रजमदग्निभरद्वाजा[3] ऋषयः । अग्निर्वायुः सूर्यो देवताः । दैवीगायत्री**

१ घ. तत. २ । छ सौकर्यार्थं ग्रहपीठसंग्रहश्लोको लिख्यते । पंचास्रे कविमिन्दुमत्र चतुरस्रेंऽगारकं त्र्यस्रगे राहुं शूर्पनिभे धनुष्यथ शनिं केतुं ध्वजाभे तथा । दीर्घे कोणचतुष्टये सुरगुरुं बाणोपमे चन्द्रजं प्राचीतः क्रमतो लिखेद्ग्रहगणं मध्ये रविं वर्तुलमिति, शुक्रार्कौ प्राङ्मुखौ ज्ञेयौ गुरुसौम्यावुदङ्मुखौ । प्रत्यङ्मुखः शनिः सोमः शेषा दक्षिणतो मुखा **इति मत्स्यपुराणे** । आदित्याभिमुखाः सर्वे साधिप्रत्याधिदेवताः । स्थापनीया मुनि श्रेष्ठैः नान्तरेण पराङ्मुखा इति **महार्णवे** । ३ ग. ण जमदग्निभरद्वाजभृगव ।

दैव्युष्णिक् दैवीबृहत्यश्छन्दांसि। सूर्याद्यावाहने विनियोगः। तत्र ग्रहपीठस
वर्तुले द्वादशांगुले मंडले प्राङ्मुखं सूर्यं रक्तपुष्पाक्षतैः, आकृष्णेन हिरण
सविता त्रिष्टुप्। सूर्यावाहने विनियोगः। ॐ आकृष्णेन०। ॐ
स्वः कलिंगदेशोद्भव काश्यपसगोत्र सूर्येहागच्छेह[3] तिष्ठेति स्थापयेत् १
आग्नेये चतुरस्रे चतुर्विंशांगुले मंडले प्रत्यङ्मुखं सोमं श्वेतपुष्पाक्षतै
प्यायस्व गोतमः सोमो गायत्री। सोमावाहने वि०। ॐ आप्यायस्
ते०। ॐ भूर्भुवः स्वः यमुनातीरोद्भवात्रेयसगोत्र सोमेहागच्छेह तिष्ठेति
येत् २। ततो दक्षिणे त्रिकोणे त्र्यंगुले मंडले दक्षिणाभिमुखं भौमं रक्तपुष्प
अग्निर्मूर्धा विरूपोऽङ्गारको गायत्री। अंगारकावाहने विनि०। ॐ अग्नि
दिवःककु०। ॐ भूर्भुवः स्वः अवंतिदेशोद्भव[3] भारद्वाजसगोत्र भौमेहाग
तिष्ठेति स्थापयेत् ३। तत ईशान्ये बाणाकारे चतुरंगुले मंडले उदङ्मुखं
पीतपुष्पाक्षतैः, उद्बुध्यध्वं बुधः सौम्यो बुधस्त्रिष्टुप्। बुधावाहने विनि०
उद्बुध्यध्वंसमनसःसखायः०। ॐ भूर्भुवः स्वः मगधदेशोद्भवात्रेयसगोत्र बु
गच्छेह तिष्ठेति स्थापयेत् ४। तत उत्तरे दीर्घचतुरस्रे षडङ्गुले मंडले उद
बृहस्पतिं पीतपुष्पाक्षतैः, बृहस्पते गृत्समदो बृहस्पतिस्त्रिष्टुप्। बृहस्पत्या
विनि०। ॐ बृहस्पतेअतियदर्योअर्हाद्यु०। ॐ भूर्भुवः स्वः सिंधुदेशोद्भवा
सगोत्र बृहस्पते इहागच्छेह तिष्ठेति स्थापयेत् ५। ततः पूर्वे पंचकोणे नव
मंडले प्राङ्मुखं शुक्रं शुक्लपुष्पाक्षतैः, शुक्रः पराशरः शुक्रो द्विपदाविर
शुक्रावाहने विनि०। ॐ शुक्रःशुशुक्वाँ उषसोन०। ॐ भूर्भुवः स्वः भोज
देशोद्भव भार्गवसगोत्र शुक्रेहागच्छेह तिष्ठेति स्थापयेत् ६। ततः प
धनुराकारे द्व्यङ्गुले मंडले प्रत्यङ्मुखं शनिं कृष्णपुष्पाक्षतैः, शमग्निरिरिं
शनिरुष्णिक्। शन्यावाहने विनि०। ॐ शमग्निरग्नि०। ॐ भूर्भुवः स्वः
राष्ट्रदेशोद्भव काश्यपसगोत्र शनैश्चरेहागच्छेह तिष्ठेति स्थापयेत् ७।
नैर्ऋत्ये शूर्पाकारे द्वादशांगुले मंडले दक्षिणाभिमुखं राहुं कृष्णपुष्पाक्षतैः, कय
वामदेवो राहुर्गायत्री राह्वावाहने विनि०। ॐ कयानश्चित्रआभुव०। ॐ भू
स्वः राठिनापुरोद्भव पैठीनसगोत्र राहो इहागच्छेह तिष्ठेति स्थापयेत्

---

१ ज दैव्यनुष्टुप्। २ क. ख. घ. ङ. ज. च्छेत्यावाह्येह तिष्ठेति स्थापयेत्। ३ छ. ज
स. पु. न्ति समुद्भव।

**ततो वायव्ये ध्वजाकारे षडंगुले मंडले दक्षिणाभिमुखं केतुं धूम्रपुष्पाक्षतैः, केतुं मधुच्छंदाः केतुर्गायत्री। केत्वावाहने विनि०। ॐ केतुंकृण्वन्नकेतवे० । ॐ भूर्भुवः स्वः अंतर्वेदिसमुद्भव जैमिनिसगोत्र केतो इहागच्छेह तिष्ठेति स्थापयेत् १। यथोक्तकुसुमतंडुलाभावे यथालाभोपपन्नैः कुसुमतंडुलैः स्थापयेत्।**

मध्यमकुंभाच्या पश्चिमेस स्थंडिलावर अग्नीची स्थापना करून अग्नीचें ध्यान करावें. नंतर स्थापन केलेल्या कुंभाच्या ईशान्यदिशेस वेदी ( मातीचा ओटा वगैरे ) करून त्यांवर नवग्रहांचें व त्यांच्या अंगदेवतांचें त्या त्या मंत्रांनीं आवाहन करावें. तें येणेंप्रमाणें: “ **प्रणवस्य परब्रम्ह ऋषिः, परमात्मा देवता, दैवीगायत्रीछंदः, व्याहृतीनां क्रमेण विश्वामित्रजमदग्निभरद्वाजा ऋषयः, अग्निर्वायुः सूर्योदेवताः, दैवीगायत्री, दैव्युष्णिक्, दैवीबृहत्यश्छंदांसि, सूर्याद्यावाहने विनियोगः** ” त्या ग्रहपीठाच्या मध्यभागीं वर्तुलाकार द्वादशाङ्गुल ( बारा अंगुलें ज्याचें परिमाण आहे अशा ) मंडलावर “ **आकृष्णेन हिरण्यस्तूपः सविता त्रिष्टुप्। सूर्यावाहने विनियोगः। ॐ आकृष्णेन०। ॐ भूर्भुवः स्वः कलिंगदेशोद्भव काश्यपसगोत्र सूर्येहागच्छेह तिष्ठ** ” याप्रमाणें म्हणून, तांबडें पुष्प व अक्षता यांनीं सूर्याची, पूर्वाभिमुख स्थापना करावी. नंतर ( ग्रहपीठाच्या ) आग्नेयी दिशेस चौकोनी व चोवीस अंगुलें ज्याचें परिमाण आहे अशा मंडलावर “ **आप्यायस्व गोतमः सोमो गायत्री। सोमावाहने विनियोगः। ॐ आप्यायस्वसमेतुते०। ॐ भूर्भुवः स्वः यमुनातीरोद्भवात्रेयसगोत्र सोमेहागच्छेह तिष्ठ** ” असें म्हणून पांढरें पुष्प व अक्षता यांनीं पश्चिमाभिमुख चंद्राची स्थापना करावी. नंतर दक्षिणेस त्रिकोणाकार तीन अंगुलें प्रमाणाच्या मंडलावर “ **अग्निर्मूर्धा विरूपोऽगारको गायत्री। अंगारकावाहने विनियोगः। ॐ अग्निर्मूर्धादिवःककुत्०। ॐ भूर्भुवः स्वः अवंतिदेशोद्भव भारद्वाजसगोत्र भौमेहागच्छेह तिष्ठ** ” असें म्हणून तांबडें पुष्प व अक्षता यांनीं दक्षिणाभिमुख भौमाची ( मंगळाची ) स्थापना करावी. नंतर ईशान्यदिशेस बाणाकार चार अंगुलें प्रमाणाच्या मंडलावर “ **उद्बुध्यध्वं बुधः सौम्यो बुधस्त्रिष्टुप्। बुधावाहने विनियोगः। ॐ उद्बुध्यध्वंसुमनसःसखायः०। ॐ भूर्भुवः स्वः मगधदेशोद्भवात्रेयसगोत्र बुधेहागच्छेह तिष्ठ** ” असें म्हणून पिंवळें पुष्प व अक्षता यांनीं उत्तराभिमुख बुधाची स्थापना करावी. नंतर उत्तरेस दीर्घचतुष्कोण मंडलावर “ **बृहस्पते गृत्समदो बृहस्पति-**

---

१ छ. भमुप।

**त्रिष्टुप् । बृहस्पत्यावाहने विनियोगः । ॐ बृहस्पतेअतियदर्यो० । ॐ भूर्भुव सिंधुदेशोद्भवांगिरसगोत्र बृहस्पते इहागच्छेह तिष्ठ"** असें म्हणून पिंवळीं व अक्षता यांनीं,उत्तराभिमुख बृहस्पतीची स्थापना करावी. नंतर पूर्वेस पंचकोण नवांगु डलावर **"शुक्रःपराशरः शुक्रो द्विपदाविराट्। शुक्रावाहने विनियोगः।ॐ शुक्रःशु ॐ भूर्भुवः स्वः भोजकटदेशोद्भव भार्गवसगोत्र शुक्रेहागच्छेह तिष्ठ "** म्हणून, पांढरीं फुलें व अक्षता यांनीं, पूर्वाभिमुख शुक्राची स्थापना करावी. नंतर प धनुष्याकार दोन अंगुलें प्रमाणाच्या मंडलावर **" शमग्निरिरिंबिठिः शनिरुष्णि शन्यावाहने विनियोगः । ॐ शमग्निरग्नि०। ॐ भूर्भुवः स्वः सौराष्ट्रदेशो काश्यपसगोत्र शनैश्चरेहागच्छेह तिष्ठ "** याप्रमाणें म्हणून काळीं पुष्पें व अ यांनीं पश्चिमाभिमुख शनीची स्थापना करावी. नंतर नैर्ऋत्येस शूर्पाकार ( ज आकार सुपासारखा आहे ) अशा बारा अंगुलें प्रमाणाच्या मंडलावर **"कयानो देवो राहुर्गायत्री । राव्हावाहने विनियोगः । ॐ कयानश्चित्रआभुव० । ॐ भू स्वः राठिनापुरोद्भव पैठीनसगोत्र राहो इहागच्छेह तिष्ठ "** असें म्हणून, पुष्पें व अक्षता यांनीं, दाक्षिणाभिमुख राहूची स्थापना करावी. नंतर वायव्य दिशेस ध्व कार सहा अंगुलें प्रमाणाच्या मंडलावर **" केतुं मधुच्छंदाः केतुर्गायत्री। केत्वाव विनियोगः। ॐ केतुंकृण्वन्० । ॐ भूर्भुवः स्वः अंतर्वेदिसमुद्भव जैमिनिस केतो इहागच्छेह तिष्ठ"** असें म्हणून धूम्र ( धुरकटरंगाचीं ) पुष्पें व अक्षता दक्षिणाभिमुख केतूची स्थापना करावी. सांगितलेल्या प्रकारचीं पुष्पें व अक्षता न मि तील तर ज्या प्रकारचीं मिळतील त्यांनींच ग्रहांची स्थापना करावी.

**अथाधिदेवताः। त्र्यंबकं वसिष्ठो रुद्रोऽनुष्टुप् । रुद्रावाहने विनि० । ॐ बकंयजामहे० । ॐ भूर्भुवः स्वः सूर्यदक्षिणपार्श्वे ईश्वरेहागच्छेह तिष्ठेति स्थ येत् १। गौरीर्मिमा दीर्घतमा उमा जगती। उमावाहने विनि०। ॐ गौरीर्मिमाय लिला० । ॐ भूर्भुवः स्वः उमे इहागच्छेह तिष्ठेति सोमदक्षिणपार्श्वे स्थापयेत् २। यदक्रंदो दीर्घतमा स्कन्दस्त्रिष्टुप्। स्कंदावाहने विनि०। ॐ यदक्रंद थमं० । ॐ भूर्भुवः स्वः स्कंदेहागच्छेह तिष्ठेति भौमदक्षिणपार्श्वे स्कंदं स्थ येत् ३। विष्णोर्नुकं दीर्घतमा नारायणस्त्रिष्टुप्। नारायणावाहने विनियोगः विष्णोर्नुकंवीर्याणि० । ॐ भूर्भुवः स्वः नारायणेहागच्छेह तिष्ठेति बुधद णपार्श्वे नारायणं स्थापयेत् ४। ब्रह्मजज्ञानं वामदेवो ब्रह्मा त्रिष्टुप्। ब्रह्मावाहने वि ॐ ब्रह्मजज्ञानंप्रथमं० । ॐ भूर्भुवः स्वः ब्रह्मन्निहागच्छेह तिष्ठेति बृहस्पतिद**

णपार्श्वे ब्रह्माणं स्थापयेत् ५। इन्द्रंवो मधुच्छंदा इन्द्रो गायत्री। इन्द्रावाहने विनियोगः। ॐ इन्द्रंवोविश्वतस्परि०। ॐ भूर्भुवः स्वः इन्द्रेहागच्छेह तिष्ठेति शुक्रदक्षिणपार्श्वे इन्द्रं स्थापयेत् ६। यमायसोमं वैवस्वतो यमो यमोऽनुष्टुप्। यमावाहने विनियोगः। ॐ यमायसोमंसुनुत०। ॐ भूर्भुवः स्वः यमेहागच्छेह तिष्ठेति शनैश्वरदक्षिणपार्श्वे यमं स्थापयेत् ७। मोषुणो घौरः कण्वः कालो गायत्री। कालावाहने विनियोगः। ॐ मोषुणःपरापरा०। ॐ भूर्भुवः स्वः कालेहागच्छेह तिष्ठेति राहुदक्षिणपार्श्वे कालं स्थापयेत् ८। उषोवाजं प्रस्कण्वश्चित्रगुप्तो बृहती। चित्रगुप्तावाहने विनियोगः। ॐ उषोवाजंहिवंस्व०। ॐ भूर्भुवः स्वः चित्रगुप्तेहागच्छेह तिष्ठेति केतुदक्षिणपार्श्वे चित्रगुप्तं स्थापयेत् ९।

आतां अधिदेवता ( प्रत्येक ग्रहाच्या उजव्या बाजूस स्थापन करावयाच्या देवता ) सांगतों. " त्र्यंबकं वसिष्ठो रुद्रोऽनुष्टुप्। रुद्रावाहने विनियोगः। ॐ त्र्यंबकंयजामहे०। ॐ भूर्भुवः स्वः ईश्वरेहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून सूर्याच्या दक्षिणबाजूस रुद्राची ( शंकराची ) स्थापना करावी. " गौरीर्मिमा दीर्घतमा उमा जगती। उमावाहने विनियोगः। ॐ गौरीर्मिमाय०। ॐ भूर्भुवः स्वः उमे इहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून चंद्राच्या दक्षिणबाजूस उमेची स्थापना करावी. " यदक्रन्दो दीर्घतमाः स्कंदस्त्रिष्टुप्। स्कंदावाहने विनियोगः। ॐ यदक्रंदःप्रथमं०। ॐ भूर्भुवः स्वः स्कंदेहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून मंगळाच्या दक्षिणबाजूस स्कंदाची ( कार्तिकस्वामीची ) स्थापना करावी. " विष्णोर्नुकं दीर्घतमा नारायणस्त्रिष्टुप्। नारायणावाहने विनियोगः। ॐ विष्णोर्नुकं०। ॐ भूर्भुवः स्वः नारायणेहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून बुधाच्या दक्षिणबाजूस नारायणाची स्थापना करावी. " ब्रह्मजज्ञानं वामदेवो ब्रह्मा त्रिष्टुप्। ब्रह्मावाहने विनियोगः। ॐ ब्रह्मजज्ञानंप्रथमं०। ॐ भूर्भुवः स्वः ब्रह्मन्निहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून बृहस्पतीच्या दक्षिणबाजूस ब्रह्मदेवाची स्थापना करावी. " इंद्रंवो मधुच्छंदा इंद्रो गायत्री। इंद्रावाहने विनियोगः। ॐ इंद्रंवोविश्वतः०। ॐ भूर्भुवः स्वः इंद्रेहागच्छेह तिष्ठ " याप्रमाणें म्हणून शुक्राच्या दक्षिणबाजूस इंद्राची स्थापना करावी. " यमायसोमं वैवस्वतो यमो यमोऽनुष्टुप्। यमावाहने विनियोगः। ॐ यमायसोमंसुनुत०। ॐ भूर्भुवः स्वः यमेहागच्छेह तिष्ठ" असें म्हणून शनीच्या दक्षिणबाजूस यमाची स्थापना करावी. " मोषुणो घौरः कण्वः कालो गायत्री। कालावाहने विनियोगः ॐ मोषुणः परापरा० ॐ भूर्भुवः स्वः कालेहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून राहूच्या दक्षिणबाजूस कालाची स्थापना करावी. " उषोवाजं प्रस्कण्वश्चित्रगुप्तो बृहती। चित्रगुप्तावाहने

विनियोगः । ॐ उषोवाजं०। ॐ भूर्भुवः स्वः चित्रगुप्तेहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून केतूच्या दक्षिणबाजूस चित्रगुप्ताची स्थापना करावी.

ततः शुक्लपुष्पाक्षतैः सर्वाः प्रत्यधिदेवताः स्थापयेत् । अग्निंदूतं काण्वो मेधातिथिरग्निर्गायत्री । अग्न्यावाहने० । ॐ अग्निंदूतंवृणीमहे० । ॐ भूर्भुवः स्वः अग्ने इहागच्छेह तिष्ठेति सूर्यवामपार्श्वेऽग्निं स्थापयेत् १ । अप्सुमे मेधातिथिरापोऽनुष्टुप् । अबावा० । ॐ अप्सुमेसोमो० । ॐ भूर्भुवः स्वः आपः इहागच्छतेह तिष्ठतेति सोमवामपार्श्वे अपः स्थापयेत् २ । स्योना मेधातिथिर्भूमिर्गायत्री । भूम्यावाहने विनि० । ॐ स्योनापृथिवि०। ॐ भूर्भुवः स्वः भूमे इहागच्छेह तिष्ठेति भौमवामपार्श्वे भूमिं स्थापयेत् ३ । इदंविष्णुर्मेधातिथिर्विष्णुर्गायत्री । विष्ण्वावाहने विनियोगः । ॐ इदंविष्णुर्वि० । ॐ भूर्भुवः स्वः विष्णो इहागच्छेह तिष्ठेति बुधवामपार्श्वे विष्णुं स्थापयेत् ४। इंद्रश्रेष्ठानि गृत्समद इंद्रस्त्रिष्टुप् । इंद्रावाहने० । ॐ इंद्रश्रेष्ठानि० । ॐ भूर्भुवः स्वः इंद्रेहागच्छेह तिष्ठेति बृहस्पतिवामपार्श्वे इंद्रं स्थापयेत्५। इंद्राणी वृषाकपिरिंद्राणी पंक्तिः । इंद्राण्यावा०। ॐ इंद्राणीमासुनारिषु० । ॐ भूर्भुवः स्वः इंद्राणि इहागच्छेह तिष्ठेति शुक्रवामपार्श्वे इंद्राणीं स्थापयेत् ६ । प्रजापते हिरण्यगर्भः प्रजापतिस्त्रिष्टुप् । प्रजापत्यावाह०।ॐ प्रजापतेनत्व०। ॐ भूर्भुवः स्वः प्रजापते इहागच्छेह तिष्ठेति शनिवामपार्श्वे प्रजापतिं स्थापयेत् ७ । आयंगौः सार्पराज्ञी सर्पा गायत्री। सर्पावाहने० । ॐ आयंगौ पृश्नि० । ॐ भूर्भुवः स्वः सर्पा इहागच्छेतेह तिष्ठतेति राहुवामपार्श्वे सर्पान् स्थापयेत् ८। ब्रह्मजज्ञानं वामदेवो ब्रह्मा त्रिष्टुप्। ब्रह्मावाहने०।ॐब्रह्मजज्ञानं०। ॐ भूर्भुवः स्वः ब्रह्मन्निहागच्छेह तिष्ठेति केतुवामपार्श्वे ब्रह्माणं स्थापयेत् ९ ।

नंतर पांढरीं फुलें व अक्षता यांनीं सर्व प्रत्यधिदेवतांची ( प्रत्येक ग्रहाच्या डाव्या बाजूस स्थापन करावयाच्या देवतांची ) स्थापना करावी. " अग्निं दूतं काण्वो मेधातिथिरग्निर्गायत्री। अग्न्यावाहने विनियोगः। ॐ अग्निंदूतंवृणीमहे० । ॐ भूर्भुवः स्वः अग्ने इहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून सूर्याच्या डाव्याबाजूस अग्नीची स्थापना करावी. " अप्सुमे मेधातिथिरापोऽनुष्टुप् । अबावाहने विनियोगः । ॐ अप्सुमे सोमो०। ॐ भूर्भुवः स्वः आप इहागच्छतेह तिष्ठत " असें म्हणून चंद्राच्या डाव्या बाजूस उदकांची ( जलदेवतेची ) स्थापना करावी. " स्योना मेधातिथिर्भूमिर्गायत्री। भूम्यावाहने विनियोगः। ॐ स्योनापृथिवि०। ॐ भूर्भुवः स्वः भूमे इहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून मंगळाच्या डाव्याबाजूस भूमीची स्थापना करावी. " इदं विष्णु-

मेधातिथिर्विष्णुर्गायत्री । विष्ण्वावाहने विनियोगः । ॐ इदंविष्णुर्विचक्रमे० । ॐ भूर्भुवः स्वः विष्णो इहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून बुधाच्या डाव्याबाजूस विष्णूची स्थापना करावी. " इंद्रश्रेष्ठानि गृत्समद इंद्रस्त्रिष्टुप् । इंद्रावाहने विनियोगः। ॐ इंद्रश्रेष्ठानि०। ॐ भूर्भुवः स्वः इन्द्रेहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून बृहस्पतीच्या डाव्या बाजूस इंद्राची स्थापना करावी. " इंद्राणीं वृषाकपिरिंद्राणी पंक्तिः। इंद्राण्यावाहने विनियोगः। ॐ इंद्राणीमासुनारिषु०। ॐ भूर्भुवः स्वः इंद्राणि इहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून शुक्राच्या डाव्याबाजूस इंद्राणीची स्थापना करावी. " प्रजापते हिरण्यगर्भः प्रजापतिस्त्रिष्टुप् । प्रजापत्यावाहने विनियोगः। ॐ प्रजापतेन०। ॐ भूर्भुवः स्वः प्रजापते इहागच्छेह तिष्ठ " असें म्हणून शनीच्या डाव्याबाजूस प्रजापतीची स्थापना करावी. "आयंगौः सार्पराज्ञी सर्पा गायत्री। सर्पावाहने विनियोगः। ॐ आयंगौः पृश्नि० । ॐ भूर्भुवः स्वः सर्पा इहागच्छतेह तिष्ठत " असें म्हणून राहूच्या डाव्याबाजूस सर्पांची स्थापना करावी. "ब्रह्मजज्ञानं वामदेवो ब्रह्मा त्रिष्टुप्। ब्रह्मावाहने विनियोगः । ॐ ब्रह्मजज्ञानं०। ॐ भूर्भुवः स्वः ब्रह्मन्निहागच्छेह तिष्ठ" असें म्हणून केतूच्या डाव्याबाजूस ब्रह्मदेवाची स्थापना करावी.

ततः शुक्लपुष्पाक्षतैर्विनायकादिपंचदेवताः स्थापयेत्। गणानांत्वा शौनको गृत्समदो गणपतिर्जगती । गणपत्यावाह० । ॐ गणानांत्वागणपतिं० । ॐ भूर्भुवः स्वः गणपते इहागच्छेह तिष्ठेति राहोरुत्तरतो विनायकं स्थापयेत् १। जातवेदसे मारीचः कश्यपो दुर्गा त्रिष्टुप् । दुर्गावाहने०। ॐ जातवेदसे०। ॐ भूर्भुवः स्वः दुर्गे इहागच्छेह तिष्ठेति शनेरुत्तरतो दुर्गां स्थापयेत् २ । तववायो व्यश्वांगिरसो वायुर्गायत्री । वाय्वावाहने० । ॐ तववायवृतस्पते० । ॐ भूर्भुवः स्वः वायो इहागच्छेह तिष्ठेति रवेरुत्तरतो वायुं स्थापयेत् ३ । आदित् वत्स आकाशो गायत्री । आकाशावाहने वि० । ॐ आदित्प्रत्नस्यरेतसो० । ॐ भूर्भुवः स्वः आकाशेहागच्छेह तिष्ठेति राहोर्दक्षिणे आकाशं स्थापयेत् । एषोउषाः प्रस्कण्वोऽश्विनौ गायत्री । अश्व्यावाहने०। ॐ एषोउषा अपूर्व्या०। ॐ भूर्भुवः स्वः अश्विनाविहागच्छतमिह तिष्ठतामिति केतोर्दक्षिणेऽश्विनौ स्थापयेत् ५। यद्वा विनायकादीन्पंचोत्तरत एव स्थापयेत्.

नंतर पांढरीं फुलें व अक्षता यांनीं विनायकादिक पांच देवतांचें स्थापन करावें. "गणा-

१ प्र ग्रते।

नांत्वा गृत्समदो गणपतिर्जगती। गणपत्यावाहने विनियोगः। ॐ गणानांत्वा०। ॐ भूर्भुवः स्वः गणपते इहागच्छेह तिष्ठ" असें म्हणून राहूच्या उत्तरबाजूस विनायकाची स्थापना करावी. "जातवेदसे मारीचः कश्यपो दुर्गा त्रिष्टुप्। दुर्गावाहने विनियोगः।ॐ जातवेदसे०। ॐ भूर्भुवः स्वः दुर्गे इहागच्छेह तिष्ठ" असें म्हणून शनीच्या उत्तरबाजूस दुर्गेची स्थापना करावी. "तववायो व्यश्वांगिरसो वायुर्गायत्री। वाय्वावाहने विनियोगः। ॐ तववायवृतस्पते०। ॐ भूर्भुवः स्वः वायो इहागच्छेह तिष्ठ" असें म्हणून सूर्याच्या उत्तरेस वायूची स्थापना करावी. "आदित् वत्स आकाशो गायत्री आकाशावाहने विनियोगः। ॐ आदित्प्रत्नस्य०। ॐ भूर्भुवः स्वः आकाशेहागच्छेह तिष्ठ" असें म्हणून राहूच्या दक्षिणेस आकाशाची स्थापना करावी. "एषो उषाः प्रस्कण्वोऽश्विनौ गायत्री। अश्व्यावाहने विनियोगः। ॐ एषोउषाअपूर्व्या०। ॐ भूर्भुवः स्वः अश्विनाविहागच्छतमिह तिष्ठतं" असें म्हणून केतूच्या दक्षिणेस अश्विनी-कुमारांची स्थापना करावी. किंवा विनायकादिक पांच देवता उत्तरेसच स्थापन कराव्या.

ततो ग्रहपीठाद्यङ्गतया वक्ष्यमाणदेवताः स्थापयेत्। उत्तरे क्षेत्राधिपतिं वास्तोष्पतिं चावाहयेदित्येके। क्षेत्रस्य वामदेवः क्षेत्राधिपतिरनुष्टुप्। क्षेत्राधिपत्यावा०। ॐ क्षेत्रस्यपतिना०। ॐ भूर्भुवः स्वः क्षेत्राधिपते[1] इहागच्छेह तिष्ठेति क्षेत्राधिपतिं[2] स्थापयेत्। वास्तोष्पते वसिष्ठो वास्तोष्पतिस्त्रिष्टुप्। वास्तोष्पत्यावाहने०। ॐ वास्तोष्पते०। ॐ भूर्भुवः स्वः वास्तोष्पते इहागच्छेह तिष्ठेति[3] तदुत्तरे वास्तोष्पतिं स्थापयेत्।

नंतर ग्रहपीठादिकांच्या अंगत्वेंकरून पुढें सांगितलेल्या देवतांचें स्थापन करावें. [ अश्विनीकुमारांच्या ] उत्तरभागीं क्षेत्राधिपति व वास्तोष्पति या दोन देवतांचें आवाहन करावें असें कोणी म्हणतात. [ त्यांचे मंत्र सांगतों ] "क्षेत्रस्य वामदेवः क्षेत्राधिपतिरनुष्टुप्। क्षेत्रपत्यावाहने विनियोगः। ॐ क्षेत्रस्यपतिना०। ॐ भूर्भुवः स्वः क्षेत्राधिपते इहागच्छेह तिष्ठ" असें म्हणून क्षेत्राधिपतीची स्थापना करावी. "वास्तोष्पते वसिष्ठो वास्तोष्पतिस्त्रिष्टुप्। वास्तोष्पत्यावाहने विनियोगः। ॐ वास्तोष्पते०। ॐ भूर्भुवः स्वः वास्तोष्पते इहागच्छेह तिष्ठ" असें म्हणून त्याच्या (क्षेत्राधिपतीच्या) उत्तरेस वास्तोष्पतीची स्थापना करावी.

---

१ छ. त्र पाले। २ छ. त्र पालं. ३ घ. च. ति उत्तरे.

तत इंद्रादिलोकपालान् सूर्याभिमुखानावाहयेत् । तत्र मंत्राः । इंद्रंविश्वा जेतामाधुच्छंदस इंद्रोऽनुष्टुप् । पूर्वे, इंद्रावाहने वि० । ॐ इंद्रंविश्वाअवीवृधन्० । ॐ भूर्भुवः स्वः इंद्रेहागच्छेह तिष्ठेति पूर्ववत् १ । एवमुत्तरत्रापि । अग्निं काण्वो मेधातिथिरग्निर्गायत्री । अग्न्यावाहने वि० । ॐ अग्निंदूतंवृणीमहे० । आग्नेये २ । यमायसोमं यमो यमोऽनुष्टुप् । यमावाहने० । ॐ यमायसोमं० । दक्षिणे ३ । मोषुणोघोरः कण्वो निर्ऋतिर्गायत्री । निर्ऋत्यावाह० । ॐ मोपुणःपरापरा० । नैर्ऋत्ये ४ । तत्त्वायामि शुनःशेपो वरुणस्त्रिष्टुप् । वरुणावाह० । ॐ तत्त्वायामिब्रह्मणा० । पश्चिमे ५ । तववायो व्यश्व आंगिरसो वायुर्गायत्री । वाय्वावाह० । ॐ तववायवृतस्पते० । वायव्ये ६ । सोमोधेनुं गोतमः सोमस्त्रिष्टुप् । सोमावाहने० । ॐ सोमोधेनुं० । उत्तरे ७ । तमीशानं गोतम ईशानो जगती । ईशानावाह० । ॐ तमीशानंजगत० । ऐशाने ८ । एवमीशानांता देवता आवाह्य । तदस्तुमित्रावरुणा० । गृहावैप्रतिष्ठा० । एवं प्रतिष्ठाप्योक्ततत्तन्मंत्रैः 'आदित्यायनम' इत्येवमादिभिर्नाममंत्रैर्वा षोडशोपचारैः संपूज्य । मंत्रहीनं क्रियाहीनमिति क्षमाप्य । ग्रहवेदीशानभागे । महीद्यौःपृथिवीचन० इत्यादिविधिना कलशस्थापनं कृत्वा । तदुपरि तत्त्वायामीति मंत्रेण वरुणं संपूज्य । तत्र कलशे समुद्रनद्याद्यावाहनं कुर्यात् । सर्वे समुद्राः सरितस्तीर्थानि जलदा नदाः । आयांतु यजमानस्य दुरितक्षयकारकाः । ततः कलशाभिमंत्रणम् । कलशस्य मुखे विष्णुः० । मूले तत्र स्थितो० । कुक्षौ तु सागराः० । ऋग्वेदोऽथ० । अंगैश्च सहिताः० । अत्र गायत्री सावित्री० । आयांतु मम० कारका इत्यंतम् । ततः कलशप्रार्थना । देवदानवसंवादे मथ्यमाने महोदधौ । उत्पन्नोऽसि तदा कुंभ विधृतो विष्णुना स्वयम् । त्वत्तोये सर्वतीर्थानि देवाः सर्वे त्वयि स्थिताः । त्वयि तिष्ठंति भूतानि त्वयि प्राणाः प्रतिष्ठिताः । शिवः स्वयं त्वमेवासि विष्णुस्त्वं च प्रजापतिः । आदित्या वसवो रुद्रा विश्वेदेवाः सपैतृकाः । त्वयि तिष्ठंति सर्वेऽपि यतः कामफलप्रदाः । त्वत्प्रसादादिमं यज्ञं कर्तुमीहे जलोद्भव । सान्निध्यं कुरु देवेश प्रसन्नो भव सर्वदा ।

नंतर इंद्रादिकलोकपालांचें सूर्याभिमुख आवाहन करावें. त्या आवाहनाचे मन्त्र असेः— "इंद्रंविश्वा जेता माधुच्छंद इंद्रोऽनुष्टुप् । इंद्रावाहने विनियोगः । ॐ इंद्रंविश्वाअवीवृधन्० । ॐ भूर्भुवःस्वः इंद्रेहागच्छेह तिष्ठ" असें म्हणून पूर्वीप्रमाणें पूर्वदिशेस

---

१ छ. मम शान्त्यर्थं ।

इंद्राची स्थापना करावी. याप्रमाणें पुढेंही जाणावें. " **अग्निं काण्वो मेधातिथिरग्निर्गायत्री। अग्न्यावाहने विनियोगः । ॐ अग्निंदूतंवृणीमहे०। ॐ भूर्भुवः स्वः अग्ने इहागच्छेह तिष्ठ** " असें म्हणून आग्नेयदिशेस अग्नीची स्थापना करावी. " **यमाय सोमं यमो यमोऽनुष्टुप् । यमावाहने विनियोगः । ॐ यमायसोमं०। ॐ भूर्भुवः स्वः यमेहागच्छेह तिष्ठ**" असें म्हणून दक्षिणदिशेस यमाची स्थापना करावी. "**मोषुणोघौरः कण्वो निर्ऋतिर्गायत्री। निर्ऋत्यावाहने विनियोगः। ॐ मोषुणः परापरा०। ॐ भूर्भुवःस्वः निर्ऋते इहागच्छेह तिष्ठ** " असें म्हणून नैर्ऋत्यदिशेस निर्ऋतीची स्थापना करावी. " **तत्वायामि शुनःशेपो वरुणस्त्रिष्टुप् । वरुणावाहने विनियोगः। ॐ तत्वायामिब्रह्मणा०। ॐ भूर्भुवः स्वः वरुणेहागच्छेह तिष्ठ** " असें म्हणून पश्चिमदिशेस वरुणाची स्थापना करावी. " **तववायो व्यश्व आंगिरसो वायुर्गायत्री वाय्वावाहने विनियोगः। ॐ तववायवृतस्पते०। ॐ भूर्भुवः स्वः वायो इहागच्छेह तिष्ठ** " असें म्हणून वायव्यदिशेस वायूची स्थापना करावी. "**सोमो धेनुं गोतमः सोमस्त्रिष्टुप्। सोमावाहने विनियोगः। ॐ सोमो धेनुं०। ॐ भूर्भुवः स्वः सोमेहागच्छेह तिष्ठ** " असें म्हणून उत्तरेस सोमाची स्थापना करावी. " **तमीशानं गोतम ईशानो जगती। ईशानावाहने विनियोगः।ॐ तमीशानं जगतः०।ॐ भूर्भुवः स्वः ईशानेहागच्छेह तिष्ठ**" असें म्हणून ईशान्येस ईशानाची (शंकराची) स्थापना करावी. याप्रमाणें ईशानान्त ( ईशान ज्याच्या शेंवटीं आहे अशा ) देवतांचें आवाहन करून " **तदस्तुमित्रावरुणा०, गृहावैप्रतिष्ठा०**" या दोन मंत्रांनीं त्यांची स्थापना करून, पूर्वीं सांगितलेल्या त्या त्या देवतांच्या मंत्रांनीं, किंवा " **आदित्याय नमः** " इत्यादिकनाममंत्रांनीं, त्यांची षोडशोपचार पूजा करावी. नंतर " **मंत्रहीनं क्रियाहीनं०** " इत्यादि म्हणून त्यांची प्रार्थना करावी. नंतर ग्रहवेदीच्या ईशान्यभागीं '**महीद्यौः पृथिवीचन०।**' इत्यादि मंत्रांनीं कलशाची स्थापना करून त्यावर ' **तत्वायामि०**' या मंत्रानें वरुणाची पूजा करून त्या कलशाचे ठिकाणीं समुद्र व नद्या, यांचें आवाहन करावें. " **सर्वे समुद्राः सरितस्तीर्थानि जलदा नदाः॥ आयांतु यजमानस्य दुरितक्षयकारकाः** " नंतर कलशाचें अभिमंत्रण करावें. " **कलशस्य मुखे विष्णुः०।" मूले तत्र स्थितो०। कुक्षौ तु सागराः०। ऋग्वेदोऽथ०। अंगैश्च सहिताः०। अत्र गायत्री सावित्री०। आयांतु०** " याप्रमाणें श्लोक म्हणावे. नंतर " **देवदानवसंवादे मथ्यमाने महोदधौ। उत्पन्नोऽसि तदा कुंभ विधृतो विष्णुना स्वयम्। त्वत्तोये सर्वतीर्थानि देवाः सर्वे त्वयि स्थिताः। त्वयि तिष्ठंति भूतानि त्वयि प्राणाः प्रतिष्ठिताः। शिवः स्वयं त्वमेवासि**

विष्णुस्त्वं च प्रजापतिः । आदित्या वसवो रुद्रा विश्वेदेवाः सपैतृकाः । त्वयि तिष्ठंति सर्वेऽपि यतः कामफलप्रदाः । त्वत्प्रसादादिमं यज्ञं कर्तुमीहे जलोद्भव । " सान्निध्यं कुरु देवेश प्रसन्नो भव सर्वदा." याप्रमाणें कलशाची प्रार्थना करावी.

ततः आचार्योऽन्वाधानं कुर्यात् । तत्र प्रधानकीर्तने विशेषः । सूर्यं, सोमं, भौमं, बुधं, बृहस्पतिं, शुक्रं, शनिं, राहुं, केतुं, एताः प्रधानदेवता एतत्संख्याकाभिः अर्कादिजातीयसमिदाहुतिभिः तावतीभिश्चर्वाहुतिभिराज्याहुतिभिश्च । एतादित्येतत्स्थानेऽष्टोत्तरशतमष्टाविंशतिं वा कीर्तयेत् । ईश्वरं, उमां, स्कंदं, नारायणं, ब्रह्माणं, इंद्रं, यमं, कालं, चित्रगुप्तं, अग्निं, अपः, भूमिं, विष्णुं, इंद्रं, इंद्राणीं, प्रजापतिं, सर्पान्, ब्रह्माणं, एता देवता एतत्संख्याकाभिः समिदाद्याहुतिभिः । अत्र एतदित्यस्य स्थाने पूर्वसंख्यान्यूनां अष्टाविंशतिसंख्यामष्टसंख्यां वा कीर्तयेत् । विनायकं, दुर्गां, वायुं, आकाशं, अश्विनौ, क्षेत्रपालं, वास्तोष्पतिं, इंद्रं, अग्निं, यमं, निर्ऋतिं, वरुणं, वायुं, सोमं, ईशानं, एता देवता एतत्संख्याकाभिः समिदाहुतिभिः । एतदित्यस्य स्थाने अष्टसंख्यां चतुःसंख्यां वा कीर्तयेत् । भुवनेश्वरीमष्टोत्तरसहस्रसंख्याकाभिर्दूर्वाहुतिभिः तिलमिश्रगोधूमाहुतिभिः पायसाहुतिभिराज्याहुतिभिश्च । तावतीनामसंभवेऽष्टोत्तरशतं वा । भुवनेश्वरीमित्येतस्य स्थाने सवितारमिति वा । इंद्राणीमिंद्रं च एतत्संख्याकाभिर्दूर्वादिचतुर्विधाहुतिभिः । अत्र एतदित्यस्य स्थाने पूर्वसंख्यान्यूनसंख्यां कीर्तयेत् । देवताद्वयमुद्दिश्य नान्वाधानं वा । शेषेण-स्विष्टकृतमित्यादि० । ततः पात्रासादनकाले स्थालीद्वयं प्रोक्षणीं दर्वीं स्रुवमित्यादि । युगपदनेककर्तृकाज्यहोमप्रसक्तौ अनेकस्रुवासादनं कुर्यात् । निर्वापकाले भुवनेश्वर्यादिदेवतात्रयमुद्दिश्य तूष्णीं निर्वापप्रोक्षणे । तत आज्यसंस्कारः ।

नंतर आचार्यानें अन्वाधान करावें. त्यांत प्रधानदेवतांचें उच्चारण पुढें सांगितल्याप्रमाणें करावें. " सूर्यं, सोमं, भौमं, बुधं, बृहस्पतिं, शुक्रं, शनिं, राहुं, केतुं, एताः प्रधानदेवता एतत्संख्याकाभिः अर्कादिजातीयसमिदाहुतिभिः तावतीभिश्चर्वाहुतिभिराज्याहुतिभिश्च " ' एतत् ' या पदाच्या स्थानीं ' अष्टोतर शत ' ( १०८ ) किंवा ' अष्टाविंशति ' ( २८ ) या पदाचा उच्चार करावा. ( ह्म० अष्टोत्तरशतसंख्याकाभिः ' किंवा ' अष्टाविंशतिसंख्याकाभिः ' याप्रमाणें जसें करावयाचें असेल त्याप्रमाणें ह्मणावें ) " ईश्वरं, उमां, स्कंदं, नारायणं, ब्रह्माणं, इंद्रं, यमं, कालं, चित्रगुप्तं, अग्निं, अपः, भूमिं, विष्णुं, इंद्रं, इंद्राणीं, प्रजापतिं, सर्पान्, ब्रह्माणं,

**एता देवता एतत्संख्याकाभिः समिदाद्याहुतिभिः** " येथें ' **एतत्** ' या शद्बाच्या ठिकाणीं पूर्वसंख्येपेक्षां न्यून अष्टाविंशति ' ( २८ ) किंवा ' अष्ट ' ( ८ ) या संख्येचा उच्चार करावा. " **विनायकं, दुर्गां, वायुं, आकाशं, अश्विनौ, क्षेत्रपालं, वास्तोष्पतिं, इंद्रं, अग्निं, यमं, निर्ऋतिं, वरुणं, वायुं, सोमं, ईशानं, एता देवता एतत्संख्याकाभिः "समिदाद्याहुतिभिः** ' एतत् ' या पदाच्या ठिकाणीं ' अष्ट ' ( ८ ) किंवा ' चतुः ' ( ४ ) या पदांचा उच्चार करावा. " **भुवनेश्वरीमष्टोत्तरसहस्रसंख्याकाभिः ( १००८ ) दूर्वाहुतिभिस्तिलमिश्रगोधूमाहुतिभिः पायसाहुतिभिराज्याहुतिभिश्च**" तितक्या आहुतींचा होम करण्याची शक्ति नसेल तर ' **अष्टोत्तरशतं** ' ( १०८ ) या पदाचा उच्चार करावा. ' **भुवनेश्वरीं** ' या पदाबद्दल ' **सवितारं** ' या पदाचा पाहिजे तर उच्चार करावा. " **इंद्राणीमिंद्रं च एतत्संख्याकाभिर्दूर्वादिचतुर्विधाहुतिभिः** " येथें ' एतत् ' या पदाच्या स्थानीं पूर्वसंख्येपेक्षां (भुवनेश्वरीच्या होमसंख्येपेक्षां) कमी संख्येचा उच्चार करावा. किंवा या दोन देवता ( इंद्र व इंद्राणी ) यांचें अन्वाधानांत उच्चारणच करूं नये [ असाही एक पक्ष आहे ]. नंतर ' **शेषेणस्विष्टकृतं०** ' इत्यादि म्हणावें. नंतर पात्रें स्थापन करतेवेळीं " **स्थालीद्वयं प्रोक्षणीं दर्वीं स्रुवं.** " इत्यादि उच्चारण करावें. एकाच कालीं अनेक ऋत्विजांनीं घृताचा होम करण्याचा प्रसंग असेल तर अनेक स्रुवे स्थापन करावे. निर्वाप करतेवेळीं भुवनेश्वरी इत्यादिक तीन देवतांस उद्देशून कांहीं मंत्र न म्हणतां निर्वाप व प्रोक्षण करावें. नंतर आज्यसंस्कार करावा.

**ग्रहहोमार्थे, कर्तव्या मंत्रवंतश्च चरवः प्रतिदैवतम् इति याज्ञवल्क्यवचनात् ग्रहार्थे गृहसिद्धान्न चरुर्ग्राह्य इति । केचन गृहपाकौदनमुद्धृत्य ग्रहानुद्दिश्य जुव्हति । अत्र शिष्टाचार एव प्रमाणमिति महार्णवे । तत्राऽयं प्रयोगः । सूर्यायत्वाजुष्टंनिर्वपामीति चतुरो मुष्टीन्निरुप्य । एवं सोमायत्वा, मंगलायत्वेत्याद्याकारेण ग्रहेभ्यश्चतुरो मुष्टीन्निरुप्य । इतरासां देवतानां कृते देवेभ्योजुष्टं निर्वपामीति चतुरो मुष्टीन्निर्वपेत् इत्यपि तत्रैवेति दिक् ।**

" ग्रहांचा होम करण्याकरितां प्रत्येक देवतेस समंत्रक चरू करावे. " याप्रमाणें **याज्ञवल्क्य** ऋषीचें वचन आहे म्हणून ग्रहहोमाकरितां गृहसिद्ध ( घरांत शिजविलेला ) चरु घेऊं नये. कित्येक लोक घरांत केलेला ओदन ( भात ) घेऊन ग्रहांच्या उद्देशानें होम करतात. " या दोन पक्षांपैकीं जेथें जसा शिष्टाचार असेल तो प्रमाणभूत

मानावा " याप्रमाणें **महार्णव** ग्रंथांत सांगितलें आहे. त्याविषयीं ( समंत्रक चरूविषयीं ) असा प्रयोग आहेः– " **सूर्यायत्वाजुष्टंनिर्वपामि** " या मंत्रानें चार मुठी घालाव्या. याप्रमाणेंच '**सोमायत्वा०**' '**मंगलायत्वा०**' असें ह्मणून प्रत्येक ग्रहाच्या उद्देशानें चार चार मुठी घालून इतर देवतांकरितां '**देवेभ्योजुष्टंनिर्वपामि**' या मंत्रानें चार चार मुठी घालाव्या. असेंही त्या ग्रंथांत सांगितलें आहे. अशी दिशा समजावी.

**आज्येन सह पायसादिहविस्त्रयस्य ग्रहहोमार्थं गृहसिद्धान्नस्य च पर्यग्निकरणम् । दर्वीस्रुवसंमार्गान्ते गृहसिद्धान्नमासादितस्थाल्यामादाय, अग्नावधिश्रित्याभिघारणादिबर्हिष्यासादनान्तं कुर्यात् । ततः पायसमभिघार्य, बर्हिष्यासादनान्तं कुर्यात् । अर्कादिसमिधः दूर्वातिलमिश्रगोधूमांश्च तत्रैवासाद्य । अग्न्यर्चनाद्याज्यभागान्ते यजमानोन्वाधानानुसारेण एतत्संख्याहुतिपर्याप्तं अर्कादिजातीयसमिच्चर्वाज्यात्मकं हविस्त्रयं सूर्याय, सोमायेत्यादि न ममेत्येवं त्यागपूर्वकं तदंगदेवताभ्योऽपि त्यक्त्वा, एतत्संख्याकाहुतिपर्याप्तं दूर्वादिहविश्चतुष्टयं भुवनेश्वर्यै न ममेति त्यजेत् । तथा इंद्राण्यै इंद्रायेति च । भुवनेश्वर्यै इत्यस्य स्थाने सवित्र इति वा । इंद्राणींद्रयोर्होमाभावपक्षे न तदुद्देश्यकस्त्यागः । एवं त्यागे कृते सर्त्विगाचार्योऽर्कादिसमिधो दधिमध्वक्ताश्चर्वाहुतीराज्याहुतीश्च संकल्पानुसारिसंख्याकान् जुहुयात् । तादृशसंख्या एव दूर्वादिहविश्चतुष्टयाहुतीर्जुहुयात् । तत्र दधिमधुघृताक्ताभिस्तिसृभिस्तिसृभिर्दूर्वाभिरेकैकाहुतिः कार्या । तन्न्यूनसंकल्पानुसारिसंख्याश्चतुर्विधाहुतीरिन्द्राणीन्द्रमंत्राभ्यां तद्धोमपक्षे हुत्वा, स्विष्टकृदादिप्रायश्चित्तहोमान्तं कृत्वा, दिक्पालादिभ्यः सदीपमाषभक्तबलिसंकल्पं यजमानद्वारा कारयेत् ।**

पायसादिक तीन हविर्द्रव्यें, व ग्रहहोमाकरितां गृहसिद्धान्नचरु या सर्वांचें आज्यासह पर्यग्निकरण करावें. दर्वी व स्रुवा यांचा संमार्ग ( शुद्धि ) केल्यानंतर गृहसिद्धान्नचरु स्थापन केलेल्या चरुस्थालीमध्यें घेऊन तो अग्नीवर ठेवून अभिघारणापासून बर्हीवर ठेवण्यापर्यंतचें कर्म करावें. नंतर पायसावर अभिघार करून बर्हीवर ठेवण्यापर्यंत कर्म करावें. अर्क ( रुई ) इत्यादिकांच्या समिधा, दूर्वा, तिलमिश्रगोधूम हीं त्याच ठिकाणीं ठेवावीं. अग्नीच्या पूजनापासून आज्यभागापर्यंत कर्म केल्यावर यजमानानें अन्वाधानाप्रमाणें " **एतत्संख्याहुतिपर्याप्तं अर्कादिजातीयसमिच्चर्वाज्यात्मकं हविस्त्रयं सूर्याय सोमायेत्यादि न मम** " असें म्हणून सूर्यादिकांच्या उद्देशानें हविर्द्रव्यांचा त्याग करण्याविषयीं संकल्प करावा. व त्याप्रमाणेंच अंगदेवतांच्या

उद्देशानेंही करावा. नंतर "**एतत्संख्याकाहुतिपर्याप्तं दूर्वादिहविश्चतुष्टयं भुवनेश्वर्यै न मम**" याप्रमाणें म्हणून "**एतत्संख्याकाहुतिपर्याप्तं दूर्वादिहविश्चतुष्टयं इंद्राण्यै इंद्राय च न मम**" असें म्हणावें. '**भुवनेश्वर्यै**' याबद्दल '**सवित्रे**' असाही उच्चार करावा. [ इंद्राणी व इंद्र यांच्या होमाविषयीं विकल्प आहे ] या करितां त्यांचा होम कर्तव्य नसल्यास त्यांच्या उद्देशानें त्यागही करूं नये. याप्रमाणें त्याग केल्यानंतर ऋत्विजांसहवर्तमान आचार्यानें, दहीं व मध ज्यांस लाविला आहे अशा अर्क ( रुई ) इत्यादिकांच्या समिधा, चरूच्या आहुति व तुपाच्या आहुति यांनीं संकल्पानुसार होम करावा. त्याचप्रमाणें दूर्वादि चार हविर्द्रव्यांच्या आहुति ( संकल्पानुसार ) द्याव्या. दूर्वांस दहीं, मध व तूप लावून तीन तीन दूर्वांची एक एक आहुति करावी. ज्यावेळेस इंद्राणी व इंद्र यांचा होम कर्तव्य असेल त्यावेळीं इंद्राणी व इंद्र यांच्या मंत्रांनीं पूर्वोक्त चार हविर्द्रव्यांच्या पूर्वसंख्येपेक्षां कमी अशा, आहुति संकल्पानुसार द्याव्या. नंतर स्विष्टकृत् होमापासून प्रायश्चित्त होमापर्यंतचें कृत्य केल्यावर ( आचार्यानें ) दिक्पालादिकांच्या उद्देशानें सदीपमाषभक्तबलीचा ( ज्यांत दिवे लावले आहेत अशा उडीदमिश्रित भाताच्या बलीचा ) संकल्प यजमानाकडून करवावा.

**सपत्नीको यजमानः प्रतिबलि संकल्प्य साक्षतजलं त्यजेत्। तद्यथा। अग्न्यायतनस्य समंतादिक्षु माषभक्तबलीन् दिक्पालेभ्यो दद्यात्। त्रातारमिंद्रं गर्ग इंद्रस्त्रिष्टुप्। इंद्रप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः। ॐ त्रातारमिंद्रं०। इंद्राय सांगाय सपरिवाराय सायुधाय सशक्तिकाय एष माषभक्तबलिर्न मम। भो इंद्र दिशं रक्ष बलिं भक्ष[1] मम यजमानस्य सकुटुंबस्यायुःकर्ता क्षेमकर्ता शांतिकर्ता पुष्टिकर्ता तुष्टिकर्ता भवेति पुष्पाक्षतजलानि पूर्वाभिमुखस्त्यजेत्[2]। एवमग्न्यादिसप्तभ्यो दिक्पालेभ्यस्तत्तन्मंत्रैर्बलिं दद्यात्।**

यजमानानें पत्नीसहवर्तमान प्रत्येक बलीच्या संकल्पाच्या वेळेस अक्षतायुक्त उदक सोडावें. तें येणेंप्रमाणें:—अग्नीच्या आयतनाच्या ( स्थानाच्या ) आसमंतात् आठ दिशांचे ठिकाणीं दिक्पालदेवतांस माषभक्तबली द्यावे. "**त्रातारमिन्द्रं गर्ग इन्द्रस्त्रिष्टुप्। इंद्रप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः। ॐ त्रातारमिंद्रं०। इंद्राय सांगाय सपरिवाराय सायुधाय सशक्तिकाय एष माषभक्तबलिर्न मम। भो इंद्र दिशं रक्ष, बलिं भक्ष, मम**

---

१ ङ. च. ज. भुङ्क्ष्व। २ क. ख. ग. घ. ङ. च. ज. जेत् अग्निं०।

यजमानस्य सकुटुंबस्यायुःकर्ता क्षेमकर्ता शांतिकर्ता पुष्टिकर्ता तुष्टिकर्ता भव " असें म्हणून पुष्प व अक्षता यांनीं युक्त असें उदक, पूर्वेस तोंड करून सोडावें. याप्रमाणें अग्न्यादिक सात दिक्पालदेवतांस त्या त्या मंत्रांनीं बलिदान करावें.

तद्यथा अग्निं काण्वो मेधातिथिरग्निर्गायत्री । अग्निप्रीत्यर्थे बलिदाने वि० । ॐ आग्निंदूतं वृणीमहे० । अग्नये सांगाय० २ । यमायसोमं वैवस्वतो यमो यमोऽनुष्टुप् । यमप्रीत्यर्थे बलिदाने वि० । ॐ यमायसोमं० । यमाय सांगाय० ३ । मोषुणो घौरः कण्वो निर्ऋतिर्गायत्री । निर्ऋतिप्रीत्यर्थे बलि० । ॐ मोषुणःपरापरा० । निर्ऋतये सांगाय० ४ । तत्वायामि शुनःशेपो वरुणास्त्रिष्टुप् । वरुणप्रीत्यर्थे० । ॐ तत्वयामिब्रह्मणा० । वरुणाय सांगाय० ५ । तववायो व्यश्व आंगिरसो वायुर्गायत्री । वायुप्रीत्यर्थे बलि० । ॐ तववायवृतस्पते० । वायवे सांगाय० ६ । सोमोधेनुं गोतमः सोमस्त्रिष्टुप् । सोमप्रीत्यर्थे० । ॐ सोमोधेनुं सोमोअर्वंत० । सोमाय सांगाय० ७ । तमीशानं गोतम ईशानो जगती । ईशानप्रीत्यर्थे० । ॐ तमीशानंजगतः० । ईशानाय सांगाय० ८ ।

तें येणेंप्रमाणें:—" अग्निं काण्वो मेधातिथिरग्निर्गायत्री । अग्निप्रीत्यर्थे बलिदाने । विनियोगः । ॐ अग्निंदूतंवृणीमहे० । अग्नये सांगाय० " । " यमायसोमं वैवस्वतो यमो यमोऽनुष्टुप् । यमप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ यमायसोमं० । यमाय सांगाय० " । " मोषुणो घौरः कण्वो निर्ऋतिर्गायत्री । निर्ऋतिप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ मोषुणःपरापरा० । निर्ऋतये सांगाय० " । " तत्वयामि शुनःशेपो वरुणास्त्रिष्टुप् । वरुणप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ तत्वायामिब्रह्मणा० । वरुणाय सांगाय० " । " तववायो व्यश्व आंगिरसो वायुर्गायत्री । वायुप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ तववायवृतस्पते० । वायवे सांगाय० " । " सोमोधेनुं गोतमः सोमस्त्रिष्टुप् । सोमप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ सोमोधेनुं० । सोमाय सांगाय० " " तमीशानं गोतम ईशानो जगती । ईशानप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ तमीशानंजगतः० । ईशानाय सांगाय० " । याप्रमाणें बलिदान करावें.

ततो ग्रहबलयो देयाः । तत्र पूर्वे । आकृष्णेन हिरण्यस्तूपः सविता त्रिष्टुप् । सूर्यप्रीत्यर्थे० । ॐ आकृष्णेनरजसा० । आदित्याय सांगाय सपरिवाराय ईश्वराऽग्निरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेमं सदीपमाषभक्तबलिं समर्पयामि इति

पुष्पांजलिं क्षिपेत् । भो आदित्येमं बलिं गृहाण मम यजमानस्य० १ । आप्यायस्व गोतमः सोमो गायत्री । सोमप्रीत्यर्थे० । ॐ आप्यायस्वसमेतु० । सोमाय सांगाय० उमाब्रूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि० २ । अग्निर्मूर्धा विरूपोंगारको गायत्री । भौमप्रीत्यर्थे बलिदाने० । ॐ अग्निर्मूर्धादिवः० । भौमाय सांगाय० स्कंदभूमिरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि० । उद्बुध्यध्वं बुधो बुधस्त्रिष्टुप् । बुधप्रीत्यर्थे० । ॐ उद्बुध्यध्वंसमनसः० । बुधाय सांगाय० नारायणविष्णुरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि० ४ । बृहस्पते गृत्समदो बृहस्पतिस्त्रिष्टुप् । बृहस्पतिप्रीत्यर्थे बलि० । ॐ बृहस्पतेअति० । बृहस्पतये सांगाय० ब्रह्मेन्द्ररूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि० ५ । शुक्रः पराशरः शुक्रो द्विपदाविराट् । शुक्रप्रीत्यर्थे बलि० । ॐ शुक्रः शुशुक्वाँउषसोन० । शुक्राय सांगाय० इंद्रेंद्राणीरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि० ६ । शमग्निरिरिंबिठिः शनिरुष्णिक् । शनिप्रीत्यर्थे० । ॐ शमग्निरग्निभिः० । शनैश्चराय सांगाय० यमप्रजापतिरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि० ७ । कयानो वामदेवो राहुर्गायत्री । राहुप्रीत्यर्थे बलि० । ॐ कयानश्चित्र० । राहवे सांगाय० कालसर्परूपाधिदेवताप्रत्याधिदेवतासहितायेत्यादि० ८ । केतुंकृण्वन् मधुच्छंदाः केतुर्गायत्री । केतुप्रीत्यर्थे० । ॐ केतुंकृण्वन्न० । केतवे सांगाय० चित्रगुप्तब्रह्मरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि० । ९ ।

नंतर ग्रहांचे बलि द्यावे. त्यांत पूर्वेस “ आकृष्णेन हिरण्यस्तूपः सविता त्रिष्टुप् । सूर्यप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ आकृष्णेनरजसा० । आदित्याय सांगाय सपरिवाराय ईश्वराग्निरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेमं सदीपमाषभक्तबलिं समर्पयामि ” असें म्हणून पुष्पांजलि द्यावा. “ भो आदित्येमं बलिं गृहाण मम यजमानस्य० ” । “ आप्यायस्व गोतमः सोमो गायत्री । सोमप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ आप्यायस्वसमेतु० । सोमाय सांगाय सपरिवाराय उमाऽब्रूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि० ” । “ अग्निर्मूर्धा विरूपोंगारको गायत्री. भौमप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ अग्निर्मूर्धादिवः० । भौमाय सांगाय सपरिवाराय स्कंदभूमिरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि ” । “ उद्बुध्यध्वं बुधो बुधस्त्रिष्टुप् । बुधप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ उद्बुध्यध्वं० । बुधाय सांगाय सपरिवाराय नारायणविष्णुरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि ” । “ बृह-

स्पते गृत्समदो बृहस्पतिस्त्रिष्टुप् । बृहस्पतिप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ बृहस्पतेअति० । बृहस्पतये साङ्गाय सपरिवाराय ब्रह्मेन्द्ररूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि ।" "शुक्रः पराशरः शुक्रोद्विपदाविराट् । शुक्रप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ शुक्रः शुशुक्वां० । शुक्राय साङ्गाय सपरिवाराय इन्द्रेन्द्राणीरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि " । " शमग्निरिरिंबिठिः शनिरुष्णिक् । शनिप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ शमग्निरग्निभिः० । शनैश्चराय साङ्गाय सपरिवाराय यमप्रजापतिरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि " । " कयानो वामदेवो राहुर्गायत्री । राहुप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ कयानश्चित्र० । राहवे साङ्गाय सपरिवाराय कालसर्परूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि ।" " केतुंकृण्वन् मधुच्छन्दाः केतुर्गायत्री । केतुप्रीत्यर्थे बलिदाने विनि० । ॐ केतुंकृण्वन्० । केतवे साङ्गाय सपरिवाराय चित्रगुप्तब्रह्मरूपाधिदेवताप्रत्यधिदेवतासहितायेत्यादि "[ याप्रमाणें ग्रहांचे बली होत ]

ततः गणानांत्वा गृत्समदो गणपतिर्जगती । गणपतिप्रीत्यर्थे बलिदाने विनि० । ॐ गणानांत्वा० । गणपतये साङ्गाय सपरिवाराय ऋद्धिबुद्धिसहितायेत्यादि १। जातवेदसे कश्यपो दुर्गा त्रिष्टुप् । दुर्गाप्रीत्यर्थे० । ॐ जातवेदसेसुनवाम० । दुर्गायै साङ्गायै सपरिवारायै सायुधायै सशक्तिकायै इमं० बलिं० । भो दुर्गे० मम यजमानस्यायुःकर्त्री क्षेमकर्त्री शान्तिकर्त्री पुष्टिकर्त्री तुष्टिकर्त्री ऋद्धिकर्त्री भव २ । तववायो व्यश्व आङ्गिरसो वायुर्गायत्री । वायुप्रीत्यर्थे० । ॐ तववायवृत० । वायवे साङ्गायेत्यादि ३। आदित्प्रत्नस्य वत्स आकाशो गायत्री । आकाशप्रीत्यर्थे० । ॐ आदित्प्रत्नस्य० । आकाशाय साङ्गायेत्यादि । एषोउषाः प्रस्कण्वोऽश्विनौ गायत्री । अश्विप्रीत्यर्थे बलिदाने० । ॐ एषोउषाअपूर्व्या० । अश्विभ्यां साङ्गाभ्यां सपरिवाराभ्यां सायुधाभ्यां सशक्तिकाभ्यामिष माषभक्तबलिं० । भो अश्विनौ अमुं बलिं गृह्णीतं मम यजमानस्यायुःकर्तारौ क्षेमकर्तारौ० भवतम् ५ । वास्तोष्पते वसिष्ठो वास्तोष्पतिस्त्रिष्टुप् । वास्तोष्पति प्रीत्यर्थे० । ॐ वास्तोष्पते० । वास्तोष्पतये साङ्गायेत्यादि ६ । ततो गायत्र्या विश्वामित्रो भुवनेश्वरी गायत्री । सविता गायत्रीति वा । भुवनेश्वरीप्रीत्यर्थे० । ॐ तत्सवितु० । भुवनेश्वर्यै साङ्गायै इत्यादि । सवित्रे इत्यादि वा १ । तत इन्द्राणीन्द्रमन्त्राभ्यां पूर्वोक्ताभ्यां क्रमेण तदुभयोद्देशेन बलिं दत्वा, क्षेत्रपालाय बलिं दद्यात् । क्षेत्रस्य वामदेवः क्षेत्रपालोऽनुष्टुप् । क्षेत्रपालप्री-

१ घ. शुभकर्त्री । २ क. ख. ग. ङ. ज. बलिर्न मम ।

त्यर्थे० । ॐ क्षेत्रस्यपतिना०। क्षेत्रपालाय साङ्गाय सपरिवाराय भूतप्रेतपिशाचराक्षसडाकिनीशाकिनीवेतालपरिवारयुताय इममित्यादि० ।

नंतर " गणानांत्वागृत्समदो गणपतिर्जगती । गणपतिप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ गणानांत्वागणपतिं० । गणपतये साङ्गाय सपरिवाराय ऋद्धिबुद्धिसहितायेत्यादि " । " जातवेदसे कश्यपो दुर्गा त्रिष्टुप्। दुर्गाप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ जातवेदसेसुनवाम० । दुर्गायै साङ्गायै सपरिवारायै सायुधायै सशक्तिकायै इमं बलिं समर्पयामि । भो दुर्गे० मम यजमानस्यायुःकर्त्री क्षेमकर्त्री शान्तिकर्त्री पुष्टिकर्त्री तुष्टिकर्त्री ऋद्धिकर्त्री भव" ।"तववायो व्यश्व आङ्गिरसो वायुर्गायत्री । वायुप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ तववायवृत०। वायवे साङ्गाय सपरिवारायेत्यादि "। " आदित्प्रत्नस्य वत्स आकाशो गायत्री ।आकाशप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः ।ॐ आदित्प्रत्नस्य०। आकाशाय साङ्गायेत्यादि"। " एषो- उषाः प्रस्कण्वोऽश्विनौ गायत्री । अश्विप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ एषोउषा अपूर्व्या०। अश्विभ्यां साङ्गाभ्यां सपरिवाराभ्यां सायुधाभ्यां सशक्तिकाभ्यामेष माषभक्तबलिं समर्पयामि । भो अश्विनौ अमुं बलिं गृह्णीतं मम यजमानस्यायुःकर्तारौ क्षेमकर्तारौ शान्तिकर्तारौ पुष्टिकर्तारौ तुष्टिकर्तारौ ऋद्धिकर्तारौ भवतम्" " वास्तोष्पते वसिष्ठो वास्तोष्पतिस्त्रिष्टुप् । वास्तोष्पतिप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ वास्तोष्पते०। वास्तोष्पतये साङ्गाय सपरिवारायेत्यादि " नंतर " गायत्र्या विश्वामित्रो भुवनेश्वरी गायत्री " [भुवनेश्वरी ' याबद्दल] " सविता" असेंही म्हणावें. " भुवनेश्वरीप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ तत्सवितु०। भुवनेश्वर्यै साङ्गायै सपरिवारायै इत्यादि " किंवा " सवित्रे साङ्गाय सपरिवाराय " इत्यादि म्हणावें. नंतर, इंद्राणी व इंद्र यांचे मंत्र पूर्वी सांगितले आहेत त्या मंत्रांनीं क्रमानें इंद्राणी व इंद्र यांस बलिदान करून नंतर क्षेत्रपालास बलि द्यावा. [ तो असा ] " क्षेत्रस्य वामदेवः क्षेत्रपालोऽनुष्टुप् । क्षेत्रपालप्रीत्यर्थे बलिदाने विनियोगः । ॐ क्षेत्रस्यपतिना० । क्षेत्रपालाय साङ्गाय सपरिवाराय भूतप्रेतपिशाचराक्षसडाकिनीशाकिनीवेतालपरिवारयुताय इमं० [ " असें म्हणावें. ] "

ततः शूद्रादिना तद्बलिनयने कृते। शान्तापृथिवीति भुवं प्रोक्ष्य । सयजमान आचार्यः प्रक्षालितपाणिपाद आचान्तः स्रुचि द्वादशगृहीतं चतुर्गृहीतं वा आज्यमादाय । तदुपरि वस्त्रयुतं चन्दनादिभूषितं फलं निधाय । यजमान-

**तत्पत्न्यन्वारब्धस्तिष्ठन् पूर्णाहुतिं जुहुयात् । समुद्रादूर्मिरिति सूक्तस्य गौतमो वामदेवोऽग्निस्त्रिष्टुप् । अन्त्या जगती । पूर्णाहुतिहोमे विनियोगः । ॐ समुद्रादूर्मिर्मधुमाँउदा० सूक्तान्ते स्वाहा । अग्नय० । ततः पूर्णपात्रनिनयनं कृत्वा, साचार्यो यजमानः संस्थाजपेनोपस्थाय, परिस्तरणविमोकादिपर्युक्षणान्तं कुर्यात् ।**

नंतर शूद्रादिकाकडून तो बळी नेवविल्यावर " **शांता पृथिवि०** " इत्यादि मंत्र म्हणून भूमीचें प्रोक्षण करून आचार्यानें यजमानासहवर्तमान हातपाय धुवून आचमन करावें. नंतर आचार्यानें स्रुचीमध्यें बारा वेळां किंवा चार वेळां तूप घेऊन त्यावर, वस्त्रानें युक्त व चंदनादिकांनीं भूषित असें फळ ठेवून यजमान व त्याची पत्नी यांनीं अन्वारब्ध असें उभें राहून पूर्णाहुती द्यावी " **समुद्रादूर्मिरिति-सूक्तस्य गौतमो वामदेवोऽग्निस्त्रिष्टुप्। अन्त्या जगती । पूर्णाहुतिहोमे विनियोगः। ॐ समुद्रादूर्मि०,** " सूक्त झाल्यानंतर " **स्वाहा** " असें म्हणून नंतर " **अग्नय इदं न मम** " याप्रमाणें म्हणावें. नंतर पूर्णपात्राचें निनयन केल्यावर यजमानासह आचार्यानें संस्थाजपानें ( ' **ओं चमेस्वर०** ह्या मंत्रानें ' ) अग्नीचें उपस्थान करून, परिस्तरणांचें विसर्जन, परिसमूहन व पर्युक्षण हीं कृत्यें करावीं.

**ततो धृतनवकञ्चुकीवस्त्रया वामभागस्थया पत्न्या सहितं प्राङ्मुखं यजमानं सर्त्विगुदङ्मुख आचार्यः स्थापितकलशचतुष्टयाद्भिः पात्रान्तरे गृहीताभिः तत्रत्यपञ्चपल्लवैः सकुशदूर्वैरभिषिञ्चेत् । आपोहिष्ठेति नवर्चस्याम्बरीषः सिन्धुद्वीप आपो गायत्री। पञ्चमी वर्द्धमाना। सप्तमी प्रतिष्ठान्त्ये द्वे अनुष्टुभौ । अभिषेके विनि० । ॐ आपोहिष्ठामयो० ९ । इन्द्रोअङ्गेति तृचस्य गृत्समद इन्द्रो गायत्री । अभिषेके० । ॐ इंद्रोअंगमहद्भय० ३ । त्रिभिष्ट्वंदेवेति सप्तर्चस्य सूक्तस्य वसिष्ठ ऋषिः, आद्यानां[2] तिसृणामग्निश्चतुर्णां विश्वेदेवा, आद्या गायत्री, द्वितीयानुष्टुप्, तिस्रो गायत्र्योऽन्त्ये द्वे अनुष्टुभौ, अभिषेके०। ॐ त्रिभिष्ट्वंदेवसवित०७। उभयंश्रृणवच्चन इति भर्ग इन्द्रो बृहती । अभि० । ॐ उभयंश्रृणवच्चन० । स्वस्तिदाविश इत्यस्य भरद्वाजः शास इन्द्रोऽनुष्टुप् । अभिषे० । ॐ स्वस्तिदाविशस्पति० । त्र्यम्बकं**

१ क. ख. ग. घ. ङ. तदमात्यान्वारब्धः । २ क. ख. ग. झ. ञ आद्यद्वयोरग्निर्देवता ततस्तिसृणां सोमो देवता अन्त्येद्वे पावमान्यौ आद्या तृतीया चतुर्थी च गायत्र्यः पञ्चमी पुरउष्णिक् द्वितीया षष्ठी सप्तमी चानुष्टुभः ।

वसिष्ठो रुद्रोऽनुष्टुप्। अभि०। ॐ त्र्यंबकंयजामहे०। जातवेदसे कश्यपो दुर्गा त्रिष्टुप्। अभिषेके०। ॐ जातवेदसेसुनवाम०। समुद्रज्येष्ठा इति चतसृणां वसिष्ठ आपस्त्रिष्टुप्। अभिषेके०। ॐ समुद्रज्येष्ठाःसलिल० ४। त्रायन्तामिति तिसृणां-सप्तर्षय आपोऽनुष्टुप्। अभिषेके०। ॐ त्रायंतामिह० ३। इमाआप इति ति-सृणां सप्तर्षय आपोऽनुष्टुप् अभिषेके०। ॐ इमाआपःशिवतमा० ३। देवस्य त्वासवितुः० हस्ताभ्यांसरस्वत्यै भैषज्येन वीर्यायान्नाद्यायाभिषिंचामि। देव-स्यत्वा० अश्विनोर्भैषज्येन तेजसेब्रह्मवर्चसायाभिषिंचामि। देवस्यत्वा० इंद्रस्येंद्रि-येण श्रियै यशसे बलायाभिषिं०। तमीशानं गोतम ईशानो जगती। अभिषेके०। ॐ तमीशानं जगत०। त्वमग्नेरुद्रो गृत्समदोऽग्निर्जगती। अभिषेके विनियोगः। ॐ त्वमग्नेरुद्रोअसुरोमहो० १। तमुष्टुत्यत्री रुद्रस्त्रिष्टुप्। अभिषेके विनियोगः। ॐ तमुष्टुहियःस्विषु० १। भुवनस्यपितरमृजिश्वा रुद्रस्त्रिष्टुप्। अभिषेके०। ॐ भुवनस्यपितरं० १। यातेरुद्रेति कश्यपो रुद्रः स्वराडनुष्टुप्। अभिषेके०। ॐ यातेरुद्रशिवा० १। यज्जाग्रत इति षण्णां प्रजापतिर्मनस्त्रिष्टुप्। अभिषेके०। ॐ यज्जाग्रतो०। येनकर्मा०। यत्प्रज्ञानमु०। येनेदंभूतं०। यस्मिन्नृचः०। सुषारथि०। इन्द्रत्वावृषभमिति पञ्चानां विश्वामित्र इन्द्रो गायत्री। अभिषेके०। ॐ इंद्रत्वावृ-षभंवयं० ५।

नंतर यजमानानें पूर्वदिशेस तोंड करून बसावें आणि पत्नीनें नूतन वस्त्र व कंचुकी ( चोळी ) धारण करून त्याच्या डाव्याबाजूस बसावें. याप्रमाणें उभयतां बसल्यावर आचार्यानें ऋत्विजांसहवर्तमान उत्तरेस तोंड करून, स्थापन केलेल्या चार कलशांतील उदकें निराळ्या पात्रांत घेऊन त्या उदकांनीं, व कलशांतील पंच-पल्लव आणि दूर्वा व कुश यांनीं, त्या उभयतांस अभिषेक करावा. [ त्याचे मंत्र ] " आ-पोहिष्ठेति नवर्चस्याम्बरीषः सिन्धुद्वीप आपो गायत्री। पञ्चमी वर्धमाना। सप्तमी प्रतिष्ठान्त्ये द्वे अनुष्टुभौ। अभिषेके विनियोगः। ॐ आपोहिष्ठामयोभुवः०९। इन्द्रोअङ्गेति तृचस्य गृत्समद इन्द्रो गायत्री। अभिषेके विनियोगः। ॐ इंद्रो अंगमहद्भय० ३। त्रिभिष्ट्वंदेवेति सप्तर्चस्य सूक्तस्य वसिष्ठ ऋषिः। आद्यानां तिसृणामग्निश्चतुर्णां विश्वेदेवा, आद्या गायत्री, द्वितीयानुष्टुप्, तिस्रो गायत्र्योऽन्त्ये द्वे अनुष्टुभौ। अभिषेके विनियोगः। ॐ त्रिभिष्ट्वंदेव० ७। उभयंशृणवच्चन इति भर्ग इन्द्रो बृहती। अभिषेके विनियोगः। ॐ उभयंशृणवच्चन० १। स्वस्तिदाविश इत्यस्य भरद्वाजः शास इन्द्रोऽनुष्टुप्। अभिषेके विनियोगः। ॐ स्वस्तिदाविश-

स्पति० १। त्र्यम्बकं वासिष्ठो रुद्रोऽनुष्टुप्। अभिषेके विनियोगः। ॐ त्र्यंबकंयजामहे० १ जातवेदसे कश्यपो दुर्गा त्रिष्टुप्। अभिषेके विनियोगः। ॐ जातवेदसेसुनवाम० १। समुद्रज्येष्ठा इति चतसृणां वासिष्ठ आपस्त्रिष्टुप्। अभिषेके विनियोगः। ॐ समुद्रज्येष्ठाः ०४। त्रायन्तामिति तिसृणां सप्तर्षय आपोऽनुष्टुप्। अभिषेके विनियोगः। ॐ त्रायंतामिह०३। इमाआप इति तिसृणां सप्तर्षय आपोऽनुष्टुप्। अभिषेके विनियोगः। ॐ इमाआपः शिवतमा० ३। देवस्यत्वा सावितुः० हस्ताभ्यां सरस्वत्यै भैषज्येन वीर्यायान्नाद्यायाभिषिंचामि। देवस्यत्वा० हस्ताभ्यां अश्विनोर्भैषज्येन तेजसे ब्रह्मवर्चसायाभिषिंचामि। देवस्यत्वा० हस्ताभ्यां इंद्रस्येंद्रियेण श्रिये यशसे बलायाभिषिं०। तमीशानं गोतम ईशानो जगती। अभिषेके विनियोगः। ॐ तमीशानं०। त्वमग्नेरुद्रो गृत्समदोऽग्निर्जगती। अभिषेके विनियोगः। ॐ त्वमग्नेरुद्रोअसुरोमहोदिवः० १। तमुष्टुह्यत्री रुद्रस्त्रिष्टुप्। अभिषेके विनियोगः। ॐ तमुष्टुहि० १। भुवनस्यपितरमृजिश्वा रुद्रास्त्रिष्टुप्। अभिषेके विनियोगः। ॐ भुवनस्यपितरं० १। यातेरुद्रेति कश्यपो रुद्रः स्वराडनुष्टुप्। अभिषेके विनियोगः। ॐ यातेरुद्रशिवातनू० १। यज्जाग्रत इति षण्णां प्रजापतिर्मनस्त्रिष्टुप्। अभिषेके विनियोगः। ॐ यज्जाग्रतो० येनकर्मा० यत्प्रज्ञानमु० येनेदंभूतं० यस्मिन्नृचः० सुषारथि० ६। इन्द्रत्वावृषभमिति पञ्चानां विश्वामित्र इन्द्रो गायत्री। अभिषेके विनियोगः। ॐ इंद्रत्वावृषभंवयं०५"। [हे वेदोक्त मंत्र होत]

सुरास्त्वामभिषिञ्चन्त्वित्यादिपुराणमन्त्राः। सुरास्त्वामभिषिञ्चन्तु ब्रह्मविष्णुमहेश्वराः। वासुदेवो जगन्नाथस्तथा सङ्कर्षणो विभुः१। प्रद्युम्नश्चानिरुद्धश्च भवन्तु विजयाय ते। आखण्डलोऽग्निर्भगवान् यमो वै निर्ऋतिस्तथा २। वरुणः पवनश्चैव धनाध्यक्षस्तथा शिवः। ब्रह्मणा सहिताः सर्वे दिक्पालाः पान्तु ते सदा ३। कीर्तिर्लक्ष्मीर्धृतिर्मेधा पुष्टिः श्रद्धा क्रिया मतिः। बुद्धिर्लज्जा वपुः शान्तिः कान्तिस्तुष्टिश्च मातरः ४। एतास्त्वामभिषिञ्चन्तु देवपत्न्यः समागताः। आदित्यश्चन्द्रमा भौमो बुधजीवसितार्कजाः ५। ग्रहास्त्वामभिषिञ्चन्तु राहुः केतुश्च तर्पिताः। देवदानवगन्धर्वा यक्षराक्षसपन्नगाः ६। ऋषयो मुनयो गावो देवमातर एव च। देवपत्न्यो द्रुमा नागा दैत्याश्चाप्सरसां गणाः ७। अस्त्राणि सर्वशस्त्राणि राजानो वाहनानि च। औषधानि च रत्नानि कालस्यावयवाश्च ये ८। सरितः

१ क. ख. ग. घ. झ. तुष्टिः क्षान्तिश्च।

सागराः शैलास्तीर्थानि जलदा नदाः । एते त्वामभिषिश्चन्तु सर्वकामार्थसिद्धये ९ । इति[1] । तच्छंयोरावृणीमहे० ।

नंतर " सुरास्त्वामभिषिश्चन्तु० " इत्यादि पुराणांतील मंत्र म्हणावे. " सुरास्त्वामभिषिश्चन्तु ब्रह्मविष्णुमहेश्वराः । वासुदेवो जगन्नाथस्तथा सङ्कर्षणो विभुः १ । प्रद्युम्नश्चानिरुद्धश्च भवन्तु विजयाय ते । आखण्डलोऽग्निर्भगवान्यमो वै निर्ऋतिस्तथा २ । वरुणः पवनश्चैव धनाध्यक्षस्तथा शिवः । ब्रह्मणा सहिताः सर्वे दिक्पालाः पान्तु ते सदा ३ । कीर्तिर्लक्ष्मीर्धृतिर्मेधा पुष्टिः श्रद्धा-क्रिया मतिः । बुद्धिर्लज्जा वपुः शान्तिः कान्तिस्तुष्टिश्च मातरः ४ । एतास्त्वामभिषिश्चन्तु देवपत्न्यः समागताः । आदित्यश्चन्द्रमा भौमो बुधजीवसितार्कजाः ५ । ग्रहास्त्वामभिषिश्चन्तु राहुः केतुश्च तर्पिताः । देवदानवगन्धर्वा यक्षराक्षसपन्नगाः ६ । ऋषयो मुनयो गावो देवमातर एव च ॥ देवपत्न्यो द्रुमा नागा दैत्याश्चाप्सरसां गणाः ७ । अस्त्राणि सर्वशस्त्राणि राजानो वाहनानि च । औषधानि च रत्नानि कालस्यावयवाश्च ये ८ । सरितः सागराः शैलास्तिर्थानि जलदा नदाः । एते त्वामभिषिश्चन्तु सर्वकामार्थसिद्धये " ९ । [ या प्रमाणें पुराण मंत्र म्हणून ] तच्छंयोरावृणीमहे० [ हा मंत्र म्हणावा ]

ततः कलशोदकेनान्येन च जलेन तैलाभ्यङ्गसर्वौषध्यनुलेपनपूर्वकं सुस्नातौ दम्पती अभिषेककालीनवासांसि परित्यज्याहतशुक्लवासांसि परिधाय श्वेतचन्दन-पुष्पधारणं कुर्याताम् । त्यक्तवासांस्याचार्यस्य । अग्नेः पश्चादुपविश्य । दक्षिणतः पत्नी । ततो विभूतिधारणं कृत्वाचार्यादीनां चरणक्षालनम् । गन्धाक्षतैः पूजनं च कृत्वाचार्याय धेनुं दद्यात् । तदभावे उक्तनिष्क्रयम् । रुद्रजापिनेऽनड्वाहं सद-क्षिणं । उक्तनिष्क्रयं वा । ऋत्विग्भ्यो यथाशक्ति हेम तन्निष्क्रयं वा दद्यात् । ततो भुवनेश्वर्यादीनां आदित्यादीनां वरुणस्य चाचार्येणोत्तरपूजने कृते तद्धस्तेनैव 'उत्तिष्ठब्रह्मणस्पत' इत्यादि विसर्जने जाते, सोपस्करप्रतिमास्तद्धस्ते प्रतिपाद्या-ग्निपूजान्ते गच्छगच्छेत्यग्निं विसृज्य, कर्माङ्गदेवता प्रीत्यर्थं ब्राम्हणभोजनं संकल्प्य, भूयसीं दक्षिणां च संकल्प्य, शान्तिसूक्तपाठं कारयित्वा कर्मपूर्णम-स्त्विति वाचयित्वा, परमेश्वरार्पणं कुर्यात् । इति श्रीमदनन्तदेवीये संस्कार-कौस्तुभे दुष्टरजोदर्शनशान्तिः । अयं शौनकोक्तप्रकारो बह्वृचानाम् ।

---

१ घ. ग्रहाणामादिरादित्यो लोकरक्षणकारकः । विषमस्थानसंभूतां पीडां दहतु ते रविः ॥ १ ॥ इत्यादयो नवग्रहाणां पौराणमन्त्राः ।

नंतर स्त्रीपुरुषांस सुगंधी तेल लावून व सर्वौषधींचें अनुलेपन करवून त्यांनां कलशांतील उदकांनीं व दुसऱ्या उदकानें स्नान घालावें. नंतर त्यांनीं अभिषेकाच्या वेळचीं वस्त्रें टाकून देऊन नवीन शुभ्र वस्त्रें परिधान करावीं व शुभ्र चंदन व पुष्पें यांचें धारण करावें. टाकलेलीं वस्त्रें आचार्याचीं होत. यजमानानें अग्नीच्या पश्चाद्भागीं बसावें. व पत्नीनें त्याच्या दक्षिणभागीं बसावें. नंतर यजमानानें विभूतीचें धारण करून आचार्यादिकांचें पादप्रक्षालन करून त्यांची गंध, अक्षता यांनीं पूजा करावी. आचार्यास गोप्रदान करावें. गाय नसल्यास पूर्वीं सांगितल्याप्रमाणें तिच्या किंमतीचें द्रव्य द्यावें. रुद्राचा जप करणाऱ्यास दक्षिणा देऊन वृषभ (बैल) द्यावा. किंवा त्याच्या किंमतीचें द्रव्य द्यावें. ऋत्विजांना आपल्या शक्तिप्रमाणें सुवर्ण किंवा तितक्या किंमतीचें द्रव्य द्यावें. नंतर भुवनेश्वरी, सूर्य इत्यादिक देवता व वरुण यांची आचार्यानें उत्तरपूजा करून "**उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते०**" इत्यादि ह्मणून स्वतः त्यांचें विसर्जन करावें. नंतर यजमानानें सोपस्कर ( अंगभूतपदार्थांसुद्धां ) प्रतिमा आचार्यास द्याव्या. अग्नीची पूजा करून "**गच्छगच्छ०**" असें म्हणून अग्नीचें विसर्जन करावें. कर्मांगभूत देवतांची प्रीति होण्याकरितां ब्राह्मणभोजनाचा व भूयसी दक्षिणेचा संकल्प करावा. नंतर ब्राह्मणांकडून शांतिसूक्तांचा पाठ करवून '**कर्म पूर्णमस्तु**' ( हें केलेलें कर्म पूर्ण होवो ) याप्रमाणें त्यांच्याकडून आशीर्वाद घ्यावा. नंतर केलेलें कर्म परमेश्वरास समर्पण करावें. याप्रमाणें **अनंतदेव यांनीं केलेल्या संस्कारकौस्तुभनामक ग्रंथांतील रजोदर्शनशांतिप्रकरण समाप्त.** । हा शांतिविषयीं **शौनकऋषीनें** सांगितलेला प्रकार ऋग्वेदी यांजविषयीं समजावा.

**अन्येषां प्रकारान्तरं मदनरत्ने ऋषिपुत्रसंहितायाम् । प्रथमार्तवदोषाणां शान्तिं कुर्यादनन्तरम् । तिथिनक्षत्रवारादिदेवानां पूजनं पृथक् । शान्तिस्थलं प्रकुर्वीत विधिना दैवनिर्मिते । उद्याने वा नदीतीरे तडागे वाथ चत्वरे । मण्डपं कारयेत्तत्र गोमयेन द्विहस्तकम् । स्थण्डिलं कारयेत्तत्र चतुराढकशालिभिः। आढकं तण्डुलं चैव आढकौ तिलयावकौ । उपर्य्युपरि संस्तीर्य तन्मध्ये नलिनं लिखेत् । दर्भैराच्छाद्य तन्मध्ये कर्णिकायां न्यसेत् घटम् । ससूत्रं सपिधानं च सकूर्चं वस्त्रवेष्टितम् । पुण्योदकेन संपूर्णमौषधादिसमन्वितम् । सहदेव्येकपत्रा च विष्णुक्रान्ता सभद्रिका । बिल्वपत्रं सहैतानि चूर्णयित्वान्यसेत् घटे । कुष्ठं मांसी हरिद्रे द्वे मुराशैलेयचन्दनम् । वचाकचोरमुस्ताख्याः सर्वौषध्यः प्रकीर्तिताः । गजाश्वरथ्यावल्मीकसंगमात् ह्रदगोकुलात् । राजद्वारप्रदेशाच्च मृदमानीय निक्षिपेत् । पञ्चगव्यं च कुमुदं तथा शुक्रफलानि च । वज्रवैदूर्यमाणिक्यविद्रुमाणि विनिक्षिपेत् ।**

अन्यशाखीयांविषयीं **मदनरत्न** ग्रंथांत **ऋषिपुत्रसंहितेतून** घेतलेली निराळ्या प्रकारची शांति सांगितली आहे. तीः—**चतुर्थदिवशीं** प्रथम रजोदर्शनसंबंधी दोषांबद्दल शांति करावी. तिच्या अगोदर तिथि, नक्षत्र व वार इत्यादिकांच्या देवतांचें पूजन करावें. उद्यान ( बाग ), नदीचें तीर, अकृत्रिम (मनुष्यकृतीनें न झालेला) सरोवराचा समीप प्रदेश किंवा अंगण यांचे ठिकाणीं यथोक्त प्रकारानें शांतीकरितां जागा करावी. तेथें मंडप उभारून ती जागा गोमयानें ( शेणानें ) सारवावी. नंतर चार आढक ( आठ-पायल्या ) साळी, व एक आढक ( दोन पायल्या ), तांदूळ, तिल व यव अशीं धान्यें क्रमानें एकावरएक पसरून त्यानें द्विहस्तप्रमाण स्थंडिल करून त्याच्या मध्यभागीं कमळ काढावें. नंतर दर्भ [ स्थंडिलावर ] पसरून कमळाच्या मध्यभागीं कर्णिकेवर ( मधील कोशावर ) कुंभाची स्थापना करावी. त्या कुंभास वस्त्र व सूत्र गुंडाळून त्यांत कूर्च टाकून वर आच्छादन ( पूर्णपात्र ) ठेवावें. त्या कुंभांत पवित्र उदक घालून तो भरावा व त्यांत औषधि ( पुढें सांगितलेल्या वनस्पति ) घालाव्या. त्याः—सहदेवी, एकपत्रा, विष्णुक्रांता, नागरमोथा, व बिल्वपत्र हीं चुरून कुंभांत टाकावीं. कुष्ठ (कोष्ठ) जटामांसी हळद व आंबेहळद, मुरा ( तालीसपत्र ), शिलाजित, चंदन, वचा ( वेखंड ), कचोरा व मोथा यांना सर्वौषधी असें नांव आहे. गजस्थान, अश्वस्थान, मार्ग, वारूळ, नदीसंगम, डोह, गोठा व राजद्वाराचा प्रदेश, इतक्या ठिकाणांची मृत्तिका ( कुंभांत ) टाकावीं. त्याप्रमाणेंच पंचगव्य, पांढरें कमळ, शुभ्रफळें, वज्र ( हिरा ) वैदूर्य, माणीक, व पोंवळीं त्यांत टाकावीं.

**एवं कुम्भं समाराध्य गन्धपुष्पादिभिः शुभैः। अनुष्ठानपरो विप्रः प्राङ्मुखो वाप्युदङ्मुखः। आसीनः सुप्रसन्नात्मा प्राणसंयमनान्वितः। सावित्रीं च जपेत्कुम्भं स्पृशन् दशशतं द्विजः। एवं प्रदोषकाले तु कारयेदपरेऽहनि । उदये समनुप्राप्ते स्नातां गन्धाद्यलंकृताम्। स्नापयेच्छान्तिमान्विच्छन्पूर्वाण्हे प्राङ्मुखीं स्थिताम्। अधिवासितकुम्भस्य तोयैश्चापि समन्त्रकम्। पश्चाच्छेषोदकेनैव स्नात्वा देवं प्रणम्य च। स्वगृह्योक्तविधानेन होमं कुर्यात्प्रयत्नतः । दूर्वाज्येन तिलैर्हुत्वा सावित्र्या चैव मन्त्रतः। अष्टोत्तरसहस्रं वा शतमष्टाधिकं तथा। तत्संख्यां त्रिविधं हुत्वा दूर्वाज्येन तिलैः समम्। ब्राह्मणान्भोजयित्वा तु दैवज्ञं पूजयेत्ततः। अनेन विधिना नारी सर्व दोषात्प्रमुच्यते।**

अशा ( औषधि वगैरे घातलेल्या ) कुंभाची उत्तम प्रकारच्या गंधपुष्पादिकांनीं

पूजा करून त्या कुंभावर उत्तम प्रकारच्या गंध व पुष्पादिकांनीं वरुणाची पूजा करावी. एका ब्राह्मणानें अनुष्ठानाविषयीं तत्पर होऊन पूर्वेस किंवा उत्तरेस तोंड करून बसावें. नंतर सुप्रसन्न अंतःकरणानें प्राणायाम करून कुंभास स्पर्श करून सहस्र गायत्रीचा जप करावा. याप्रमाणें [ कृत्य पूर्व दिवशीं ] प्रदोषकालीं करून दुसरे दिवशीं सूर्योदय झाल्यानंतर [ ऋतुमती स्त्रीस ] स्नान घालून चंदनादिकांनीं भूषित करावें. नंतर [ दोषांची ] शांति व्हावी या करितां, पूर्वेस तोंड करून बसलेल्या [ ऋतुमती स्त्रीस ] अधिवासन केलेल्या कुंभांतील उदकांनीं पूर्वाण्हकालीं समंत्रक स्नान घालावें. नंतर [ यजमानानें ] अवशेष राहिलेल्या, [ कुंभांतील ] उदकानें स्नान करून वरुणास नमस्कार करावा. नंतर आपल्या **गृह्यसूत्रांत** सांगितलेल्या प्रकारानें होम करावा. दूर्वा, तूप, व तीळ यांचा गायत्री मंत्रानें अष्टोत्तर सहस्र १००८ किंवा अष्टोत्तर शत १०८ होम करावा. दूर्वा, आज्य, आणि तीळ या प्रत्येक द्रव्याचा सांगितलेल्या संख्येप्रमाणें होम करावा. नंतर ब्राह्मणभोजन करून ज्योतिषी याची पूजा करावी. याप्रमाणें विधि केला असतां स्त्री सर्व दोषांपासून मुक्त होते. ''

**अनन्तरं चतुर्थदिवसे । यदा तिथ्यादीनां प्रशस्ता बहवः, दुष्टाश्चाल्पास्तदा चतुर्थदिवसे शान्तिकर्म विधाय प्रशस्तकाले संगमं कुर्यात्, इत्युपन्यस्य, मदनरत्ने उक्तशान्त्युपन्यासात् । पृथक् शान्तेः पूर्वम् । दैवनिर्मिते अकृत्रिमे । तडागे तत्समीपे । उक्तपरिमाणैश्चतुर्भिर्द्रव्यैरुपर्युपरि संस्तीर्य, स्थण्डिलं कृत्वा मध्ये कमलं लिखेत् । शुभैरित्यन्ते अर्चयेत्कुंभे वरुणमिति शेषः । जपार्थं ब्राह्मणवरणं सूचयन्नाह अनुष्ठानेति । स्नापयेत्स एव ब्राह्मणः । यजमानं प्रत्याह । स्नात्वेति । देवं वरुणं । होमे सविता देवता । इति श्रीमदनन्तदेवीये संस्कारकौस्तुभे मदनरत्नोक्ता रजोदर्शनशान्तिः ।**

[ मूळ ग्रंथांतील ] “ **अनंतरं=चवथे दिवशीं.** ” कारण, **मदनरत्नग्रंथांत** “ ज्या वेळीं तिथि, वार इत्यादिकांपैकीं शुभसूचक पुष्कळ असतील व अशुभसूचक थोडीं असतील अशा प्रसंगीं चवथे दिवशींच शांतिकर्म करून प्रशस्तकालीं [ वधूशीं ] संगम करावा ” याप्रमाणें सांगून पूर्वोक्त शांति सांगितली आहे. “ **पृथक्=शांतीच्या पूर्वी** ”. ‘ **देव निर्मित** ’=कृत्रिम नव्हे तें. ‘ **तडागे** ’= **सरोवराच्या समीप.** ज्यांचें परिमाण सांगितलें आहे अशीं चार द्रव्यें ( साळी, तांदूळ, तीळ व यव ) एकावर एक पसरून त्यांचें स्थंडिल करून त्यावर कमळ काढावें. ‘ **शुभैः** ’ या पदानंतर

“ **अर्चयेत् कुम्भे वरुणम्** ” ( कुंभावर वरुणाची पूजा करावी ) इतका अध्याहार ध्यावा. जप करण्याकरितां ब्राह्मणाचें वरण करावें हें सुचविण्याकरितां ‘ **अनुष्ठानपरः** ’ इत्यादि सांगितलें आहे. [ ऋतुमती स्त्रीस कुंभांतील उदकानें ] स्नान त्याच ( जप करणाऱ्या ) ब्राह्मणानें घालावें. ‘ **स्नात्वा** ’ ( स्नान करून ) हें यजमानास उद्देशून सांगितलें आहे. ‘ **देवं=वरुणास**. होमाची देवता सविता ( सूर्य ). याप्रमाणें **श्रीमदनंतदेव यांनीं केलेल्या संस्कारकौस्तुभनामक ग्रंथांतील मदनरत्नोक्त शान्तिप्रकरण समाप्त.**

**अथ बौधायनोक्ता रजोदर्शनशान्तिः । ऋतुशान्तिं व्याख्यास्यामः तिथिवारनक्षत्रलग्नदोषशान्त्यर्थं चतुर्थेऽन्हि पञ्चमेऽन्हि वा शान्तिस्नानं प्रकुर्वीत । देवालये गृहे वा प्रस्थाष्टभिर्धान्यैस्तदर्धैस्तण्डुलैस्तदर्धैस्तिलैश्चारत्निमात्रं चतुरस्रं कृत्वा, मध्ये नलिनमुल्लिख्य, कुशैर्दूर्वाभिः प्रतिच्छाद्य, तस्मिंस्तन्तुवेष्टितं कुम्भं निधायापोवाइदँसर्वमित्येतेनानुवाकेनाऽब्लिङ्गैः शान्तिकुम्भमुदकैः पूरयित्वा, कूर्चमन्तर्धाय, पञ्चपल्लवान् पञ्चत्वचश्च निक्षिप्य, कपित्थाश्वत्थपालाशबिल्वोदुम्बरं च नवरत्नं च निक्षिप्य, नववस्त्रयुग्मेनाच्छाद्य, नारिकेलफलेन पिधाय, बिल्वपल्लवैश्चूतपल्लवैश्चावकीर्य, पुरुषं पुण्डरीकाक्षं ध्यात्वा, गन्धधूपदीपैरुदकुम्भमभ्यर्च्याथ श्रोत्रियान्बहुश्रुतान्षट् चतुरो वा ब्राह्मणान् वरणपूर्वकमभ्यर्च्याचार्यं च तत्कुम्भमन्वारभ्य वैष्णवीं गायत्रीं सहस्राष्टकं शताष्टकं वा तदन्ते गायत्रीं च वेदादीनापोहिष्ठामयोभुव इति तिस्रः, हिरण्यवर्णाःशुचयः पावका इत्येतमनुवाकं, पवमानःसुवर्जन इत्येतमनुवाकं, पुरुषसूक्तमित्येतमनुवाकं, ऋचांप्राचीमित्येतमनुवाकम्, अथालङ्कृतां पत्नीमुरुविष्टरे तृण आसीनामापोहिष्ठामयोभुव इति तिसृभिर्हिरण्यवर्णाःशुचयःपावका इति चतसृभिः, पवमानःसुवर्जन इत्येतेनानुवाकेन, प्रत्यृचमाशीर्वादपुरःसरं स्नापयेयुः**

आतां **बौधायनऋषीनीं सांगितलेली रजोदर्शनशांति.** “ ऋतुशांतीचें विधान सांगतों. तिथि, वार, नक्षत्र व लग्न यांच्या दोषशांत्यर्थ चवथे किंवा पांचवे दिवशीं [ रजस्वला स्त्रीनें ] शांतिस्नान करावें. देवालयांत किंवा घरांत, आठ प्रस्थ व्रीहि, त्यांच्या निमें तांदूळ व त्यांच्या निमें तीळ याप्रमाणें धान्यांनीं अरत्निप्रमाण चतुरस्र ( चौकोनी ) स्थंडिल करावें. त्याच्यामध्यें कमळ काढावें. त्या स्थंडिलावर

१. क. ख. ग. घ. छ. गं ।

कुश व दूर्वा पसरून त्यावर सूत्रवेष्टित कलश स्थापन करावा. नंतर त्या कलशांत "**आपोवा इदँसर्वं०**" हा अनुवाक व "**आपोहिष्ठा०**" या तीन ऋचा म्हणून उदक घालावें. नंतर त्यांत कूर्च टाकावा. पंचपल्लव, साळी, कवठ, पिंपळ, पळस, बेल व उंबर या पांच झाडांच्या साली व नवरत्नें त्यांत घालावीं. त्या कलशास दोन नव्या वस्त्रांनीं वेष्टण करून त्यावर नारळ ठेवावा. नंतर बेलाचे व आंब्याचे पल्लव ठेवून पुंडरीकाक्षाचें ध्यान करावें. गंध, धूप, व दीप यांनीं त्या कलशाची पूजा करून वेदशास्त्रसंपन्न व बहुश्रुत असे सहा किंवा चार ब्राह्मण यांचें वरण करून त्यांची व आचार्याची पूजा करावी. नंतर त्या कुंभास स्पर्श करून अष्टोत्तरसहस्र किंवा अष्टोत्तरशत वैष्णवगायत्री, ( ॐ **नारायणायविद्महे०** ), व **गायत्री मन्त्र** [ यांचा जप करावा ] वेदांच्या प्रथम ऋचा, "**आपोहिष्ठामयोभुवः**" या तीन ऋचा, "**हिरण्यवर्णाः शुचयः पावका**" हा अनुवाक, "**पवमानःसुवर्जनः**" हा अनुवाक, **पुरुषसूक्त,** "**ऋचांप्राची**" हा अनुवाक याप्रमाणें म्हणावे. नंतर पत्नीस अलंकृत करून मोठ्या तृणासनावर बसवून "**आपोहिष्ठामयोभुवः**" या तीन ऋचा, "**हिरण्यवर्णाः शुचयःपावका**" या चार ऋचा व "**पवमानःसुवर्जनः**" हा अनुवाक या प्रमाणें मंत्रांनीं तिजला स्नान घालावें. प्रत्येक ऋचेचे शेवटीं आशीर्वाद देत जावा. ( "**शिवमस्तु कल्याणं चास्तु**" याप्रमाणें म्हणावें )

**ततो नारीं पञ्चगव्यं प्राशयित्वा । यत्त्वगस्थिगतं पापं देहे तिष्ठति मामके । प्राशनं पञ्चगव्यस्य दहत्वग्निरिवेन्धनमिति । शुचौ समे देशे स्थण्डिलं कल्पयित्वा लौकिकाग्निं प्रतिष्ठाप्य, स्वगृह्योक्तविधानेनाग्निमुखं कृत्वा, विष्णुसूक्तेन शताष्टकसंख्याः पलाशसमिधो हुत्वैवं ब्रह्मसूक्तेनान्नं, रुद्रसूक्तेनाज्यं, तेषामष्टादशकृत्वोऽथायुष्यहोमो घृतसूक्तेनाज्येन हुत्वा, ततो नक्षत्रहोमं तत्तन्मन्त्रेण, तस्य चतुर्दशकृत्वः पूर्ववत्समिदन्नाज्यैस्त्र्यंबकंयजामह इति तिलहोमं शताष्टकाहुतीरुपजुहुयात्स्विष्टकृत्प्रभृतिसिद्धमाधेनुवरप्रदानादथदक्षिणां दद्यादाचार्याय विशेषतः, ततः पुण्याहवाचनं कृत्वा, ततो नारी दोषात्प्रमुच्यत इत्याह भगवान् बौधायनः ।**

नंतर "**यत्त्वगास्थिगतं पापं देहे तिष्ठति मामके**" **प्राशनं पञ्चगव्यस्य दहत्वग्निरिवेन्धनम्** । या मंत्रानें स्त्रीकडून पंचगव्य प्राशन करवावें. नंतर शुद्ध सारख्या

१ ख. ग. च. छ. नात्पञ्च ।

प्रदेशावर स्थंडिल करून त्यावर लौकिकाग्नीची स्थापना करावी. व आपल्या गृह्य-सूत्रांत सांगितल्याप्रमाणें अग्निमुख ( अग्निस्थापनानंतरचें कृत्य ) करून **विष्णु-सूक्तानें** १०८ वेळां पलाशसमिधा; **ब्रह्मसूक्तानें** तितके वेळां चरु, व **रुद्रसूक्तानें** तितकेच वेळां आज्य याप्रमाणें होम प्रत्येक सूक्ताच्या अठरा आवृत्ति करून करावा. नंतर **घृतसूक्त** म्हणून घृतानें आयुष्य होम करावा. नंतर त्या त्या नक्षत्राचा मंत्र म्हणून समिधा, चरु, व आज्य यांनीं चौदावेळां नक्षत्र होम करावा. " **त्र्यंबकं यजामहे** " या मंत्रानें अष्टोत्तरशत तिळांचा होम करावा. नंतर **स्विष्टकृत्** होमापासून आचार्यास गोप्रदान देण्यापर्यंत कर्म करावें. नंतर दक्षिणा द्यावी. आचार्यास अधिक दक्षिणा द्यावी. नंतर पुण्याहवाचन करावें. याप्रमाणें केलें असतां स्त्री दोषांपासून मुक्त होते. याप्रमाणें भगवान् बौधायनऋषींनीं सांगितलें आहे.

**विष्णुसूक्तम्, विष्णोर्नुकं०, तदस्यप्रिय०, प्रतद्विष्णुः०, परोमात्रया०, विचक्रमे०, त्रिर्देव०, इति। ब्रह्मसूक्तम्, ब्रह्मजज्ञानमिति षड्टचम्। रुद्रसूक्तम्, परिणोरुद्रस्यहेतिः०। स्तुहिश्रुतंगर्त०। मीढुष्टम०। अर्हन्बिभर्षि०। त्वमग्नेरुद्रो०। आवोराजा० इति षड्टचम्। शताष्टकम् अष्टोत्तरशतमित्यर्थः। एतत्पूरणार्थमेवैकैकस्य षड्टचस्याष्टादशावृत्तयो विधीयन्ते।**

विष्णुसूक्तः—" **विष्णोर्नुकं०, १। तदस्यप्रिय० २। प्रतद्विष्णुः० ३। परोमात्रया० ४। विचक्रमे०५। त्रिर्देवः० ६।** हे मंत्र होत. ब्रह्मसूक्तः—" **ब्रह्मजज्ञानं०** " या सहा ऋचा होत. रुद्रसूक्तः—**परिणोरुद्रस्य हेति० १। स्तुहिश्रुतं० २। मीढुष्टम०३। अर्हन्बिभर्षि०४। त्वमग्नेरुद्रो०५। आवोराजान०६।** " या सहा ऋचा होत. ' शताष्टक ' याचा अर्थ अष्टोत्तरशत असा समजावा. म्हणूनच १०८ आहुति होण्याकरितां एकेक षड्टच ( सहा ऋचा ज्यांत आहेत अशा ) सूक्ताच्या अठरा वेळां आवृत्ति सांगितल्या आहेत.

**अथ घृतसूक्तम्। यो ब्रह्मा ब्रह्मण उज्जभार प्राणेश्वरः कृत्तिवासाः पिनाकी। ईशानो देवः स न आयुर्दधातु तस्मै जुहोमि हविषा घृतेन स्वाहा। इदं ब्रह्मणे१। विभ्राजमानः सरिरस्य मध्याद्रोचमानो घर्मरुचिर्य आगात्। स मृत्युपाशादपनुद्य घोरादिहायुषे नो घृतमत्तु देवः स्वाहा। इदं देवाय २। ब्रह्मज्योतिर्ब्रह्मपत्नीषु गर्भं यमादधात्पुरुरूपं जयन्तम्। सुवर्णरम्भं ग्रहमर्कमर्च्यं तमायुषे वर्धयामो घृतेन**

स्वाहा । इदमर्काय ३ । श्रियं लक्ष्मीमम्बिकामौपलाङ्गां[1] षष्ठीं जयामिन्द्रसेनेत्युदाहुः[2] । तां विद्यां ब्रह्मयोनिं सरूपामिहायुषे तर्पयामो घृतेन स्वाहा । इदं विद्यायै ४ । दाक्षायण्यः सर्वयोन्यः सयोन्यः सहस्रशो बहुरूपा[3] विरूपाः । ससूनवः सपतयः सयूथ्या आयुषे नो घृतमिदं जुषन्तां स्वाहा । इदं दाक्षायणीभ्यः ५ । दिव्यागणा बहुरूपाः पुराणा आयुश्छिन्दो नः प्रमथन्तु[4] वीरान् । तेभ्यो जुहोमि बहुधा घृतेन मा नः प्रजां रीरिषो मोतवीरान् स्वाहा । इदं दिव्यगणेभ्यः ६ । एकः पुरस्ताद्य इदं बभूव यतो बभूव भुवनस्य गोपाः । यमप्येति भुवनं साम्पराये स नो हविर्घृतमिहायुषेऽत्तुदेवः स्वाहा । इदं देवाय ७ । वसून् रुद्रानादित्यान्मरुतोऽथ साध्यानृभून् यक्षान् गन्धर्वांश्च पितॄंश्च विश्वान् । भृगून् सर्पांश्चाङ्गिरसोऽथ सर्वान् घृतं हुत्वा स्वायुष्यामहयामशश्वत् स्वाहा । इदं वस्वादिभ्यः ८ । इति घृतसूक्तम् । इत्यनन्तदेवीये संस्कारकौस्तुभे बौधायनोक्तप्रकारेण रजोदर्शनशान्तिः ।

आतां घृतसूक्त सांगतों. "यो ब्रह्मा ब्रह्मण उज्जभार प्राणेश्वरः कृत्तिवासाः पिनाकी । ईशानो देवः स न आयुर्दधातु तस्मै जुहोमि हविषा घृतेन स्वाहा । इदं ब्रह्मणे । १ । विभ्राजमानः सरिरस्य मध्याद्रोचमानो घर्मरुचिर्य आगात् । समृत्युपाशादपनुद्य घोरादिहायुषे नो घृतमत्तु देवः स्वाहा । इदं देवाय । २ । ब्रह्मज्योतिर्ब्रह्मपत्नीषु गर्भं यमो दधात् पुरुरूपं जयन्तम् । सुवर्णरम्भं ग्रहमर्कमर्च्यं तमायुषे वर्धयामो घृतेन स्वाहा । इदं अर्काय । ३ । श्रियं लक्ष्मीमम्बिकामौपलाङ्गां षष्ठीं जयामिन्द्रसेनेत्युदाहुः । तां विद्यां ब्रह्मयोनिं सरूपामिहायुषे तर्पयामो घृतेन स्वाहा । इदं विद्यायै । ४ । दाक्षायण्यः सर्वयोन्यः सयोन्यः सहस्रशो बहुरूपा विरूपाः । ससूनवः सपतयः सयूथ्या आयुषे नो घृतमिदं जुषन्तां स्वाहा । इदं दाक्षायणीभ्यः । ५ । दिव्या गणा बहुरूपाः पुराणा आयुश्छिन्दो नः प्रमथन्तु वीरान् । तेभ्यो जुहोमि बहुधा घृतेन मा नः प्रजां रीरिषो मोतवीरान् स्वाहा । इदं देवगणेभ्यः । ६ । एकः पुरस्ताद्य इदं बभूव यतो बभूव भुवनस्य गोपाः । यमप्येति भुवनं साम्पराये स नो हविर्घृतमिहायुषेऽन्त्तु देवः स्वाहा । इदं देवाय० । ७ । वसून् रुद्रानादित्यान्मरुतोऽथ साध्यानृभून्यक्षान् गन्धर्वांश्च पितॄंश्च विश्वान् । भृगून् सर्पांश्चाङ्गिरसोऽथ सर्वान् घृतं हुत्वा स्वायुष्यामहयाम शश्वत् स्वाहा । इदं वस्वादिभ्यः ।८।

१. ङ क्ष्मीमौषलामम्बिकाङ्ग, । २. च. ङ. हुः । ३. छ. विश्व. । ४. ङ. ज. प्रवधन्त ।

याप्रमाणें वृतसूक्त होय. याप्रमाणें **अनंतदेव** यांनीं केलेल्या **संस्कारकौस्तुभ** ग्रंथापैकीं **बौधायन** ऋषींनीं सांगितलेली **रजोदर्शनशांति समाप्त** ।

**अथ गर्भाधानम् । कश्यपः । षष्ठ्यष्टमीपञ्चदशीचतुर्थीश्चतुर्दशीमप्युभयत्र हित्वा । शेषाः शुभाः स्युस्तिथयो निषेके वाराः शशाङ्कार्यसितेन्दुजानामिति । आर्यो गुरुः । सितः शुक्रः । इन्दुजो बुधः । वसिष्ठः । उपप्लवे वैधृतिपातयोश्च विष्ट्यां दिवा पारिघपूर्वभागे । सन्ध्यासु पर्वस्वपि मातृपित्रोर्मृतेऽन्हि पत्नीगमनं च वर्ज्यमिति । तस्मिन्नृतौ पर्वाण्याद्याश्चतस्रो रात्रीर्वर्जयित्वा युग्मासु समासु षष्ठीप्रभृतिषु गच्छेत्तां पुत्रार्थे । अयुग्मासु स्त्रीजन्मभयादगमनं न तु प्रतिषेधात् । युग्मास्वपि रात्रिष्वेवोपगमनं नाहनि । तथाचाथर्वणीश्रुतिः । प्राणं वा एते प्रस्कन्दन्ति ये दिवा रत्या संयुज्यन्ते । ब्रह्मचर्यमेव तद्यद्रात्रौ संयुज्यन्त इति ।**

आतां **गर्भाधानाच्या कालाविषयीं. कश्यपः**—" दोन्हीं पक्षांच्या षष्ठी, अष्टमी, पौर्णिमा, चतुर्थी व चतुर्दशी या तिथींशिवाय बाकीच्या तिथी गर्भाधानास शुभ होत. त्याप्रमाणेंच चंद्र, गुरु, शुक्र व बुध यांचे वार शुभ होत. " **वासिष्ठः**—" ग्रहण, वैधृति, व्यतिपात, भद्रा, दिवस, परिघयोगाचा पूर्वार्ध, संधिसमय, पर्व ( यांची व्याख्या पुढें सांगितली आहे, ) व आईबापांची मृततिथी यांचे ठायीं पत्नीगमन करूं नये. " ऋतुप्राप्त झाला असतां प्रथम चार रात्री व पर्व हीं सोडून सहाव्या दिवसापासून समदिवसाचे ठायीं पुत्राकरितां स्त्रीगमन करावें. विषम रात्रीचे ठायीं कन्या होण्याची भीति असते, म्हणून त्या रात्रीं स्त्रीगमन करूं नये, केलें असतां निषेध आहे असें नाहीं. सम दिवशींही रात्रींच गमन करावें. दिवसा करूं नये. कारण " जे दिवसा स्त्रीगमन करितात ते आपल्या शक्तीची क्षीणता करितात, रात्रीं गमन करणें हें ब्रह्मचर्यव्रताप्रमाणेंच आहे " अशी **अथर्वश्रुति** आहे.

**शङ्खलिखितावपि । नार्तवे दिवा मैथुनं व्रजेदिति । पर्ववर्जं व्रजेच्चैनामिति मनुः । पर्ववर्जमित्यनेन निषिद्धतिथिनक्षत्राण्युपलक्ष्यन्ते । निषिद्धं पर्व चामावास्या पौर्णमासी च, तत्र स्त्रीगमनं श्रुत्या निषिद्धम् । नामावास्यां पौर्णमास्यां(?) श्रुत्वा स्त्रियमुपेयात् । यद्युपेयान्निरिन्द्रियः स्यादिति । चतुर्दश्यष्टमी चैव अमावास्या च पूर्णिमा । पर्वाण्येतानि राजेन्द्र रविसंक्रान्तिरेव च । तैलस्त्रीमांसभोगी च सर्वेष्वेतेषु वै पुमान् । विण्मूत्रभोजनं नाम प्रयाति नरकं नृपेति विष्णुपुराणे । एवं गच्छन् स्त्रियं क्षामां मघां मूलं च वर्जयेदिति । क्षामां लघ्वाहारादिना कृशा-**

**मित्यर्थः । अतएव बृहस्पतिः स्त्रीपुंसयोराहारविशेषं सनिमित्तमाह । स्त्रियाः शुक्राधिके स्त्री स्यात्पुमान् पुंसोऽधिके भवेत् । तस्माच्छुक्रविवृद्ध्यर्थं स्निग्धं भक्षं च भक्षयेत् । लध्वाहारां स्त्रियं कुर्यादेवं संजनयेत्सुतमिति ।**

**शंखलिखितांतही** " ऋतुकालीं दिवसां मैथुन करूं नये " याप्रमाणें सांगितलें आहे. " पर्व सोडून स्त्रीगमन करावें " याप्रमाणें **मनुस्मृति** आहे. येथें ' पर्व ' या शब्दानें निषिद्ध तिथि व निषिद्ध नक्षत्रें हीं समजावीं. निषिद्ध पर्व म्हणजे अमावास्या व पौर्णिमा होय. त्या दिवशीं स्त्रीगमन **श्रुतीनें** निषिद्ध सांगितलें आहे. ती श्रुति " अमावास्या व पौर्णिमा हीं समजलीं असतां स्त्रीगमन करूं नये. केल्यास निरिंद्रिय ( बलहीन ) होईल " अशा अर्थाची आहे. " चतुर्दशी, अष्टमी, अमावास्या, पौर्णिमा व रविसंक्रमणादिवस ( संक्रांत ) हीं पर्वें होत. यांचे ठायीं जो पुरुष तैल, स्त्री व मांस यांचें सेवन करील तो विण्मूत्रभोजन नांवाच्या ( ज्यांत विष्ठा व मूत्र यांचा आहार आहे अशा ) नरकास जातो " याप्रमाणें **विष्णुपुराणांत** सांगितलें आहे. " क्षामास्त्रीशीं मघा व मूल हीं नक्षत्रें सोडून गमन करावें " ' क्षामा ' याचा अर्थ ' अल्पाहारादिकानें कृश झालेली ' असा समजावा. म्हणूनच **बृहस्पतीनें** स्त्री व पुरुष यांनीं काय आहार करावा हें सांगून त्याचें कारणही सांगितलें आहे. " स्त्रीचें रेत जास्त असल्यास कन्या होते. पुरुषाचें रेत अधिक झाल्यास पुत्र होतो. म्हणून पुरुषानें शुक्रवृद्धि होण्याकरितां स्निग्ध पदार्थ भक्षण करावे. व स्त्रीनें अल्पाहार करावा. म्हणजे त्यामुळें पुत्र होईल "

**यत्तु षोडशर्तुर्निशाः स्त्रीणां तस्मिन् युग्मासु संविशेत् । ब्रह्मचार्येव पर्वाण्याद्याश्चतस्रश्च वर्जयेदित्येतद्व्याख्यावसरे मिताक्षराकारेणोक्तम् । ऋतौ श्राद्धदिनेऽपि गच्छतो न ब्रह्मचर्यहानिरिति तत्षोडशदिनेषु तदितरकालासंभवविषयम् ।**

" **षोडशर्तुर्निशाः स्त्रीणां तस्मिन् युग्मासु संविशेत् ॥ ब्रह्मचार्येव पर्वाण्याद्याश्चतस्रश्च वर्जयेत्** " या श्लोकाचें व्याख्यान करतेवेळीं **मिताक्षराकारानें** ऋतुकालीं श्राद्धदिवशींही स्त्रीगमन केलें असतां ब्रह्मचर्याची हानि होत नाहीं. असें सांगितलें आहे तें, सोळा दिवसांत श्राद्धदिवसाशिवाय इतर काल ( गमनास योग्य असा ) सांपडत नसेल तर त्या प्रसंगीं समजावें.

**पारिजाते । विष्णुप्रजेशरविमित्रसमीरपौष्णमूलोत्तरावरुणभानि निषेककाले ।**

**पूज्यानि पुष्यवसुशीतकराश्विचित्रादित्याश्च मध्यमफला विफलाः स्युरन्या इति। विष्णुः श्रवणम्। प्रजेशो रोहिणी। रविर्हस्तः। मित्रोऽनुराधा। समीरः स्वाती। पौष्णं रेवती। उत्तरात्रयम्। वरुणः शतभिषक्। एतानि पूज्यानि। वसुर्धनिष्ठा। शीतकरो मृगः। आदित्यः पुनर्वसुः। एतानि मध्यमानि। अन्यानि विफलानीत्यर्थः**[१]।

पारिजातग्रंथांत सांगितलें आहेः—" विष्णु, प्रजेश, रवि, मित्र, समीर, पौष्ण, मूळ, उत्तरा, वरुण हीं नक्षत्रें गर्भाधानास उत्तम होत. पुष्य, वसु, शीतकर, अश्विनी, चित्रा व आदित्य हीं मध्यम होत. अन्य नक्षत्रें निष्फळ समजावीं. **विष्णु=श्रवण. प्रजेश=रोहिणी. रवि=हस्त. मित्र=अनुराधा. समीर=स्वाती. पौष्ण=रेवती. उत्तरात्रय** ( उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा ) **वरुण=शततारका.** हीं उत्तम होत. **वसु=धनिष्ठा. शीतकर=मृग आदित्य=पुनर्वसू** हीं मध्यम होत. यां खेरीज बाकीचीं निष्फळ होत.

**विष्णुपुराणे। यस्मिनृक्षे भवेद्गर्भस्तस्माद्यद्दशमं भवेत्। तत्रापत्यं प्रजायेत तस्मादेतत्त्रयं त्यजेदिति। त्रयं मघारेवतीज्येष्ठाख्यानि। आपस्तम्बः। चतुर्थीप्रभृत्याषोडशीमुत्तरामुत्तरां युग्मां प्रजानिःश्रेयसमुपदिशन्ति। चतुर्थ्यां रात्रौ विधिर्निवृत्तरजस्कायाम्। व्यासः। रात्रौ चतुर्थ्यां पुत्रः स्यादल्पायुर्धनवर्जितः। पञ्चम्यां पुत्रिणी नारी षष्ठ्यां पुत्रस्तु मध्यमः। सप्तम्यामप्रजा योषिदष्टम्यामीश्वरः सुतः। नवम्यां सुभगा नारी दशम्यां चतुरः पुमान्। एकादश्यामधर्मा स्त्री द्वादश्यां पुरुषोत्तमः। त्रयोदश्यां सुता तस्या वर्णसंकरकारिणी। धर्मज्ञश्च कृतज्ञश्च आत्मवेदी दृढव्रतः। प्रजायते चतुर्दश्यां गुणौघैर्जगतीपतिः। राजपत्नी महाभागा राजवंशगता तथा। जायते पञ्चदश्यां तु बहुपुत्रा पतिव्रता। विद्यालक्षणसंपूर्णः सत्यवादी जितेन्द्रियः। आश्रयः सर्वभूतानां षोडश्यां जायते पुमानिति। रात्राविति न केवलमल्पायुः किंत्वन्यदपि। तदुक्तम् लैङ्गे। कदाचिज्जीवति चेद्विद्याहीनं व्रतहीनं पतितं पारदारिकं। दारिद्र्यार्णवमग्नं च तनयं सा प्रसूयत इति। चतुर्थ्यां रात्रौ यस्यां गम्यते सा एवं प्रसूयत इत्यर्थः।**

---

१ । छ. **विष्णुपुराणे** ऋतावुपगमः शस्तः स्वपत्न्यामवनीपते। पुन्नामर्क्षे शुभे काले ज्येष्ठयुग्मासु रात्रिष्वति। ज्येष्ठासु तासु रात्रिषु ज्येष्ठं च उत्तरोत्तरमलम् ३ **आश्वलायनः**-गर्भाधानं द्विजः कुर्यादृतौ प्रथम एव हि। चतुर्थदिवसादूर्ध्वं पुत्रार्थी दिवसे समे। क्रूरदारुणभं पौष्णं दस्राग्नी च द्विदैवतम्। श्राद्धाहं चैव रिक्तां च हित्वान्यस्मिन्विधीयत इति।

**विष्णुपुराणांत** सांगितलें आहेः—" ज्या नक्षत्रीं गर्भ धारण होतें त्या नक्षत्रापासून दहाव्या नक्षत्राचे ठायीं अपत्य उत्पन्न होतें. या कारणास्तव हीं तीन नक्षत्रें वर्ज करावीं " तीन म्हणजे मघा, रेवती, व ज्येष्ठा हीं नक्षत्रें होत. **आपस्तम्बः**— "चौथे रात्रीपासून सोळा रात्रीपर्यंत उत्तरोत्तर समरात्री, या, प्रजेला कल्याणकारक होत." चतुर्थरात्रीं गमनाचा विधि, ते दिवशीं ऋतु ( विटाळ ) बंद झाला असल्यास समजावा. **व्यासः**—" चतुर्थरात्रीं ( गमन केलें असतां ) अल्पायुषी व दरिद्री असा पुत्र, पंचम रात्रीं पुत्रवती अशी कन्या, सहावे रात्रीं साधारण पुत्र, सातवे रात्रीं प्रजारहित कन्या, आठवे रात्रीं पराक्रमी पुत्र, नववे रात्रीं भाग्यानें युक्त अशी कन्या, दहावे रात्रीं चतुर पुरुष, अकरावे रात्रीं धर्महीन कन्या, बारावे रात्रीं उत्तम पुत्र, तेरावे रात्रीं वर्णसंकर करणारी कन्या, चौदावे रात्रीं धर्मज्ञ, कृतज्ञ, आत्मवेत्ता, दृढव्रत व गुणांनीं राजासारखा अशा प्रकारचा पुत्र, पंधरावे रात्रीं बहुपुत्रा, पतिव्रता व राजपत्नी अशी कन्या व सोळावे रात्रीं विद्येनें व लक्षणांनीं युक्त, खरें बोलणारा, जितेंद्रिय व सर्व प्राण्यांस आश्रयभूत अशा प्रकारचा पुत्र, याप्रमाणें होईल असें समजावें. चतुर्थदिवशीं रात्रीं गमन केलें असतां केवळ अल्पायुषी पुत्र होतो इतकेंच नाहीं तर आणखी ही [ दोष आहेत ] **लिङ्गपुराणांत** सांगितलें आहेः—" कदाचित् तो मुलगा वांचला तरी विद्येनें हीन, व्रतहीन, दुष्कर्मी, परस्त्रीशीं गमन करणारा व दरिद्री अशा प्रकारचा होईल. " चतुर्थ रात्रीं ज्या स्त्रीशीं गमन केलें असेल ती स्त्री अशा प्रकारच्या पुत्रास प्रसवेल असा अर्थ समजावा.

**आश्वलायनः । दीक्षितस्तु महायज्ञे पित्रोः प्राग्वत्सरात् द्विजः । नेयाद्भार्यां प्रयत्नेन ऋतावप्यर्थितो बुधः। प्राग्रजोदर्शनात्पत्नीं नेयाद्गत्वा पतत्यधः । व्यर्थीकारेण शुक्रस्य ब्रह्महत्यामवाप्नुयादिति । महाभारते । ऋतौ गच्छति यो भार्यामनृतौ नैव गच्छति । यावज्जीवं ब्रह्मचारी मुनिभिः परिकीर्तितः । तथा 'ऋतुस्नातां तु यो भार्यां सन्निधौ नोपगच्छति । घोरायां भ्रूणहत्यायां युज्यते नात्र संशय इति । अस्य वचनस्य 'जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवान् जायते' 'यज्ञेन देवेभ्यः, प्रजया पितृभ्यो, ब्रह्मचर्येण ऋषिभ्य' इति श्रुतिमूलत्वेनोपपत्तेः श्रुत्यन्तरकल्पनाया अन्याय्यत्वादजातपुत्रं प्रत्येष नियमः । तथा च मनुः । ज्येष्ठेन जातमात्रेण पुत्री भवति मानवः । पितॄणामनृणश्चैव स तस्मात्सर्वमर्हतीति ।**

**यस्मिन्नृणं सन्नयति येनैवानन्त्यमश्नुते । स एव धर्मजः पुत्रः कामजानितरान् विदुरिति केचित् ।**

**आश्वलायनः**—" ज्यानें [ सोमादिक ] महायज्ञांची दीक्षा घेतली आहे व ज्याच्या मातापितरांचें मरण होऊन वर्ष झालें नाहीं अशा सुज्ञ द्विजानें ऋतुकालींही प्रयत्नानें स्त्रीगमन वर्ज करावें. ऋतु प्राप्त होण्याचे पूर्वी स्त्रीशीं गमन करूं नये, गमन केल्यास नरक प्राप्त होईल व रेत व्यर्थ घालविल्यामुळें [ त्या पुरुषास ] ब्रह्महत्या प्राप्त होईल. " **महाभारतांत** सांगितलें आहेः—"जो पुरुष स्त्रीशीं ऋतुकालीं गमन करितो, अन्यकालीं गमन करीत नाहीं तो यावज्जीव ब्रह्मचारी होय, याप्रमाणें ऋषींनीं सांगितलें आहे. " त्याचप्रमाणें " भार्या ऋतुस्नात असून आपण जवळ असतां जो तिच्याशीं गमन करीत नाहीं त्याला भयंकर बालहत्येचा दोष प्राप्त होतो. " " ब्राह्मण उत्पन्न जाहल्यावर त्यास तीन ऋणें असतात, त्यांपैकीं देवांचें ऋण यज्ञ केल्यानें, पितरांचें ऋण प्रजा उत्पन्न केल्यानें व ऋषींचें ऋण ब्रह्मचर्य धारण केल्यानें [ नाहींसें होतें ] " अशी श्रुति आहे, तन्मूलक हें वचन मानणें योग्य आहे. कारण याहून दुसरी श्रुति या वचनास मूलभूत आहे अशी कल्पना करणें अन्यायाचें आहे. म्हणून वर जो नियम ( स्त्रीशीं ऋतुकालीं गमन न केल्यास बालहत्यादोष होतो असा ) सांगितला तो ज्यास पुत्र झाला नाहीं त्या पुरुषास लागू होय. **मनुः**—" ज्येष्ठ पुत्र झाल्याबरोबर मनुष्य पुत्रवान् होतो व पितरांच्या ऋणांतून मुक्त होतो. म्हणून ज्येष्ठ पुत्रास सर्व [ वारसा ] मिळणें योग्य आहे. " " ज्यामुळें ऋणाचें अपाकरण होतें व ज्यामुळें अक्षय्यलोक प्राप्त होतो तोच धर्मज पुत्र समजावा. त्या शिवाय बाकीचे पुत्र कामज समजावे. " असें कित्येक म्हणतात.

**अन्ये तु ऋतोर्निमित्तत्वात्प्रतिनिमित्तं नैमित्तिकावृत्तिरुचिता । स्मरन्ति च । एष्टव्या बहवः पुत्रा यद्येकोऽपि गयां व्रजेदित्याहुः । व्यासः । वृद्धां वन्ध्यामसद्वृत्तां मृतापत्यामपुष्पिणीम् । कन्यासूं बहुपुत्रां च वर्जयेन्मुच्यते भयादिति । 'वृद्धा' सरजस्कापि गर्भधारणादावशक्ता, न तु गतरजस्का । अपुष्पिणीमित्यस्य पौनरुक्त्यापत्तेः**[३†] ।

१ ग. घ. ङ. येन चानन्त्य । २ छ. विंहिता । ३† छ. अस्यापवादः । बौधायनसूत्रानुयायिपद्धतिकर्त्रा विश्वकर्त्रा भेदेनोक्तः । त्रिरात्रं व्रतं चरेदित्युपक्रमस्य व्रतसमाप्तौ अस्तमिते आदित्ये अन्योन्यमलंकृत्याप आचम्य वाग्यतौ शय्यांगच्छत इत्युक्तम् । व्रतमध्येऽपि सह शयनमुक्तं **गोभिलेन** । एतत्प्रभृति त्रिरात्रमेकरात्रं वाक्षारालवणाशिनौ ब्रह्मचारिणौ भूमौ सह शयातामिति। अन्यसूत्रे शय्यैक्यमा*

पूजा केलेल्या युग्मसंख्याक ब्राह्मणांनीं हातांत दर्भ घेऊन पूर्वेस तोंड करून बसावें. त्यांच्या उजव्याबाजूस यजमानानें, हातांत दर्भ व उजव्या हातांत पूजा केलेला व पल्लवांनीं युक्त असा कुंभ घेऊन, उत्तरेस तोंड करून बसावें. यजमानाच्या उजव्याबाजूस त्याची स्त्री व संस्कार्य ( ज्याचा संस्कार कर्तव्य असेल ) यांनीं बसावें. नंतर कर्त्यानें '**ब्राह्मणानां मनः समाधीयताम्**' [याप्रमाणें म्हणावें.] ब्राह्मणांनीं '**समाहितमनसः स्मः**' [ याप्रमाणें म्हणावें.] पुनः कर्त्यानें '**प्रसीदन्तु भवन्तः**' असें म्हणावें. ब्राह्मणांनीं '**प्रसन्नाः स्मः**' [ असें म्हणावें. ]

**ततः सर्वे संहत्य पञ्चदशवाक्यानि वदेयुः । शान्तिरस्तु १ । पुष्टिरस्तु २ । तुष्टिरस्तु ३ । वृद्धिरस्तु ४ । अविघ्नमस्तु ५ । आयुष्यमस्तु ६ । आरोग्यमस्तु ७ । स्वस्तिशिवंकर्मास्तु ८ । कर्मसमृद्धिरस्तु ९ । धर्मसमृद्धिरस्तु १० । पुत्रसमृद्धिरस्तु ११ । वेदसमृद्धिरस्तु १२ । शास्त्रसमृद्धिरस्तु १३ । धनधान्यसमृद्धिरस्तु १४ । इष्टसंपदस्तु १५ । इत्युक्त्वा कर्मदेवतानामग्रहणपूर्वकं प्रीयतामिति वदेयुः । यत्र नामविशेषो नोक्तः तत्र प्रजापतिः प्रीयतामिति । अथ आवंदस्त्वमित्यृचं पठित्वा, ॐ पुण्याहं भवन्तो ब्रुवन्त्विति वदेत् । ॐ पुण्याहमिति परे ब्रूयुः । स्वस्तिन इत्यृचं पठित्वा, ॐ स्वस्ति भवन्तो ब्रुवन्त्विति वदेत् । ॐ स्वस्तीति परे । ऋद्ध्यामस्तोममित्यृचं पठित्वा, ॐ ऋद्धिं भवन्तो ब्रुवन्त्विति वदेत् । ॐ ऋद्ध्यतामिति परे । तत आपोहिष्ठेत्यादित्रिभिः, समुद्रज्येष्ठा इत्यादिभिर्वाभिषेकः कार्यः । ततः सुवासिन्यो नीराजनाशीःप्रयोगनूतनवस्त्रदानादिमङ्गलं कुर्युः । इति संक्षिप्तः पुण्याहवाचनप्रयोगः ।**

नंतर सर्वांनीं मिळून पंधरा वाक्यें म्हणावीं तीं:—"**शान्तिरस्तु०—इष्टसंपदस्तु** १५" याप्रमाणें म्हणून नंतर कर्माच्या देवतेचें नांव घेऊन त्यापुढें '**प्रीयताम्**' याप्रमाणें म्हणावें. जेथें [ कर्माच्या देवतेचें ] विशेष नांव सांगितलें नसेल तेथें '**प्रजापतिः प्रीयताम्**' याप्रमाणें [ म्हणावें. ]. नंतर '**आवदंस्त्वं०**' ही ऋचा म्हणून '**ॐ पुण्याहं भवन्तो ब्रुवन्तु**' असें [ यजमानानें ] म्हणावें. ब्राम्हणांनीं '**ॐ पुण्याहम्**' याप्रमाणें म्हणावें. नंतर '**स्वस्तिनइंद्रो०**' ही ऋचा म्हणून '**ॐ स्वस्ति भवन्तो ब्रुवन्तु**' याप्रमाणें [ कर्त्यानें ] म्हणावें. '**ॐ स्वस्ति**' असें ब्राम्हणांनीं [ म्हणावें ] नंतर [ यजमानानें ] '**ऋध्यामस्तोमं०**' ही ऋचा म्हणून '**ॐ ऋद्धिं भवन्तो ब्रुवन्तु**' याप्रमाणें म्हणावें. इतरांनीं ( ब्राह्मणांनीं ) '**ॐ ऋद्ध्यताम्**'

याप्रमाणें म्हणावें. नंतर ‘ **आपोहिष्ठा०** ’ या तीन ऋचांनीं किंवा ‘ **समुद्रज्येष्ठा०** ’ इत्यादिकांनीं अभिषेक करावा. नंतर सुवासिनी स्त्रियांनीं [ यजमानादिकांस ] ओंवाळणें, आशीर्वाद देणें व नवीन वस्त्रें देणें इत्यादि मंगल करावें. **याप्रमाणें पुण्याहवाचनाचा संक्षिप्त प्रयोग** [ समाप्त झाला ].

अथ **वृद्धिश्राद्धम्।** तच्च पार्वणत्रयात्मकम् । मातृभ्यः कल्पयेत्पूर्वं पितृभ्यस्तदनन्तरम्। ततो मातामहानां च कुर्याच्छ्राद्धं क्रमेण वेति वसिष्ठोक्तेः । एतदारम्भे मातृपूजनमवश्यं कार्यम् । अकृत्वा मातृयज्ञं तु यः श्राद्धं परिवेषयेत् । तास्तस्य क्रोधसंपन्ना हिंसां कुर्वन्ति दारुणामिति हेमाद्रौ भविष्योक्तेः । कर्माङ्गश्राद्धेप्येतत्कार्यम् । कर्मादिषु च सर्वेषु मातरः सगणाधिपाः । पूजनीयाः प्रयत्नेन पूजिताः पूजयन्ति ता इति षट्त्रिंशन्मते श्राद्धशेषिकर्माङ्गत्वस्यापि मातृपूजनप्रतीतेः ।

**आतां वृद्धिश्राद्ध** (नान्दीश्राद्ध) [सांगतों.] त्यांत तीन पार्वणें [असतात]. “ पूर्वीं मात्रादिकांस, नंतर पित्रादिकांस, नंतर क्रमानें मातामहादिकांस, उद्देशून श्राद्ध करावें ” याप्रमाणें **वसिष्ठाचें** वचन आहे. वृद्धिश्राद्धाच्या आरंभीं मातृपूजन अवश्य केलें पाहिजे, कारण “ मातृपूजन केल्याशिवाय जो श्राद्ध करितो त्याची, त्या मातृदेवता क्रुद्ध होऊन, भयंकर हानि करितात. ” याप्रमाणें **हेमाद्रिग्रंथांत भविष्यपुराणांतील** वचन आहे. कर्माच्या अंगभूत श्राद्धांतही मातृपूजन केलें पाहिजे, कारण “ सर्व कर्मांमध्यें गणपतीसहवर्तमान मातरांची प्रयत्नें करून पूजा करावी. त्यांची पूजा केली असतां त्याही [ यजमानाची वरप्रदानानें ] पूजा करितात, ” या **षट्त्रिंशन्मता**वरून मुख्य कर्माचे अंगभूत श्राद्धामध्येंही मातृपूजन [ करावें असें ] दिसतें.

अत्र विशेषो हेमाद्रौ चतुर्विंशतिमते । तिस्रः पूज्याः पितुः पक्षे तिस्रः पूज्याश्च मातृके । इत्येता मातरः प्रोक्ताः पितृमातृष्वसाष्टमी । ब्रह्माण्याद्याः स्मृताः सप्त दुर्गाक्षेत्रगणाधिपाः । वृद्धौ वृद्धौ सदा पूज्याः पश्चान्नान्दीमुखान् पितॄन् । गौरी पद्मा शची मेधा[1] सावित्री विजया जया । देवसेना स्वधा स्वाहा मातरो लोकमातरः । एतास्त्वभ्युदये पूज्या आत्मदेवतया सहेति । मातृपितामहीप्रपितामह्यः । मातामहीमातुःपितामहीमातुःप्रपितामह्यः । पितृष्वसा सप्तमी । मातृष्वसा अष्टमीत्यष्टौ मनुष्यमातरः प्रत्यक्षाः, प्रत्यक्षमेव कुङ्कुमवस्त्राभरणपुष्पा-

१ ग. ङ. च. ज. दक्षा.

**दिभिः पूज्याः। परोक्षास्तु वक्ष्यमाणदेवता मातृवदक्षतपुञ्जादिष्वावाह्य पूजनीया इति हेमाद्रिः । ब्रह्माण्याद्याः सप्त, दुर्गाक्षेत्रपालगणाधिपांश्च षोडशोपचारैः पूजयित्वा, नान्दीमुखान् पितॄन् पूजयेत् ।**

याविषयीं विशेष हेमाद्रि ग्रंथांत चतुर्विंशतिमतानें सांगितला आहे. " पितृपक्षीं पूजनीय अशा तीन, मातृपक्षीं पूजनीय तीन, बापाची बहीण व आठवी आईची बहीण, यांना ' माता ' ही संज्ञा आहे. ब्रम्हाणी इत्यादि सात, दुर्गा, क्षेत्रपति व गणाधिप यांची प्रत्येक वृद्धिश्राद्धांत पूजा करावी. नंतर नांदीमुख पितरांची [ पूजा करावी ]. गौरी, पद्मा, शची, मेधा, सावित्री, विजया, जया, देवसेना, स्वधा व स्वाहा माता व लोकमातांची अभ्युदयकर्मामध्यें कुलदेवतेसह पूजा करावी. " माता, पितामही ( आजी ) व प्रपितामही ( पणजी ), मातामही ( आईची आई ), मातृपितामही ( आईची आजी ) व मातृप्रपितामही ( आईची पणजी ), पितृष्वसा ( आत्या ) सातवी व आठवी मातृष्वसा ( मावशी ), या आठ मनुष्यरूपी प्रत्यक्ष मातांची कुंकुम, वस्त्र, अलंकार व पुष्पादिकांनीं प्रत्यक्षच पूजा करावी. परोक्ष अशा ज्या पुढील देवता त्यांचें अक्षतांचे ढीग करून त्यांवर आवाहन करून मग त्यांची मनुष्यमातांप्रमाणें पूजा करावी असें हेमाद्रि [ म्हणतो ]. ब्रम्हाणी इत्यादि सात, दुर्गा, क्षेत्रपाल व गणपति यांची षोडशोपचार पूजा करून नंतर नांदीमुखपितरांची पूजा करावी.

**शाखान्तरे महालक्ष्म्या सह अष्टौ ब्रह्माण्याद्याः पूज्या इत्युक्तम् । तथा 'गौरी पद्मा शची मेधा सावित्री विजया जया । देवसेना०। धृतिः पुष्टिस्तथा तुष्टिरात्मदेवतया सह । आभ्योऽर्घ्यं गन्धपुष्पं च धूपं दीपं निवेदयेत्' इति । आत्मदेवता कुलदेवता । अर्घ्यग्रहणेन षोडशोपचारपूजावश्यकेति द्योत्यते । तथा 'कुड्यलग्ना वसोर्धाराः पञ्च धारा घृतेन तु । कारयेत्सप्त धारा वा नातिनीचा नचोच्छ्रिताः । आयुष्याणि च शान्त्यर्थं जप्त्वा तत्र समाहित' इति । आयुष्याणि आनोभद्रादीनि सूक्तानि। तत्रेति यत्र मातृपूजायां वसोर्धारा कृता कातीयगृह्याद्यनुसारेण, तत्रायमायुष्यसूक्तजपः कार्यः । अनेनैव वसोर्धाराया अनित्यत्वं ज्ञापितम् ।**

---

१ ख. ग. ञ. निगद्यते.

**अन्य ग्रंथांत** ' महालक्ष्मीसह ब्रम्हाणी इत्यादिक आठांची पूजा करावी याप्रमाणें सांगितलें आहे. त्याप्रमाणें "गौरी, पद्मा, शची, मेधा, सावित्री, विजया, जया, देवसेना०, धृति, पुष्टि, तुष्टि व आत्मदेवता ( कुलदेवता ) यांना अर्घ्य, गंध, पुष्प, धूप व दीप समर्पण करावा "**आत्मदेवता=कुलदेवता**". '**अर्घ्य**' या शब्दानें षोडशोपचार पूजा आवश्यक आहे असें ध्वनित होतें. तसेंच " भिंतीवर पातळतुपानें पांच किंवा सात धारा काढाव्या. त्याला वसुधारा म्हणतात. त्या फार र्‍हस्व ( आंखूड ) किंवा फार लांब नसाव्या. त्या वेळीं शांतीकरितां एकाग्रचित्तानें आयुष्यसूक्तांचा जप करावा. " आयुष्य सूक्तें '**आनोभद्रा०**' इत्यादि सूक्तें. '**तत्र**' या शब्दानें ज्या प्रसंगीं **कात्यायनगृह्यसूत्रा**वरून मातृपूजनाच्या वेळीं वसुधारा केली असेल त्या प्रसंगीं आयुष्यसूक्तांचा जप करावा [ असें होतें ]. या वरूनच वसुधारा कृताकृत आहे असें बोधित होतें.

**ब्रह्माण्डे ।' स्वाहाशब्दं प्रयुञ्जीत स्वधास्थाने च बुद्धिमान्। वृद्धिश्राद्धे सदा सव्यं यज्ञसूत्रं च कारयेत् । कुशस्थाने च दूर्वाः स्युर्मङ्गलस्याभिवृद्धय ' इति । आश्वलायनगृह्यपरिशिष्टे तु । आभ्युदयिके युग्मा ब्राह्मणाः । अमूला दर्भाः । प्राङ्मुखेभ्य उदङ्मुखो दद्यादुदङ्मुखेभ्यो वा प्राङ्मुखो, द्वौ दर्भौ पवित्र इति । मङ्गलात्मक विवाहाद्यारम्भे क्रियमाणनान्दीश्राद्धे कुशस्थाने दूर्वाविधिः । यज्ञाद्यारम्भे तु क्रियमाणे अमूलदर्भविधिरिति व्यवस्था बोध्या ।**

**ब्रम्हांड पुराणांत** [ सांगितलें आहे ]:—" सुज्ञानें वृद्धिश्राद्धांत ' स्वधा ' याबद्दल ' स्वाहा ' या शब्दाची योजना करावी. यज्ञोपवीत नेहमीं सव्य असावें व मंगलाची वृद्धि होण्याकरितां दर्भांबद्दल दूर्वा घ्याव्या. " **आश्वलायनगृह्यपरिशिष्टांतः**—" नांदीश्राद्धामध्यें ब्राम्हण समसंख्याक, दर्भ अमूल, पूर्वाभिमुख [ ब्राम्हणांस ] उत्तराभिमुख [ यजमानानें ] किंवा उत्तराभिमुख [ ब्राह्मणांस ] पूर्वाभिमुख [ यजमानानें ] दान करावें, पवित्रास दोन दर्भ, याप्रमाणें असावे. " मंगलात्मक विवाह वगैरे कृत्यांच्या आरंभीं जें नांदीश्राद्ध करावयाचें त्यांत कुशांबद्दल दूर्वा घ्याव्या व यज्ञादिकांच्या आरंभीं करावयाचें जें [ नांदीश्राद्ध ] त्यांत अमूल दर्भ घ्यावे. याप्रमाणें व्यवस्था जाणावी.

**युग्मत्वेऽपि नियममाह हेमाद्रौ छागलेयः । ' एकैकस्य तु वर्गस्य द्वौ द्वौ विप्रौ समर्चयेत् । वैश्वदेवे तथा द्वौ च न प्रसज्येत विस्तर ' इति । भविष्ये ' सर्वे प्रद-**

क्षिणं कार्यं पूर्वाण्हे उपवीतिना' इति। 'पूर्वाण्हे भोजयेद्विप्रानष्टौ सर्वं प्रदक्षिणम्। तथा च नवमं विप्रं चतुरस्रे खगोत्तम' इति च। चरणक्षालनकाले समागतातिथिं क्षालनचतुरस्रदेशे भोजयेदित्येतदर्थमेतदिति हेमाद्रिः। अशक्तं प्रति पक्षान्तरं तत्रैव। 'नान्दीमुखान् समुद्दिश्य पितॄन् पञ्च द्विजोत्तमान्। भोजयेद्विधिवत्प्राज्ञ' इति। अष्टानां स्थाने चत्वारः। एकोऽतिथिः पूर्ववदधिक इत्यर्थः।

हेमाद्रींत छागलेयानें युग्म ब्राम्हणांविषयींही नियम सांगितला आहे:—"एका एका पार्वणाबद्दल दोन दोन ब्राम्हणांची पूजा करावी. त्याचप्रमाणें देवस्थानींही दोनच घ्यावे. यापेक्षां विस्तार करूं नये." भविष्यपुराणांत "पूर्वाण्हकालीं सव्यानें सर्व प्रदक्षिणच कर्म करावें. पूर्वाण्हकालीं आठ ब्राम्हणांस भोजन द्यावें. सर्व कर्म प्रदक्षिण करावें. [त्याचप्रमाणें] हे गरुडा, चतुरस्र (चौकोनी) [मंडलावर* ] नवव्या ब्राम्हणास भोजन घालावें." [ब्राम्हणांचे] पाय धुतेवेळीं आलेल्या अतिथीस पाय धुण्याच्या चौकोनी [मंडलाच्या] जागीं भोजन घालावें अशाकरितां हें [वचन आहे.] असें हेमाद्रि [म्हणतो]. अशक्ताकरितां दुसरा पक्ष तेथेंच सांगितला आहे:— "नांदीमुख पितरांच्या उद्देशानें पांच उत्तम ब्राम्हणांस यथाविधि भोजन घालावें." आठांच्या बद्दल चार व पूर्वीं सांगितल्याप्रमाणें एक अतिथि असा याचा अर्थ समजावा.

वृद्धिश्राद्धे विश्वेदेवाः सत्यवसुसंज्ञकाः। कर्माङ्गनान्दीश्राद्धे क्रतुदक्षसंज्ञकाः। इष्टिश्राद्धे क्रतुर्दक्ष इति वचनात्। इष्टिश्राद्धं कर्माङ्गश्राद्धमिति हेमाद्रिणा व्याख्यानात्। न च योगानुसारेणेष्ट्यङ्गश्राद्धमित्येव व्याख्योचितेति शङ्क्यम्। प्रधानस्यर्द्धिनोङ्गत्वस्य प्रवेशेनैवोद्देश्य बुद्धिपर्यवसाने सति इष्टिग्रहणस्य पश्वावत्तैव वपा कार्येत्यत्र वपाग्रहणस्येवाविवक्षितत्वात्। अतएव 'निषेककाले सोमे च सीमन्तोन्नयने तथा। ज्ञेयं पुंसवने श्राद्धं कर्माङ्गं वृद्धिवत्कृतम्' इति। वाक्येऽपि निषेकादिग्रहणमाधानाद्युपलक्षणार्थमिति पारिजातादयः। सोमशब्दस्तेषामुपलक्षणार्थ इति मदनरत्नादयः। अस्मिन्पक्षे पुत्रजन्मनिमित्तके प्रधानभूते नान्दीश्राद्धे सत्यवसू, नाङ्गभूते।

वृद्धिश्राद्धांत सत्यवसुसंज्ञक विश्वेदेव घ्यावे. कर्मांगभूत नांदीश्राद्धामध्यें क्रतुदक्षसंज्ञक

* मंडलावर पादप्रक्षालनाचा विधि **कातीयांत** प्रसिद्ध आहे. तें पादप्रक्षानाचें मंडल श्राद्धास बसणाऱ्या ब्राम्हणापासून थोड्या अंतरावर केलेलें असतें त्याच मंडलावर अतिथीस बसवून भोजन द्यावें.

[ विश्वेदेव ] ध्यावे. [ कारण ] इष्टिश्राद्धांत क्रतुदक्षसंज्ञक [ विश्वेदेव ध्यावे ] असें वचन आहे. इष्टिश्राद्ध म्ह० कर्मांग श्राद्ध असा **हेमाद्रीनें** त्याचा अर्थ केला आहे. यौगिक अर्थाच्या अनुरोधानें इष्टिश्राद्ध म्ह० इष्टीचेंच अंगभूत श्राद्ध असेंच व्याख्यान करणें योग्य आहे, अशी शंका घेऊं नये. कारण, प्रधान जें नांदीश्राद्ध त्यास अंगत्व आल्यामुळें त्याचे ठिकाणीं उद्देश्य बुद्धि झाली, यामुळें [त्याचा विशेषणीभूत] जो इष्टि शब्द त्याची येथें, '**पञ्चावत्तैव वपा कार्या**'* या वाक्यांतील '**वपा**' शब्दाप्रमाणें विवक्षा नाहीं [ असें समजावें. ] म्हणून गर्भाधानांत, सोमयज्ञांत, सीमंतोन्नयनांत व पुंसवनांत कर्मांगभूत वृद्धिश्राद्ध ( नांदीश्राद्ध ) करावें, या वाक्यामध्येंही 'निषेक' ( गर्भाधान ) इत्यादि शब्दांचें ग्रहण आधानादिकर्मांच्या उपलक्षणाकरितां आहे, असें **पारिजात** इत्यादिग्रंथांचें म्हणणें आहे. '**सोम**' शब्द त्यांच्या उपलक्षणार्थ आहे असें **मदनरत्न** इत्यादि ग्रंथकार म्हणतात. यापक्षीं पुत्राचा जन्म झाला असतां त्या निमित्तानें जें प्रधानभूत नांदीश्राद्ध [ करावयाचें ] त्यांत सत्यवसुसंज्ञक विश्वेदेव ध्यावे. [ गर्भाधानादि कर्मांचें ] अंगभूत जें [ नांदीश्राद्ध ] त्यांत घेऊं नयेत.

**अन्येतु निषेकादिशब्दानामुपलक्षणार्थतामन्याय्यां मन्यमाना निषेकादिगणितकर्मान्यकर्माङ्गनान्दीश्राद्धे सत्यवसू । गणितेषु क्रतुदक्षावित्याहुः । केषां कर्मणामारम्भे कार्यमित्यपेक्षायां बह्वृचकारिकायामुक्तम् । 'स्यादाभ्युदयिकं श्राद्धं वृद्धिपूर्तेषु कर्मसु । गर्भपुंसवसीमन्तचौलोपनयनेष्विह । विवाहे चानलाधेयप्रभृतिश्राद्धकर्मसु । इदं श्राद्धं प्रकुर्वन्ति द्विजा वृद्धिनिमित्तकम् । अन्यैः षोडशसंस्कारे श्रावण्यादिष्वपीष्यते । वाप्याद्युद्यापनादौ तु कुर्युः पूर्तिनिमित्तकम्' इति । अन्यैरित्युक्तसंस्कारेभ्योऽन्येषु जातकर्मादिषु, श्रवणाकर्मादिषु च तदनावश्यकमिति ज्ञापनार्थम् ।**

दुसरे कित्येक [ ग्रंथकार ] यांस 'निषेक' इत्यादि शब्द उपलक्षणाकरितां घेणें बरें न वाटून "निषेक इत्यादि शब्दांनीं [ श्लोकांत ] सांगितलेलीं जीं कर्मे त्यांहून

* '**पञ्चावत्तैव वपा कार्या**' म्हणजे जामदग्न्य इत्यादि विवक्षित गोत्रांच्या यजमानांनीं याग करतेवेळीं उपस्तरण, तीन वेळां वपेचें ग्रहण व अभिघार, याप्रमाणें वपा पंचावत्त करावी. या वाक्यांत '**वपा**' हा शब्द उद्देश्याचा विशेषण असल्यामुळें तो अविवक्षित आहे, म्हणून वरील विवक्षित गोत्रांच्या यजमानास कोणत्याही हविर्द्रव्यास पंचावत्त करावें लागतें. जै. न्या. मा. अ. १०-७-२०

अन्य कर्मांच्या अंगभूत नांदीश्राद्धामध्यें सत्यवसुसंज्ञक व [ श्लोकांत ] सांगितलेल्या कर्मांत क्रतुदक्षसंज्ञक [ विश्वेदेव घ्यावे ] असें ते म्हणतात. कोणत्या कर्मांच्या आरंभीं [ नान्दीश्राद्ध ] करावें याविषयीं **बहृचकारिकेंत**:—" वृद्धिकर्में ( विवाहादिक कर्में ) व पूर्तकर्में ( वापीकूपादिक ) यांत नांदीश्राद्ध करावें. गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, चौल, उपनयन, विवाह, अग्न्याधानादिकर्में व श्राद्धकर्में इतक्या कर्मांत हें वृद्धिश्राद्ध द्विज करितात. कित्येकांच्या मतें सोळाही संस्कारांत व श्रवणाकर्मांदिकांमध्यें [ हें नांदीश्राद्ध ] करावें. वापी इत्यादिकांचा उत्सर्ग कर्तव्य असतां पूर्तनिमित्तक नांदीश्राद्ध करावें. " ' अन्यै: ' ( कित्येकांच्या मतें ) या शब्दांवरून पूर्वी सांगितलेल्या संस्कारांशिवाय बाकी जे जातकर्मादि संस्कार व श्रवणाकर्मादि कर्में त्यांत नांदीश्राद्ध आवश्यक नाहीं असें सूचित होतें.

**कार्ष्णाजिनिः । 'सीमन्तोन्नयने चैव पुत्रादिमुखदर्शने । नान्दीमुखान् पितृगणान् पूजयेत्प्रयतो गृही' इति । अत्र पुत्रादीत्यादिशब्दात्पौत्रस्यापि संग्रह इति निर्णयामृते । अत्र विशेषं छन्दोगपरिशिष्टे कात्यायनः । ' असकृद्यानि कर्माणि क्रियन्ते कर्मकारिभिः । प्रतिप्रयोगं नैताः स्युर्मातरः श्राद्धमेव च । आधानसोमयोश्चैव वैश्वदेवे तथैव च । बलिकर्मणि दर्शे च पूर्णमासे तथैव च । नवयज्ञे च यज्ञज्ञा वदन्त्येवं मनीषिणः । एकमेव भवेच्छ्राद्धमेतेषु न पृथक् पृथक्' इति । अत्र प्रथमश्लोकोऽपराभ्यां आधानादीनां केषांचिदेवावृत्तावपि नान्दीश्राद्धं नावर्तत इत्येतत्परतया व्यवस्थाप्यते । अतएवापस्तम्बकल्पानुसारियाज्ञिकानां विच्छिन्नाधाने नान्दीश्राद्धाचारश्चिन्त्यः ।**

**कार्ष्णाजिनिः**—सीमंतोन्नयनांत व पुत्रादिकांचें मुखदर्शन झालें असतां, गृहस्थाश्रमी यानें शुचिर्भूत होऊन नांदीमुखपितृगणाची पूजा करावी. " या वचनांतील ' पुत्रादि ' यांतील आदि शब्दानें पौत्रही घ्यावा असें **निर्णयामृतांत** सांगितलें आहे. याविषयीं विशेष खुलासा **छन्दोगपरिशिष्टांत कात्यायनानें** केला आहे तो:—"कर्म करणाराकडून वारंवार जीं कर्में केलीं जातात त्यांतील प्रत्येक कर्मांच्या वेळेस मातृकापूजन व नांदीश्राद्ध करूं नये. आधान, सोमयज्ञ, वैश्वदेव, बलिकर्म, दर्श, पूर्णमास व नवयज्ञ या कर्मांत एकवेळच श्राद्ध करावें, प्रत्येकवेळीं वेगळें करूं नये, असें यज्ञवेत्ते

१ ख. ग. च. छ. ञ. आधान होम । ङ प्रधान होम ।

विद्वान् लोक म्हणतात. यांतील प्रथम श्लोकाची दुसऱ्या दोन श्लोकांवरून ' आधानादिक कित्येक कर्मांची आवृत्ति झाली असतांही नांदीश्राद्धाची आवृत्ति नाहीं ' अशी व्यवस्था जाणावी. म्हणून **आपस्तम्बसूत्रांचें** अनुसरण करणारे याज्ञिक, अग्नि विछिन्न झाला असतां पुनराधान करितेवेळीं जें नांदीश्राद्ध करितात, तो त्यांचा आचार विचारणीय आहे ( बरोबर नाहीं ).

**केषांचित्प्रथमप्रयोगेऽपि नैतत्कार्यमित्यप्याह सः । नाष्टकासुभवेच्छ्राद्धं न श्राद्धे श्राद्धमिष्यते । न सोष्यन्तीजातकर्मप्रोषितागतकर्मस्विति । अत्र द्वितीयः पादो हेतुवन्निगदतया प्रथमशेषः । प्रसवात्पूर्वं विहितं कर्म सोष्यन्तीकर्म । जातकर्माङ्गत्वे न निषेधस्तु छन्दोगमात्रविषयस्तत्परिशिष्टगतत्वादिति समयोद्योतः । तदापि वृद्धिनिमित्तकं पुरुषार्थं ततः पूर्वं भवत्येव । वृद्धिश्राद्धजातकर्मादीनां स्वकालातिपत्तौ सहैकस्मिन् दिने चौलादिना सह क्रियमाणेषु तेषु नान्दीश्राद्धं तन्त्रेण कार्यमित्यपि तत्रैव ।**

कित्येक कर्मांच्या प्रथमारंभींसुद्धां नांदीश्राद्ध करूं नये असेंही त्यानें सांगितलें आहे. " अष्टकांत नांदीश्राद्ध नाहीं [ कारण ] श्राद्धांत श्राद्ध होत नाहीं. सोष्यंती कर्म, जातकर्म व प्रवासास गेलेला परत आला असतां जें कर्म करावयाचें त्यांत [ नांदीश्राद्ध ] नाहीं. " या श्लोकांतील द्वितीय चरण हा प्रथम चरणास हेतुभूत असल्यामुळें त्याचा ( प्रथम चरणाचा ) परिशेष होय. प्रसव होण्यापूर्वीं जें कर्म सांगितलें आहे तें ' **सोष्यंतीकर्म** '. जातकर्मांगभूत [ नांदीश्राद्धाचा ] निषेध सांगितला तो सामवेदी यांनाच समजावा, कारण त्यांच्या **परिशिष्टांत** तो निषेध आहे असें **समयोद्योत** म्हणतो, तथापि पुरुषार्थभूत [ प्रधान ] जें नांदीश्राद्ध तें जातकर्माच्या पूर्वीं केलेंच पाहिजे. [ सामवेदीयांनींसुद्धां ] वृद्धिश्राद्ध व जातकर्मादि संस्कार यांचा मुख्य काल अतिक्रांत झाल्यामुळें चौलादिकांसहवर्तमान एकाच दिवशीं तीं कृत्यें करणें झाल्यास नांदीश्राद्ध तंत्रानें करावें असेंही तेथेंच सांगितलें आहे.

**परिशिष्टे । 'गणशः क्रियमाणेषु मातृभ्यः पूजनं सकृत् । सकृदेव भवेच्छ्राद्धमादौ न पृथगादिष्विति' । अत्रादौ यज्जन्मनिमित्तं यच्च संस्कारादिषु विहितं तत्सकृदेव कार्यं न पृथगित्यन्वयः । ततश्च पुत्रजनि[२]निमित्तं चौलान्तसंस्काराङ्गं च**

१ ख. च ग. द्याते. २ ख ज. ञ. जन्म । २

**नान्दीश्राद्धं तन्त्रेण करिष्ये इति संकल्पः । यद्यपि वृद्धवसिष्ठेन ‘ नान्दीमुखे विवाहे च प्रपितामहपूर्वकम् । नाम संकीर्तयेद्विद्वानन्यत्र पितृपूर्वकम् ’ इत्युक्तम् । स्मृत्यर्थसारेऽपि ‘ वृद्धमुख्याश्च पितरो वृद्धिश्राद्धेषु भुञ्जत ’ इति, न तदाश्वलायनशाखिभिरनुसर्तव्यम् । ‘ माता पितामही चैव तथैव प्रपितामही । पित्रादयस्त्रयश्चैव मातुः पित्रादयस्त्रयः । एते नवार्चनीयाः स्युः पितरोऽभ्युदये द्विजैः ’ इत्याश्वलायनस्मृतिवशेन मात्रादीनां अनुलोमक्रमप्रतीतेर्बह्वृचैरनादरणीयं तदिति पारिजातोक्तेः ।**

**परिशिष्टांतः**—“[ जातकर्मादिसंस्कार ] एकदम करणें झाल्यास मातृपूजन एकदांच करावें. त्याचप्रमाणें वृद्धिश्राद्धही एकदांच करावें निरनिराळें करूं नये. ” याश्लोकांत ‘ **आदौ** ’ म्हणजे जन्मनिमित्तक आणि जें संस्कारांगभूत सांगितलें तें, अशीं दोन्हीं [ नांदीश्राद्धें ] तंत्रानें करावीं, निरनिराळीं करूं नयेत असा अन्वय समजावा. म्हणून “ **पुत्रजन्मनिमित्तं चौलान्तसंस्काराङ्गं च नान्दीश्राद्धं तन्त्रेण करिष्ये** ” याप्रमाणें संकल्प करावा. जरी “ नांदीश्राद्धांत व विवाहांत विद्वान् मनुष्यानें प्रपितामहापासून आरंभ करून नामोच्चार करावा, इतर कर्मांत पित्यापासून [ नामोच्चार करावा ] ” असें **वृद्धवसिष्ठ** म्हणतो, त्याचप्रमाणें “ नांदीश्राद्धामध्यें वृद्धमुख्य ( प्रपितामहपूर्वक) पितृगण भोजन करितात ” असें **स्मृत्यर्थसारां**तही सांगितलें आहे, तरी **आश्वलायनशाखी यांनीं** त्याचें अनुसरण करूं नये. माता, पितामही व प्रपितामही, पिता, पितामह व प्रपितामह, मातामह, ( आईचा बाप ) मातुः पितामह ( आईचा आजा ) व मातुः प्रपितामह, ( आईचा पणजा ) या नऊ पितरांची [विवाहादि] मंगल कृत्यांत ब्राम्हणांनीं पूजा करावी, ” अशी **आश्वलायन**स्मृति असल्यामुळें आई, आजी, पणजी, अशा अनुलोम ( सरळ ) क्रमाचा बोध होतो, म्हणून बह्वृचांनीं ( ऋग्वेदी यांनीं ) तें ( पूर्वोक्त **वृद्धवसिष्ठ** व **स्मृत्यर्थसार** यांतील वचन ) मानूं नये, असें **पारिजात**ग्रंथांत सांगितलें आहे.

**‘ एवं पित्रर्थविप्रेभ्यः प्रदायार्घ्यं यथाविधि । पितामहाय विप्रेभ्यो दत्वार्घ्यं च यथा पुरा । प्रपितामहशब्दादिमिदं तेऽर्घ्यमितीरयेत् ’ इति पारिजातोदाहृतभगवत्स्मृतौ च अर्घ्यदानक्रमप्रतीतेः । ‘ प्रपितामहसंयुक्तं मन्त्रमुक्त्वा तमेव तु । तदर्थमुपविष्टेभ्यस्तृतीयं सकृदेवतु ’ इति कारिकोक्तेश्च । उक्त्वा पितरिदं तेऽर्घ्यमिति**

**पित्रेऽर्घ्यमानयेदित्युक्तं शौनकेन, " एवमेवार्घ्यदानं तु कुर्यादुत्तरयोर्द्वयो क्तेश्च"। एवमेव जयन्तोक्तेश्च ।**

" याप्रमाणें पितृस्थानीं असणाऱ्या ब्राम्हणांस यथाविधि अर्घ्य देऊन पि स्थानीं असणाऱ्या ब्राम्हणांस पूर्वींप्रमाणेंच अर्घ्य द्यावें ( नंतर ) प्रपितामह श उच्चार करून ' इदं ते अर्घ्यम् ' असा उच्चार करावा " असा **पारिजात** सांगितलेल्या **भगवत्स्मृतींत** अर्घ्यदानाचा क्रम सांगितला आहे. " प्रपितामह पूर्वक त्याच मंत्राचा उच्चार करून त्याच्या ( प्रपितामहाच्या ) स्थानीं अस ब्राम्हणास तृतीय ( अर्घ्य ) एकवेळ द्यावें " असें **कारिकेंत** सांगितलें आहे. **कानेंही**:—' **पितरिदं ते अर्घ्यम्** ' असें म्हणून पित्यास अर्घ्यदान करावें सांगून ' याचप्रमाणें पुढील दोघांस ( पितामह व प्रपितामह यांस ) अ करावें. ' असें सांगितलें आहे. **जयन्ताचें**ही असेंच म्हणणें आहे.

**अथ जीवत्पितृकस्य संस्कर्तुर्नान्दीश्राद्धनिर्णयः । तत्र कात्यायनः । तीर्थे च संन्यस्ते ताते च पतिते सति । येभ्य एव पिता दद्यात्तेभ्यो दद्य सुत ' इति । गृह्यपरिशिष्टे तु नान्दीश्राद्धं प्रकृत्योक्तम् । महत्सु पूर्वेद्युस्तदह तदिदमेके मातृणां पृथक्कुर्वन्ति, अथ पितृणां, अथ मातामहानाम्, इति त्रि च्छन्ति । तस्माज्जीवत्पिता सुतसंस्कारेषु मातृमातामहयोः कुर्यात्तस्यां जीव मातामहस्यैव कुर्यादिति । महत्सु उपनयनादिषु । अल्पेषु पुंसवनादिषु । पृथक भेदेन पूर्वाण्हादिकालभेदेन वा । त्रितयं श्राद्धत्रयं, भिन्नप्रयोगमित्याशयः**

**आतां संस्कार करणाऱ्याचा बाप जिवंत असल्यास** [ त्यानें करावया **नांदीश्राद्धाचा निर्णय** सांगतों. त्याविषयीं **कात्यायनः**—" वृद्धिश्राद्ध तीर्थश्राद्धांत तसेंच पिता संन्यासी किंवा पतित असेल तर ज्या पितृगणास पित्यानें दान केलें असतें, त्यासच उद्देशून पुत्रानें दान करावें " **गृह्यपरिशिष्ट** नांदीश्राद्धाचा उपक्रम करून सांगितलें आहे कीं " मोठ्या कार्यांत ( विवाहावि पूर्वदिवशीं व लहान कार्यांत ( पुंसवनादिकांत ) त्याच दिवशीं [ नांदी करावें. कित्येक मातृश्राद्ध निराळें ( दिनभेदानें किंवा कालभेदानें ) करून पितृश्राद्ध व त्याच्या मागून मातामहश्राद्ध, अशा रीतीनें तीन श्राद्धें करावी

१ ख. च ज. च ।

म्हणतात. म्हणून जीवत्पितृकानें सुतसंस्कार कर्तव्य असतां मातृत्रयी व मातामहत्रयी यांच्या उद्देशानें नांदीश्राद्ध करावें. माता जिवंत असेल तर मातामहत्रयीसच उद्देशून करावें. '**महत्सु=उपनयनादिकांत**'. '**अल्पेषु=पुंसवनादिकांत.**' '**पृथक्**'=**निरनिराळ्या दिवशीं किंवा निरनिराळ्या वेळीं.** '**त्रितय**'='**तीन्हीं श्राद्धें,**' निरनिराळीं असा भाव समजावा.

**तथाच गार्ग्यः । मातृश्राद्धं तु पूर्वेद्युः कर्माहनि तु पैतृकम् । मातामहञ्चोत्तरेद्युर्वृद्धौ श्राद्धत्रयं स्मृतमिति । तथाच शातातपः । पूर्वाण्हे मातृकं श्राद्धं मध्यान्हे पैतृकं तथा । ततो मातामहानां च वृद्धौ श्राद्धत्रयं स्मृतमिति । एके इच्छन्तीति परिशिष्टोक्त्या सहप्रयोगः स्वाभिमतत्वेन सूचितः । उक्तश्चानुकल्पत्वेन वृद्धमनुना । अलाभे भिन्नकालानां नान्दीश्राद्धत्रयं बुधः । पूर्वेद्युर्वै प्रकुर्वीत पूर्वाण्हे मातृपूर्वकमिति । एवं जीवत्पितृकं प्रत्यपि तीर्थ इव श्राद्धत्रयप्राप्तौ विषयविशेषेऽपवादार्थमुच्यते तस्मादिति । तत्र पार्वणद्वयेनैव नान्दीश्राद्धफलसिद्धिरित्याशयः । एवं जीवन्मातृपितृकस्य मातामहश्राद्धेनैव तत्सिद्धिरित्याशयेनोक्तं तस्यामित्यादि ।**

**गार्ग्यः**—" [ कर्माच्या ] पूर्वदिवशीं मातृश्राद्ध, कर्माचेदिवशीं पितृश्राद्ध, व [ कर्माच्या ] दुसरे दिवशीं मातामहश्राद्ध, याप्रमाणें मंगलकार्यांत तीन श्राद्धें समजावीं, **शातातपः**—" पूर्वाण्हकालीं मातृश्राद्ध, मध्यान्हकालीं पितृश्राद्ध, नंतर मातामहश्राद्ध याप्रमाणें मांगलिक कार्यांत तीन श्राद्धें करावीं. **परिशिष्टांत '*एके इच्छन्ति*'** ( कित्येक म्हणतात ) असें म्हटल्याकारणानें [ या श्राद्धांचा ] सहप्रयोग ( एककालींच प्रयोग करणें ) **परिशिष्टकारास** संमत आहे असें सूचित होतें. **वृद्धमनूनें** हा सहप्रयोग गौणपक्ष म्हणून सांगितला आहे. " तिन्हीं नांदीश्राद्धांस निरनिराळे काल न सांपडल्यास सुज्ञमनुष्यानें तीं श्राद्धें [ मंगलाचे ] पूर्वदिवशीं पूर्वाण्हकालीं मातृश्राद्धपूर्वक करावीं. " याप्रमाणें जीवत्पितृकास तीर्थश्राद्धाप्रमाणेंच तीन श्राद्धें करणें प्राप्त झालें असतां विशेष प्रसंगीं त्याचा अपवाद " **तस्माज्जीवत्पिता** " या ग्रंथानें सांगितला आहे. पिता जिवंत असतां दोन पार्वणांनीं (मातृपार्वण व मातामहपार्वण यांनीं ) नांदीश्राद्धसिद्धि होते असा [ वरील ग्रंथाचा ] आशय समजावा. त्याचप्रमाणें माता व पिता जिवंत असतां मातामहश्राद्धानेंच नांदीश्राद्धाची सिद्धि होते अशा आशयानें " **तस्यां जीवन्त्यां** " इत्यादि सांगितलें आहे.

**एतच्चोपलक्षणार्थम् । जीवत्पितृमातामहस्य मातृपार्वणेनैव तत्सिद्धिरित्यपि बो-**

---

१ छ. णन त ।

ध्यम् । यद्वर्गाद्यो जीवति तत्पार्वणातिरिक्तपार्वणानुष्ठाने नान्दीश्राद्धफलसिद्धिरित्यत्र तात्पर्यस्य वाक्यभेदभयेन तस्मादित्यादिग्रन्थे स्वीकर्तुमुचितत्वात् । एवं च सति मृतपितृकजीवन्मातृमातामहस्य पितृपार्वणमात्रेण नान्दीश्राद्धसिद्धेः साधकतया सकलदाक्षिणात्यस्वीकृतेन, " पितृवर्गे मातृवर्गे तथा मातामहस्य च । जीवेत्तु यदि वर्गाद्यस्तं वर्गं तु परित्यजेत् " इति शास्त्रेण संवादलाभात् ।

वर सांगितलेले दोन्हीं प्रकार उपलक्षणार्थ आहेत, म्हणून ज्याचा बाप व मातामह जिवंत आहे त्यानें फक्त मातृपार्वण केलें असतां नांदीश्राद्धसिद्धि होते असेंही समजावें. आतां वरीलप्रमाणें निरनिराळीं वाक्यें मानल्यास वाक्यभेददोष* येईल या भीतीनें ज्या पार्वणाचा प्रथम ( माता, पिता किंवा मातामह ) जिवंत असेल तें पार्वण खेरीजकरून बाकीचीं पार्वणें केलीं असतां नांदीश्राद्धाच्या फलाची सिद्धी होते असें " तस्माज्जीवत्पिता " इत्यादि ग्रंथांचें तात्पर्य मानणें योग्य आहे. आणि असें मानल्यानें ज्याचा पिता मृत असून माता व मातामह जिवंत आहेत अशानें फक्त पितृपार्वण केलें असतां नांदीश्राद्धसिद्धि होते अशाविषयीं प्रमाण म्हणून सर्व दाक्षिणात्य विद्वानांनीं स्वीकारलेल्या " पितृवर्ग, मातृवर्ग, व मातामहवर्ग या तीन वर्गांपैकीं ज्या वर्गाचा प्रथम जिवंत असेल तो वर्ग सोडून द्यावा " या वचनाची व ' तस्माज्जीवत्पिता ' या परिशिष्टग्रंथाची एकवाक्यता होते.

एवं सति ' येभ्य एव पिता दद्यादिति शास्त्रेण ' पितुः पितृपार्वणं, परिशिष्टबलेन च स्वमात्रादिपार्वणं, समुच्चयेन कार्यमित्यत्यन्तानुचितम् । परिशिष्टस्वरसविरोधात् । तस्यां जीवन्त्यां मातामहस्यैव कुर्यादिति पारिजाताद्यनेकग्रन्थसंमतपाठे, एवकारविरोधाच्च । न गिरा गिरेति ब्रूयादितिवदर्थप्राप्तेतरनिवृत्त्यनुवादतया तत्स्वीकारेण ' अत्र ह्येवावपन्ति ' इतिवत् श्रौतपरिसंख्याङ्गीकारगौरवस्याप्यनापत्तेश्च । तं वर्गं तु परित्यजेदिति शास्त्रविरोधाच्च । येभ्य एवेति शास्त्रस्य परिशिष्टस्य च पारिजातोक्तव्यवस्थाविरोधापत्तेश्च ।

---

* एकाच वाक्यानें दोन विधानें केलीं असतां वाक्यभेद होतो. वाक्यभेद होणें हा दोष आहे असें मीमांसक मानतात. जसें. " ग्रहं संमार्ष्टि " या वाक्याचा ' ग्रहं संमृज्यात्, तं चैकं, ' ( ग्रहाचा म्ह० पात्रविशेषाचा संमार्ग म्ह० शुद्धि करावी व ती एकाच ग्रहाची करावी ) असा अर्थ केल्यास संमार्गाचें व एकत्वाचें अशीं दोन विधानें झाल्यामुळें वाक्यभेद झाला. याकरितां एकत्वाची अविवक्षा मानून फक्त संमार्गाचेंच विधान ते मानितात, तसें मानलें म्हणजे वाक्यभेद होत नाहीं. **जै. न्या. मा. अ. ३ । १ । ७**

असें असून '**येभ्य एव पिता दद्यात्**' या शास्त्रावरून [ जीवत्पितृकानें ] आपल्या पित्याची पितृत्रयी व **गृह्यपरिशिष्टाच्या** अनुरोधानें आपली स्वतःची मातृत्रयी व मातामहत्रयी यांचा समुच्चय करावा असें मानणें अत्यंत अनुचित होय. [ कारण, असें मानल्यास ] **परिशिष्टाचें** स्वारस्य नाहींसें होऊन '**तस्यां जीवन्त्यां मातामहस्यैव कुर्यात्**' असा **पारिजातादि** अनेक ग्रंथांस मान्य जो पाठ त्यांतील एवकारासही वैयर्थ्य येतें. "**न गिरा गिरेति ब्रूयात्***" याप्रमाणें अर्थात् सिद्ध झालेली जी इतर निवृत्ति ( इतर पार्वणनिवृत्ति ) तिचा अनुवादक एवकार मानल्यानें '**अत्र ह्येवावपन्ति**‡' याप्रमाणें श्रौतपरिसंख्या मानण्याचें गौरवही येत नाहीं. शिवाय पित्याची पितृत्रयी व स्वतःची मातृत्रयी व मातामहत्रयी घ्यावी असें मानल्यास '**तं वर्गं तु परित्यजेत्**' या शास्त्राशीं विरोध येऊन '**येभ्य एव**' या वचनाची व **परिशिष्टाची, पारिजातग्रंथांत** केलेली जी व्यवस्था तिच्याशींही विरोध येईल अशी आपत्ती येते.

---

* '**यज्ञायज्ञिये साम्नि ऐरं कृत्वोद्गेयम्**' (" यज्ञायज्ञावो अग्नये गिरा गिराच दक्षसे " या ऋचेचें सामगान करतेवेळीं ऋचेंत असलेल्या गिराशब्दाचे ठिकाणीं इराशब्दाचा उच्चार करून गान करावें. ) असें सांगितलें असून, पुनः '**न गिरा गिरेति ब्रूयात्**' ( वाणीनें '**गिरा**' असें म्हणूं नये ) असा निषेध केला आहे. परंतु पूर्वीच्या वाक्यानेंच ( **ऐरं कृत्वा उद्गेयम्** ) जेथें गिराशब्द आहे तेथें इरा शब्दाचा उच्चार करूनगान करावें. असें सांगितलें असल्यामुळें '**न गिरा गिरेति ब्रूयात्**' हा निषेध सांगण्याची आवश्यकता रहात नाहीं, म्हणून हा निषेध अपूर्व नसून '**ऐरं कृत्वा उद्गेयम्**' याचाच अनुवाद आहे असें मानिलें आहे. **जै न्या. मा.** ९।१।१८

‡ "**अत्र ह्येवावपन्ति**" हें श्रौतपरिसंख्येचें उदाहारण आहे. परिसंख्या हा मीमांसेंत मानलेल्या विधीं पैकींच एक प्रकार आहे. तिचें लक्षण "**इतरव्यावृत्तिपरो विधिः परिसंख्याविधिः**" ( ज्या विधीचें इतर व्यावृत्ति करण्याविषयीं तात्पर्य असतें तो परिसंख्या विधि समजावा ) जसें '**अत्र ह्येवावपन्ति**' एका यागविशेषांत त्या यागाच्या प्रकृतिभूत यागांतील सामगानाच्या ऋचांपेक्षां जास्त संख्येच्या ऋचांचें गान करण्याविषयीं सांगितलें आहे. तेव्हां जास्त ऋचा ज्या घ्यावयाच्या त्या निराळ्या ठिकाणच्या घ्याव्या किंवा प्रकृतिभूत यागांतील कांहीं ऋचांची आवृत्ति करून जास्त संख्येची भरती करावी असा संशय उत्पन्न होतो. त्याचें निवारण करण्याकरितां "**अत्र ह्येवावपन्ति**" हें वचन सांगितलें आहे या वचनानें प्रकृतिभूत यागाच्या ऋचांतूनच "**आवाप**" ( जास्त संख्येची भरती ) करावी. या विधीनें इतर ठिकाणच्या ऋचेंतून अधिक संख्येची भरती करण्याविषयींची व्यावृत्ति होतें, म्हणून हा "**परिसंख्याविधि**" झाला. या उदाहरणांत "**एव**" या शब्दानें इतर व्यावृत्ति होत असल्यामुळें ही श्रौती परिसंख्या होते. अनुवाद मानण्यापेक्षां विधि मानण्यांत गौरव आहे असा सिद्धान्त आहे. **पू. मी. अ. १० । ४ । १४**

तथाहि तत्रोक्तपरिशिष्टमुदाहृत्य तत्संवादितया " सपितुः पितृकृत्येषु अधिकारो न विद्यते। न जीवन्तमतिक्रम्य किंचिद्दद्यादिति श्रुतिः " इति कातीयवचनमुदाहृत्य, ' पितृकृत्येषु पितामहादिसंबन्धिषु श्राद्धेष्वित्यर्थः ' इति व्याख्याय केषुचिदेतदपवादत्वेन ' उद्वाहे पुत्रजनने पित्र्येष्ट्यां सौमिके मखे। तीर्थे ब्राह्मण आयाते षडेते जीवतः पितुः ' इति मैत्रायणीयपरिशिष्टमुदाहृतम्। तदधिकारे च ' येभ्य एव पिता दद्यात्तेभ्यो दद्यात्स्वयं सुत ' इत्येतत्समानार्था विष्णुस्मृतिरुदाहृता। पितरि जीवति यः श्राद्धं कुर्यात्स येषां पिता कुर्यात्तेषां कुर्यात्, पितरि पितामहे च येषां पितामह इति।

ती अशीः—तेथें (पारिजातग्रंथांत) वर सांगितलेल्या गृह्यपरिशिष्टाचा उल्लेख करून त्यास साधक म्हणून ' जीवत्पितृकास पितामहसंबंधीं श्राद्धें करण्याचा अधिकार नाहीं. कारण जिवंत असलेल्याचें उल्लंघन करून त्याच्या [ पूर्वींच्यास ] कांहींही देऊं नये अशी श्रुति आहे, असें कात्यायन वचन सांगून [ त्या वचनांतील ] ' पितृकृत्येषु, याचा ' पितामहादिसंबंधीं श्राद्धाविषयीं असा अर्थ समजावा, ' अशी व्याख्या करून, कित्येक [ कर्मांचे ] ठिकाणीं याचा ( जीवत्पितृकास पितामहादिकांचें श्राद्ध करण्याचा अधिकार नाहीं असें जें कात्यायन वचन आहे त्याचा ) अपवाद म्हणून मैत्रायणीयपरिशिष्ट सांगितलें आहे. तें असें " विवाहांत, पुत्र झाला असतां, पित्र्येष्टींत, सोमयज्ञांत, तीर्थाचे ठिकाणीं व ब्राम्हण आला असतां, अशा सहा प्रसंगीं जीवत्पितृकासही श्राद्ध करण्याचा अधिकार आहे. जीवत्पितृकाच्या अधिकारप्रकरणीं ' येभ्य एव पिता दद्यात् ' या वचनाशीं समानार्थक " पिता जिवंत असतां श्राद्ध करणें असेल तर त्यानें तो ( पिता ) ज्याचें श्राद्ध करितो त्याचें करावें, पिता व पितामह जिवंत असल्यास तो ( पितामह ) ज्याचें श्राद्ध करतो त्याचें करावें. अशी विष्णुस्मृति सांगितली आहे.

ततश्च बह्वृचपरिशिष्टस्य सुतसंस्कारविषयत्वात् न जीवन्तमतिक्रम्येत्येतद्विषयम्। मैत्रपरिशिष्टस्य तु तदतिरिक्तविषयत्वात् येभ्य एव पिता दद्यादित्येतद्विषयमित्येवं व्यवस्था प्रतीयत इति ' वार्त्रघ्नीवृधन्वत्योः ' इव समुच्चयासंभवः। नच मैत्रपरिशिष्टस्य सुतसंस्कारविषयत्वमस्तीति शङ्क्यम्। उद्वाहशब्दस्य कर्तुर्द्वितीयविवाहपरत्वात्। ' नान्दीश्राद्धं पिता कुर्यादाद्ये पाणिग्रहे बुधः। अत ऊर्ध्वं प्रकु-

१ ञ. पुत्र्ये। २ ख. ग. च. ञ. कुर्वन्ति।

**र्वीत स्वयमेव तु नान्दिकम् ' इति वचनात् । नच पुत्रजनननिमित्तकमिति[1] संस्काराङ्गम् । तीर्थ इव तत्रापि पुरुषार्थस्यैव विधानात् । न च जीवद्वर्गत्रयाद्यस्य सुतसंस्कारेष्वपि येभ्य एव पितादद्यादित्येतत्स्वीकार आवश्यक इति शङ्क्यम् । पितरि पितामहे प्रपितामहे च जीवति नैव कुर्यादिति विष्णूक्तरीत्या लोपस्यौचित्यप्रतीतेः । एतदपवादमप्यनन्तरं वक्ष्यामः ।**

म्हणून **गृह्यपरिशिष्ट** हें सुतसंस्कार विषयक असल्यामुळें " **न जीवन्तमतिक्रम्य** " हेंही वचन सुतसंस्काराविषयींच होय. **मैत्रायणीयपरिशिष्ट** हें तर सुतसंस्कारभिन्नविषयक असल्यामुळें ' **येभ्य एव पिता दद्यात्** ' हें वचन सुतसंस्कारभिन्नविषयक होय, अशी व्यवस्था दिसून येते. या दोन वचनांची एकवाक्यता ' **वार्त्रघ्नी वृधन्वती*** ' याप्रमाणें होऊं शकत नाहीं. **मैत्रपरिशिष्टही** सुतसंस्काराविषयीं कां असूं नये अशी शंका घेणें बरोबर नाहीं. कारण [ वचनांतील ] उद्वाह शब्दानें कर्त्याचा द्वितीय विवाह असा अर्थ विवक्षित आहे. याविषयीं " प्रथम विवाहांत पित्यानें नांदीश्राद्ध करावें, त्यापुढें (द्वितीयादि विवाहांत) ज्याचें त्यानें नांदीश्राद्ध करावें " असें वचन आहे. [**मैत्रायणीयपरिशिष्टांतील ' पुत्रजनने** ' या पदाचा अर्थ] पुत्रजन्मानिमित्तक [सुत] संस्कारांग नांदीश्राद्ध असा घ्यावयाचा नाहीं कारण तीर्थाचे ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें पुत्रजन्माचे वेळींही पुरुषार्थभूत (प्रधान) नांदीश्राद्धाचें विधान केलें आहे. ज्याचे वर्गत्रयाचे आद्य ( माता, पिता व मातामह ) जिवंत आहेत त्यानें सुतसंस्कार कर्तव्य असतांही ' **येभ्य एव पिता दद्यात्** ' या वचनाचा स्वीकार करणें आवश्यक आहे अशी शंका करूं नये. ' पिता, पितामह व प्रपितामह जिवंत असतां ( पितृपार्वण ) मुळींच करूं नये, ' असें जें **विष्णुस्मृतींत** सांगितलें आहे त्या रीतीनें तिन्हीं पार्वणांचा लोप करणेंच योग्य दिसतें. याचा अपवादही आम्हीं जवळच पुढें सांगणार आहों.

**यत्तु पारिजातोक्तव्यवस्थादूषणाय स्मृतिरत्नावल्यामुक्तम् । बह्वृचपरिशिष्टस्य बह्वृचविषयत्वान्मैत्रायणीयस्य तच्छाखिविषयत्वान्न व्यवस्थान्तरं कल्प-**

---

१ ख. च. ग. मपि ।

*" **वार्त्रघ्नीपूर्णमासेऽनूच्येते, वृधन्वती अमावास्यायाम्** " (पूर्णमास यागांत '**अग्निर्वृत्राणि** ' व ' **त्वं सोमासि** ' या दोन वार्त्रघ्नी ऋचा पुरोनुवाक्या होत. आणि दर्शयागांत ' **अग्निः प्रत्नेन** " व **सोमगीर्भिष्ट्वावयम्** " या दोन वृधन्वती ऋचा पुरोनुवाक्या होत. अशी व्यवस्था **ब्राम्हणांत** सांगितली असल्यामुळें या मंत्रांचा विषय एक आहे असें ज्याप्रमाणें म्हणतां येत नाहीं. तसें येथें समजावें. पू० मी० ३।१।१३

नीयमिति, तन्न । आश्वलायनपरिशिष्टे सुतसंस्कारेष्विति श्रवणात्, परिशिष्टान्तरे च तद्भिन्नकर्मणामेव श्रवणात् कर्मभेदेन व्यवस्थायाः कल्प्यत्वात्, शब्दानां रूढशाखाभेदव्यवस्थाकल्पनस्यैवान्याय्यत्वात् । होलाधिकरणन्यायबाधितत्वाच्च ।

स्मृतिरत्नावलीग्रंथांत पारिजातग्रंथोक्तव्यवस्थेस दूषण देण्याकरितां ' गृह्यपरिशिष्ट हें ऋग्वेदी यांस उद्देशून असल्यामुळें व मैत्रायणीयपरिशिष्ट हें मैत्रायणीयशाखी यांविषयीं असल्यामुळें [ शाखाभेदाशिवाय ] दुसऱ्या ( कर्मभेद ) व्यवस्थेची कल्पना करूनये, ' असें जें सांगितलें तें बरोबर नाहीं. कारण आश्वलायनपरिशिष्टांत ' सुतसंस्कारेषु ' असें म्हटलें आहे व इतर ( मैत्रायणीय ) परिशिष्टांत सुतसंस्कारभिन्न कर्मे सांगितलीं आहेत म्हणून कर्मभेदानेंच व्यवस्था करणें योग्य आहे व शाखाभेदानें व्यवस्था करणें अयोग्य आहे. शिवाय [ शाखाभेदानें व्यवस्था मानल्यास ] *होलाधिकरणन्यायाचाही बाध येतो.

यत्तु पारिजाते ' न जीवतः पितुः कुर्याच्छ्राद्धमग्निमृते द्विजः । येभ्य एव पिता कुर्यात्तेभ्यः कुर्वीत साग्निकः । पितामहेप्येवमेव कुर्याज्जीवति साग्निकः । साग्निकोऽपि न कुर्वीत जीवति प्रपितामह ' इति सुमन्तुवचनान्मैत्रायणीयपरिशिष्टोक्तविषयेष्वपि जीवत्पितृकस्य साग्नेरेवाधिकारो न निरग्नेरिति प्रतिपादितम् । तदुद्वाहपुत्रजननिमित्तकनान्दीश्राद्धव्यतिरिक्ततीर्थश्राद्धादिविषयम् । अनग्निकोऽपि कुर्वीत जन्मादौ वृद्धिकर्मणि । येभ्य एव पिता दद्यात्तानेवोद्दिश्य पार्वणमिति आचारमदनरत्नोदाहृतहारीतवचनेन सुमन्तुवाक्यापवादात् । साग्निरत्र- श्रौताग्निमान्स्मार्ताग्निमांश्च, तदितरो निरग्निरित्यपि तत्रैवोक्तम् । अतश्च निरग्नेर्जीवत्पितृकस्य तीर्थश्राद्धादौ नाधिकार इति सिद्धम् ।

" जीवत्पितृक ब्राम्हणानें साग्निक असल्याशिवाय श्राद्ध करूं नये. साग्निक असल्यास ज्यांस उद्देशून बापानें [ श्राद्ध ] केलें असतें त्यास उद्देशून [ श्राद्ध ] करावें. पितामह जिवंत असतांही याप्रमाणेंच ( पितामहानें ज्यांस उद्देशून श्राद्ध केलें असतें त्यांस उद्देशून ) करावें. प्रपितामह जिवंत असल्यास साग्निकानेंही [ श्राद्ध ] करूं

---

* " होलाका " ( वसंतोत्सव ) इत्यादि शिष्टाचार देशविशेषांतील लोकांनींच करावे असें नाहीं, कारण या आचारास मूलभूत जी अनुमित श्रुति ती सर्व देशास साधारण असल्यामुळें हेही आचार देशविशेषाविषयीं न समजतां सर्व साधारण समजले पाहिजेत पू. मी. १ । ३ । ८.

नये, असें **सुमंतूचें** वचन असल्यामुळें **मैत्रायणीयपरिशिष्टांत** सांगितलेल्या कर्मामध्येंही साग्निक जीवत्पितृकासच अधिकार आहे, निरग्निकास नाहीं असें जें **पारिजातग्रंथांत** सांगितलें आहे, तें विवाह व पुत्रजन्मनिमित्तक जें नांदीश्राद्ध, त्याखेरीज जें तीर्थश्राद्ध इत्यादि, त्याविषयीं जाणावें. कारण ' निरग्निकानेंही पुत्रजन्मकालीं व विवाहादि मंगलकृत्यांत, पित्यानें ज्यांस उद्देशून श्राद्ध केलें असतें त्यांसच उद्देशून श्राद्ध करावें. या **आचारमदनरत्नांत** सांगितलेल्या **हारीतवचनानें** **सुमंतुवाक्याचा** बाध होतो. वरील वचनांतील साग्निक या शब्दानें श्रौताग्नि किंवा स्मार्ताग्नि ज्यास आहे असे दोघेही घ्यावयाचे. या दोहोंहून जो निराळा तो निरग्निक समजावा, असेंही तेथेंच सांगितलें आहे, म्हणून निरग्निक जीवत्पितृकास तीर्थश्राद्धाविषयीं अधिकार नाहीं, हें सिद्ध होतें.

**यत्तु तत्रैवोक्तम् । येभ्य एव पिता दद्यादित्यत्र येभ्य इति पितुः पित्रादय एव परामृश्यन्ते । न तु मात्रादयो मातामहादयश्च । न जीवन्तमतिक्रम्य किंचिद्दद्यादित्यादिशास्त्रेण तावत्पितृपार्वणमेव निषिध्यते। तत्रैव जीवतोऽतिक्रमसंभवात् । प्रमीतस्वमात्रादिकेन स्वमात्राद्युद्देशेन श्राद्धकरणे तदभावात् । प्रतिप्रसवार्थस्य च येभ्य इति शास्त्रस्य निषेधसमानविषयत्वौचित्यात् । किंच येभ्य इत्युक्तवाक्ये पितुर्मात्रादिग्रहणे तत्समानार्थे विष्णुवाक्येऽपि तदापद्येत ।**

" **येभ्य एव पिता दद्यात्** " या वचनांतील ' **येभ्यः** ' या शब्दानें फक्त पित्याची पितृत्रयीच घ्यावी, मातृत्रयी व मातमहत्रयी घेऊं नये, कारण ' **न जीवंतमतिक्रम्य किंचिद्दद्यात्** ' इत्यादि वचनानें पितृपार्वणाचाच निषेध होतो, कारण त्यांतच जिवंत असणाऱ्याचा अतिक्रम होण्याचा संभव आहे. माता इत्यादि ( आदिशब्दानें मातामह ) मृत असल्यास त्यांना उद्देशून श्राद्ध केलें असतां जीवदतिक्रमाचा ( जिवंत असलेल्यास सोडून त्याच्या पूर्वीच्याचें श्राद्ध करण्याचा ) संभव नाहीं. ' **येभ्यः** ' हें वचन प्रतिप्रसव ( निषेधाचा निषेध ) असल्यामुळें निषेधाचा व त्याचा ( प्रतिप्रसवाचा ) विषय एक असणें योग्य आहे. शिवाय ' **येभ्यः** ' या वाक्यांत जर पित्याची माता इत्यादिकांचें ग्रहण केलें तर त्या वाक्याशीं समानार्थक **विष्णुस्मृतिवचनांतही** तसेंच मानणें प्राप्त होईल.

**तच्चेत्थं पठ्यते । पितरि जीवति यः श्राद्धं कुर्यात्स येषां पिता कुर्यात्तेषां कुर्यात्पितरि पितामहे च जीवति येषां पितामहः । पितरि पितामहे प्रपितामहे**

**च जीवति नैव कुर्यात् । यस्य पिता प्रेतः स्यात्स पित्रे पिण्डं निधाय पितामहात्परं द्वाभ्यां दद्यात् । मातामहानामप्येवं श्राद्धं कुर्याद्विचक्षणः । मन्त्रोहेन यथान्यायं शेषाणां मन्त्रवर्जितमिति । अत्र प्रमीतमातृमातामहोऽपि जीवत्पितृकः पितुः पित्रादीनिव तदीयानेव मात्रादीन् मातामहादींश्चोद्दिश्य श्राद्धं कुर्यादिति चेत्प्रथमवाक्ये विवक्षितार्थः स्यात्तदा येषां पितामहः कुर्यात्तेषां कुर्यादिति सानुषङ्गे द्वितीयवाक्ये तथैव विवक्षा आपद्येत । ततश्च स्वीयानां मात्रादीनां मातामहादीनां पितुर्मात्रादीनां मातामहादीनां च प्रमीतानां परित्यागेन पितामहस्य मात्रादीन्मातामहादींश्चोद्दिश्योद्वाहपुत्रजननादौ जीवत्पितृपितामहस्य श्राद्धानुष्ठानमापद्येत ।**

तें **विष्णुस्मृति**वाक्य याप्रमाणें आहेः—' पिता जिवंत असतां तो ज्यांस उद्देशून श्राद्ध करील त्यांसच उद्देशून [ पुत्रानें श्राद्ध ] करावें. पिता व पितामह जिवंत असतां पितामह ज्याचें श्राद्ध करील त्यांस उद्देशून करावें. प्रपितामह हाही जिवंत असतां [ श्राद्ध ] करूंच नये. पिता मृत असून [पितामह जिवंत असल्यास] पित्यास उद्देशून पिंडदान करून पितामहाच्या पुढील दोन पुरुषांस पिंड द्यावा. याप्रमाणें सुज्ञ पुरुषानें मंत्राचा ऊह करून मातामहाचेंही यथाविधि श्राद्ध करावें. ' बाकीच्यांचें श्राद्ध अमंत्रक करावें, ' या **विष्णुस्मृतीमध्यें** ' ज्याचे माता व मातामह मृत असून पिता जिवंत आहे त्यानें पित्याच्या पितृपार्वणाप्रमाणें त्याचेंच ( पित्याचेंच ) मातृपार्वण व मातामहपार्वण यांस उद्देशून श्राद्ध करावें ' असा अर्थ प्रथम वाक्यांत जर विवक्षित असेल तर ज्याचा प्रथम वाक्याशीं संबंध आहे अशा **' येषां पितामहः तेषां कुर्यात् '** या द्वितीयवाक्यांतही तसाच अर्थ विवक्षित होईल, तसें झाल्यास ज्याचा पिता व पितामह जिवंत आहेत त्यानें आपलें व पित्याचें मृत जें मातृपार्वण व मातामहपार्वण याचा परित्याग करून पितामहाचें मातृपार्वण व मातामहपार्वण यांस उद्देशून, विवाह व पुत्रजन्म इत्यादिकांचे ठिकाणीं श्राद्ध करणें प्राप्त होईल.

**तथा मातामहानामप्येवमित्यतिदेशाज्जीवन्मातामहस्य स्वीयानां पैतृकाणां पैतामहानां च मात्रादिमातामहादीनां च प्रमीतानां परित्यागेन मातामहस्य मात्रादीन् मातामहादींश्चोद्दिश्य तदनुष्ठानं स्यादिति प्रथममेव वाक्यं पितुः पित्रादिपार्वणस्यैव प्रापकमिति स्वीकृत्य जीवत्पितृकस्तेन सह स्वीयानामेव मात्रादीनां मातामहानां च श्राद्धं कुर्यादिति स्वीकर्तुमुचितमिति तन्न ।**

---

१ ख. ग. च. ञ. नामतादरेण मातामहसंबंधिनां मात्रादीन्.

त्याप्रमाणें '**मातामहानामप्येवं**' असा अतिदेश केल्यामुळें ज्याचा फक्त मातामह जिवंत आहे त्यास, आपल्या स्वतःचें, आपल्या पित्याचें व आपल्या पितामहाचें, मातृपार्वण व मातामहपार्वण सोडून, मातामहाचें मातृपार्वण व मातामहपार्वण यांस उद्देशून श्राद्ध करणें प्राप्त होईल, याकरितां पहिल्या वाक्यानें ('**येभ्य एव०**' या वाक्यानें) पित्याच्या पितृपार्वणाचेंच ग्रहण करावें, असा अर्थ मानून जीवत्पितृकानें पित्याच्या पितृपार्वणासह आपलें स्वतःचें मातृपार्वण व मातामहपार्वण यांचें श्राद्ध करावें असें मानणें योग्य आहे," असें जें [ **पारिजातग्रंथांत** सांगितलें आहे ] तें बरोबर नाहीं.

**यतो येभ्य एव पिता दद्यादितीदृशार्थकानां विष्णुस्मृत्यादिवाक्यानां प्रतिप्रसवत्वं तदैव घटते। यदा न जीवन्तमतिक्रम्येत्यादीनां जीवत्पितृकं प्रति पितुः पित्राद्युद्देश्यकपार्वणनिषेधपरत्वं भवति। नचैतत्। प्रतिप्रसवत्वाभिमतवाक्यभिन्नस्य तादृशपार्वणप्रापकस्य निषेधापेक्षितस्याभावात्। तत्तच्छ्राद्धविधिषु पित्रादिशब्दानां ससम्बन्धिकत्वमहिम्ना कर्तुः पित्रादीनामेव प्रतीत्या तैस्तादृशपार्वणप्राप्तेरनाशङ्क्यत्वात्। निषेधस्य च प्रेतेभ्य एव निपृणीयादिति पितृयज्ञप्रकरणस्थाश्वलायनोक्तितुल्यप्रवृत्तिकेन 'जीवमाने न देयं स्याद्यस्माद्भरतसत्तम। तस्माज्जीवत्पिताकुर्यात् द्वाभ्यामेव न संशयः' इति भविष्यपुराणवचनेन प्राप्तस्य मृतपुंद्वयमात्रोद्देश्यकप्रदानस्य निषेधकतयोपपत्तेः।**

कारण जर '**न जीवन्तमतिक्रम्य**' इत्यादि वाक्यें जीवत्पितृकाच्या बापाच्या पित्रादिपार्वणाचीं निषेधक होतील तरच '**येभ्य एव०**' या वचनाशीं समानार्थक **विष्णुस्मृत्यादि** ग्रंथांतील वाक्यांना प्रतिप्रसवत्व येईल. परंतु तेंच ( निषेधपरत्व ) होऊं शकत नाहीं. कारण प्रतिप्रसव म्हणून मानलेल्या वाक्याशिवाय जीवत्पितृकाच्या पित्याचें पार्वणप्रापक असें दुसरें [ विधि ] वाक्य नाहीं, [ आणि त्याची तर ] निषेध वाक्यास आवश्यकता आहे. निरनिराळ्या श्राद्धविधायक वचनांतील, संबंधबोधक पित्रादि शब्दांनीं कर्त्याच्याच पित्रादिकांचा बोध होत असल्यामुळें त्या शब्दांनीं त्याप्रकारच्या पार्वणप्राप्तीची ( पित्याच्या पित्रादिपार्वणाची ) मुळींच आशंका होत नाहीं. पितृयज्ञप्रकरणांतील ' मृतांसच उद्देशून दान करावें ' अशा **आश्वलायन**वचनांशीं समानार्थक " हे भरतश्रेष्ठा, जिवंत असणाऱ्यास दान करूं नये असें आहे, म्हणून जीवत्पितृकानें दोघांसच ( पितामह व प्रपितामह यांसच ) उद्देशून [ श्राद्ध ] करावें " या **भविष्य**-

पुराणांतील वचनानें दोन मृत पुरुषांस ( पितामह व प्रपितामह यांस ) उद्देशून जें श्राद्धदान सांगितलें त्याचा निषेध करण्याकरितां [ हें ' **न जीवन्तं०** ' इत्यादि निषेध-वाक्य आहे ] अशी उपपत्ति होऊं शकते.

**शक्यते च हारीतवचनस्यानग्निकं प्रति मात्रादिपार्वणविषयेऽपि प्रतिप्रसवत्वं वक्तुमनायासेन । तस्यापि वृद्धितीर्थादौ मैत्रायणीयप्राप्तस्य सुमन्तुवचनेन निषिद्धत्वात् । यत्तु जीवत्पितृपितामहेन पितामहमात्राद्युदेशेन श्राद्धं स्यादित्युक्तम्, तन्नानिष्टम् । पितुर्मात्राद्युद्देशेनेव तदुद्देशेनापि प्रमाणसिद्धस्य तदनुष्ठानस्य स्वीकर्तुमुचितत्वात् ।**

**हारीतवचन (अनग्निकोऽपि कुर्वीत०)** हें, अनग्निकानें मात्रादिपार्वणही घेण्याविषयीं प्रतिप्रसवरूपी अनायासें होऊं शकतें. कारण ' वृद्धिश्राद्ध व तीर्थश्राद्ध इत्यादि प्रसंगीं **मैत्रायणीयपरिशिष्टानें (येभ्य एव पिता०** यानें ) प्राप्त जें [पित्याच्या पार्वणत्रयाचें श्राद्ध ] त्याचा **सुमंतुवचनानें ( न जीवतः पितुः०** यानें ) निषेध केला आहे. [ आतां पूर्वपक्षकारानें ] ' ज्याचा पिता व पितामह जिवंत असेल त्यास पितामहाच्या मातृत्रयीस उद्देशून श्राद्ध करावें लागेल, ' असें जें दूषण दिलें आहे, तें अनिष्ट नाहीं, कारण बापाच्या मातृत्रयीप्रमाणें पितामहाच्या मातृत्रयीस उद्देशून श्राद्धानुष्ठान करणें हेंही प्रमाणसिद्ध असल्यामुळें त्याचा स्वीकार करणें योग्य आहे.

**यत्तु मातामहानामप्येवमित्यातिदेशमूलकमनिष्टापादनं तत्तदर्थाज्ञानविजृम्भितम् । अत्र हि मातामहानां श्राद्धं पितृपार्वणवत्कर्तव्यमुचितमन्त्रोहयुक्तमित्यतिदिश्यते । इत्थमतिदेशेन च यथा विसर्जनान्तान्यङ्गान्यतिदिश्यन्ते तथा व्यवहितपूर्वग्रन्थोक्तक्रमेणैकद्व्यादिजीवनानिमित्ताद्व्युत्क्रममरणनिमित्ताच्च पितृपार्वणगता देवताव्यवस्थापि । अङ्गत्वाविशेषात् । नचैवं मात्रादिश्राद्धं पितृपार्वणाङ्गम् । येनातिदिश्येत ।**

' **मातामहानामप्येवं** ' असा अतिदेश केल्यामुळें जी अनिष्टापत्ति दाखविली ( मातामहाचें मातृपार्वण व मातामहपार्वण यांस उद्देशून श्राद्ध करणें प्राप्त होईल इत्यादि ) ती त्या वचनाचा अर्थ न समजल्यामुळें होय. कारण या वचनानें, मातामहाचें श्राद्ध मंत्रांचा योग्य रीतीनें ऊह करून पितृपार्वणाप्रमाणें करावें, असा अति-

---

१ छ. तदे ।

देश सांगितला आहे. असा अतिदेश केल्यामुळें ज्याप्रमाणें [ पिंड ] विसर्जनान्त अंगांचा अतिदेश होतो त्याप्रमाणें, [ त्रयींपैकीं ] एक दोन जिवंत असतां किंवा उलट ( पितामह जिवंत असून पिता मृत होणें अशा ) क्रमानें मृत झाला असतां, जवळच्या पूर्वींच्या ग्रंथांत ( **यस्य पिता प्रेतः स्यात्** इ० ) सांगितल्याप्रमाणें पितृपार्वणांतील देवतेच्या व्यवस्थेचाही अतिदेश होतो, कारण देवताव्यवस्थाही अंगभूतच आहे. याप्रमाणें मात्रादिश्राद्ध हें पितृपार्वणाचें अंग नाहीं म्हणून त्याचा अतिदेश होत नाहीं [ तसें असतें तर त्याचा अतिदेश झाला असता. ]

**नच विष्णुस्मृतिव्याख्यातारोऽपि मातामहानामप्येवमिति वचस इतरेतिकर्तव्यतातिदेशपरतामिवोक्तविधदेवताव्यवस्थातिदेशपरतां मन्यमाना अपि मात्रादिपार्वणातिदेशपरतां मन्यन्ते । मन्यन्ते च स येषां पिता कुर्याद्येषां पितामह इत्यनयोर्मात्रादिमातामहादिपार्वणगोचरतामपि । युक्तं चैतत् । येषामिति यच्छब्देन पितृकर्तृकश्राद्धोद्देश्यतायाः पुत्रकर्तृकश्राद्धोद्देश्यत्वव्याप्यत्वप्रतीतेः । यद्यत्कृतकं तदनित्यमितिवत् ॥**

**विष्णुस्मृतीची** व्याख्या करणारेही '**मातामहानामप्येवं**' या वचनानें [ पितृश्राद्धांतील ] इतिकर्तव्यतेचा जसा अतिदेश होतो त्याप्रमाणें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें देवताव्यवस्थेचाही अतिदेश होतो असें मानतात, तरीही [ मातामहाच्या ] मात्रादिपार्वणाचा अतिदेश होतो असें मानीत नाहींत, व '**स येषां पिता कुर्यात्**' '**येषां पितामहः**' हीं दोन वाक्यें मातृपार्वण व मातामहपार्वण घेण्यास साधक आहेत असें मानितात. हें [ त्यांचें मानणें ] योग्य आहे. कारण '**येषां पिता कुर्यात्**' यांतील '**यत्**' या शब्दानें पित्यानें करावयाच्या श्राद्धांतील देवतांस पुत्रानें करावयाच्या श्राद्धांतील ज्या देवता तन्निरूपितव्याप्यत्व '***यत्कृतकं तदनित्यं**' याप्रमाणें बोधित होतें.

**येभ्य एव पिता दद्यादिति यच्छब्दोपबद्धैवकारेण वीप्साप्रतीतेश्च । 'यमेव धार्तराष्ट्रान्तु भीमसेनोऽभ्यवेक्षते । क्षणमात्रेण तं हन्ति व्याघ्रो मृगगणं यथा' इतिवत् । अतो येभ्य एव पिता दद्यादीदृशशास्त्रानुसारिण्यनुष्ठाने पितृकर्तृकश्राद्धोद्देश्यपि-**

---

* "**यत्कृतकं तदनित्यम्**" ( जें कार्य तें अनित्य ) जसें घट पट वगैरे. या अनुमानांत कृतकत्व व्याप्य ( व्यापक जेथें आहे तेथें नियमानें असणारें ) असून अनित्यत्व व्यापक आहे.

**तृमातृमातामहाद्युद्देश्यकश्राद्धत्रयस्य कर्तव्यत्वान्न पुत्रेणात्मीयमात्राद्युद्देशेन श्राद्धसंभवः।**

'**येभ्य एव पिता०**' या वचनांतील '**यत्**' शब्दाशीं जोडलेल्या '**एव**'–कारानें, " ज्या ज्या धृतराष्ट्र पुत्रास भीमसेनानें पाहिलें त्यास क्षणमात्रांत, मृगसमुदायास जसा वाघ मारितो, त्याप्रमाणें त्यानें मारिलें. " या वचनांतील '**यमेव**' यांतील एवकाराप्रमाणें, वीप्सेचा बोध होतो. म्हणून '**येभ्य एव पिता०**' या वचनास अनुसरून कर्मानुष्ठान कर्तव्य असतां पित्यानें करावयाचे श्राद्धांतील उद्देश्य जे पिता, माता, व मातामहादिक त्यांस उद्देशून तीन श्राद्धें कर्तव्य असल्यामुळें, पुत्रानें स्वतःच्या मात्रादिकांस उद्देशून श्राद्ध करणें संभवत नाहीं.

**नचाश्वलायनपरिशिष्टानुसारिण्यनुष्ठाने पितुः पित्राद्युद्देशेन तत्संभव इति प्रागेवावेदितम्। अतस्तदुभयार्थसमुच्चयोक्तिः साहसमात्रम्।**

**आश्वलायनपरिशिष्ट**प्रमाणें अनुष्ठान कर्तव्य असतां पित्याच्या पित्रादिकांच्या उद्देशानें श्राद्ध करण्याचा संभव नाहीं असें पूर्वींच सांगितलें आहे. म्हणून या दोन्हीं **परिशिष्ट**वचनांच्या अर्थाचा समुच्चय करणें साहस होय.

**सत्यपि विष्णुस्मृतेः सुतसंस्कारसाधारण्ये आश्वलायनशाखिभिस्तत्परिशिष्टोक्त एव पक्षः संभवे कर्तुमुचितः। बह्वल्पं वा स्वगृह्योक्तमिति स्मृतेः। कुलपरम्परया तत्वेन यदि तच्छाखिनोऽपि विष्णुस्मृत्युक्तमाचरन्ति आचरन्तु, न तूक्तसमुच्चयः परम्परायातोऽस्ति।**

**विष्णुस्मृति** सुतसंस्काराविषयीं जरी मानितां आली तथापि आश्वलायनशाखीयांनीं संभवेल तर आपल्या **परिशिष्टांत** सांगितलेल्या पक्षाचा स्वीकार करणें योग्य आहे. कारण '**बव्हल्पं वा स्वगृह्योक्तं०**' ( आपल्या गृह्यसूत्रांत थोडें किंवा फार जितकें कर्म सांगितलें आहे तितकें केलें असतां सर्व कर्म केल्याचें श्रेय मिळतें. ) अशी **स्मृति** आहे. **विष्णुस्मृतींत** सांगितलेला आचार, कुलपरंपरेनें आला असल्यामुळें आश्वलायनशाखेचेही लोक जर त्याचें (विष्णुस्मृतींत सांगितलेल्या आचाराचें) आचरण करीत असतील तर करोत, परंतु [ नुकताच ] सांगितलेला समुच्चय मात्र कुलपरंपरागत नाहीं.

**एवंच जीवत्पितृमातामहेन यदा मातृपार्वणमात्रेण नान्दीश्राद्धसिद्धिरङ्गीक्रियते,**

१ छ. णेननां।

न तत्र देवा अपि। श्राद्धहेमाद्रिसमुदाहृतेन 'नित्यश्राद्धमदैवं स्यादेकोद्दिष्टं तथैव च। मातृश्राद्धं तु युग्मैः स्याददैवं प्राङ्मुखैः पृथक्' इति वचनेन पूर्वाण्हादिकालभेदेन पार्वणत्रयानुष्ठानपक्षे पावर्णान्तरासाहित्येन क्रियमाणे मातृश्राद्ध इवोक्तविधमातृश्राद्धेऽपि तादृशे अदैवत्वबोधनात्। नान्दीश्राद्धमात्रेऽपि[१] च विश्वेदेवाः कृताकृताः। विश्वेदेवविहीनं तु केचिदिच्छन्ति मानवाः। युग्माश्चात्र द्विजाः कार्यास्ते पूज्याश्च प्रदक्षिणमिति तत्रैव मार्कण्डेयवचनादित्यलम्।

याप्रमाणें ज्याचा बाप व मातामह जिवंत आहेत त्यानें फक्त मातृपार्वण केल्यानें जेव्हां नांदीश्राद्धाची सिद्धि होते तेव्हां विश्वेदेवही नाहींत. " नित्यश्राद्ध व एकोद्दिष्टश्राद्ध यांत देव नाहींत. त्याचप्रमाणें [ कालभेदानें ] वेगळ्या करावयाच्या मातृश्राद्धांतही देव नसून [ त्यांत ] समसंख्याक व पूर्वाभिमुख [ ब्राम्हण असतात "] या **श्राद्धहेमाद्रींत** सांगितलेल्या वचनानें, पूर्वाण्हादि निरनिराळ्या कालीं तिन्हीं पार्वणांस उद्देशून जेव्हां नांदीश्राद्ध करितात, त्यावेळीं इतरपार्वणांविरहित केलें जाणाऱ्या मातृश्राद्धाप्रमाणें, याही तशाच प्रकारच्या मातृश्राद्धांत देव नाहींत असें बोधित होतें. सर्व प्रकारच्या नांदीश्राद्धांतही विश्वेदेव वैकल्पिक आहेत. कारण " कित्येक [ नांदीश्राद्ध ] देवरहित करावें असें ह्मणतात. यांत समसंख्याक ब्राम्हण असून त्यांची प्रदक्षिण पूजा करावी, " असें **श्राद्धहेमाद्रीमध्येंच मार्कंडेयवचन** आहे. असो, विस्तार पुरे.

अथ सुतसंस्कारे प्रवासादिना पितृकर्तृकत्वासंभवनिमित्तककर्त्रन्तरं प्रति नान्दीश्राद्धदेवतानिर्णयः। पारिजाते कात्यायनः। स्वपितृभ्यः पिता दद्यात्सुतसंस्कारकर्मसु। पिण्डानोद्वाहनात्तेषां तस्याभावे तु तत्क्रमादिति। ओद्वाहनात् प्रथमविवाहमभिव्याप्य। सुतसंस्कारकर्मसु पिता स्वपितृभ्यः पिंडान् दद्यात्, तदुपलक्षितं वृद्धिश्राद्धं कुर्यात्। तस्य पितुः प्रवासादिनाऽभावे तेष्वेव कर्मसु तन्निमित्तः पित्रसन्निधिनिमित्तो योऽधिकारिक्रमः 'असंस्कृतास्तु संस्कार्या भ्रातृभिः पूर्वसंस्कृतैः' इति शास्त्रावगतः, तेन क्रमेण तेषां पूर्वसंस्कृतानां मध्ये ज्येष्ठभ्रात्रादिः कुर्वन् स्वपितृभ्यो दद्यात्। समावर्तनस्यापि विवाहात्प्राचीनसुतसंस्कारत्वाज्जीवत्पितृकसमावर्तने पिता स्वपितृभ्यो दद्यात्। अजीवत्पितृकस्तु पूर्वसंस्कृतभ्रात्रसंभवे स्वयमेव स्वपितृभ्यो दद्यात्। उपनयनेन कर्माधिकारसत्वाद्विवाहेऽप्येवमेव द्रष्टव्यमिति पारिजाते व्याख्यातम्।

---

१ छ. पिवि.

आतां पुत्रसंस्कार करतेवेळीं **प्रवासादिकांमुळें पिता जवळ नसल्या कारणानें इतरानें ते संस्कार करणें झाल्यास नांदीश्राद्धांत कोणत्या देवता घ्यावयाच्या त्यांचा निर्णय** सांगतों. **पारिजात** ग्रंथांत **कात्यायनः**—प्रथम विवाहान्त पुत्रसंस्कार-कृत्यांत पित्यानें आपल्या पितरांस उद्देशून पिंडदान करावें. बाप नसल्यास अधिकारक्रमानें वडील भाऊ इत्यादिकानें करावें " " **ओद्वाहनात्** " म्ह० प्रथम विवाह अखेर. पुत्रसंस्कारकर्मामध्यें पित्यानें आपल्या पितरांस उद्देशून पिंडदान करावें, म्ह० नांदीश्राद्ध करावें. प्रवासादिकांमुळें तो पिता जवळ नसल्यास त्या त्या कर्मांत, तशा प्रसंगी "पूर्वी ज्यांचा संस्कार केला आहे अशा भावांनीं आपल्या असंस्कृत भावांचे संस्कार करावे " या वचनानें बोधित कर्माधिकारक्रमानें, पूर्वी ज्यांचा संस्कार झाला आहे अशांपैकीं ज्येष्ठभ्राता इत्यादिकांस, [ श्राद्ध ] करणें झाल्यास त्यानें आपल्या पितरांचें करावें. समावर्तन (सोडमुंज) हें विवाहाच्या पूर्वीचें पुत्रसंस्कार कर्म असल्यामुळें, ज्याचा पिता जिवंत आहे त्याचें समावर्तन करितेवेळीं [ त्याच्या ] पित्यानें आपल्या पितरांस उद्दे-शून द्यावें. [ ज्याचें समावर्तन करावयाचें त्याचे ] पूर्वी संस्कार केलेले भाऊ नसून पिताही जिवंत नसेल तर त्यानें स्वतःच आपल्या पितरांस उद्देशून श्राद्ध करावें. कारण [ त्याचें ] उपनयन झालें असल्यामुळें त्यास कर्माचा अधिकार आहे. याच प्रमाणें विवाहांतही जाणावें. " असें **पारिजात**ग्रंथांत [ या वचनाचें ] व्याख्यान केलें आहे.

**अत्र च पितुर्जीवत्पितृकस्याजीवत्पितृकस्य च ज्येष्ठभ्रात्रादेश्च तथा द्विविधस्य शास्त्रान्तरे श्राद्धीयदेवतात्वेन येऽवगताः पित्रादयो मात्रादयो मातामहादयश्च ते-षामेव स्वपितृभ्य इति निर्देशः। स्वेज्यत्वस्य षष्ठ्यर्थत्वात्। जीवत्पितृकेण स्वज-नकाद्युद्देश्यकश्राद्धानुष्ठानस्य बाधितत्वात्। अतएव समावर्तनस्य माणवककर्तृक-त्वेऽपि तदङ्गभूतनान्दीश्राद्धे पितुस्तदभावे ज्येष्ठभ्रात्रादेरप्राप्तकर्तृत्वप्रापणादिना वचनस्यार्थवत्वमित्याशयेन तदुपन्यास इति बोध्यम्। अजीवत्पितृक इति च जी-वदसन्निहितपितृकस्याप्युपलक्षणम्। स्वपितृभ्य इति च पूर्ववत्। आद्यस्येज्या जनकादय एव। परस्य पितुर्जनकादय एव। नत्वाश्वलायनपरिशिष्टोक्तरीत्या पि-तृपार्वणत्यागेन मात्रादयः। समावर्तनस्यात्मसंस्कारत्वेन सुतसंस्कारत्वाभावात्।**

या वचनांतील '**स्वपितृभ्यः**' या शब्दानें, ज्याचा पिता जिवंत आहे किंवा मृत आहे असा पिता व त्याचप्रमाणें अशाच दोन प्रकारचा जो जेष्ठ भ्राता इत्यादि-

कांचे वचनांतरानें श्राद्धीयदेवतारूपानें सांगितलेले जे पित्रादिक, मात्रादिक व मातामहादिक यांचा निर्देश केला आहे. कारण येथें षष्ठीचा अर्थ स्वेज्यत्व आहे, आणि जीवत्पितृकानें स्वतःचा पिता इत्यादिकांस उद्देशून श्राद्ध करणें निषिद्ध आहे. म्हणूनच समावर्तन हें जरी बटूनेंच करावयाचें आहे तरी तदंगभूत नांदीश्राद्धाविषयीं पित्यास व तो नसल्यास ज्येष्ठभ्राता इत्यादिकांस [ वचनान्तरानें ] अप्राप्त असें कर्तृत्व प्राप्त करून देणें इत्यादिकांमुळें वचनास सार्थकता येते, या आशयानें [ पारिजातग्रंथांत ] त्याचें कथन केलें आहे, असें जाणावें. '**अजीवत्पितृक**' या शब्दानें 'पिता जिवंत असून जवळ नसेल तर' असाही अर्थ लक्षित होतो. '**स्वपितृभ्यः**' याचा अर्थ पूर्वीप्रमाणेंच समजावा. पहिल्या अर्थी (पिता जिवंत नसल्यास) पित्रादिकच इज्य (श्राद्ध करण्यास योग्य देवता) होत. दुसऱ्या अर्थी (पिता प्रवासादिकांमुळें जवळ नसल्यास) पित्याचे जे पित्रादिक ते इज्य होत. **आश्वलायनपरिशिष्टांत** सांगितल्याप्रमाणें पितृपार्वणाचा परित्याग करून मात्रादिक घ्यावयाचे नाहींत, कारण समावर्तनास आत्मसंस्कारत्व असल्यामुळें सुतसंस्कारत्व नाहीं.

**हेमाद्रिणात्वक्षरारूढमप्राप्तविधिं दर्शयितुं व्याख्यान्तरमकारि । पित्रभावे अन्यो यः कश्चित् संस्कारं कुर्यात् स तं कुमारपितरमारभ्य संस्कार्यस्य पितॄणां यः क्रमः तेन क्रमेण दद्यात् । न तु स्वीयेभ्यः पितृभ्यः । तस्मात् पितृव्याचार्यमातुलादयः संस्कार्यस्योपनेयादेरेव पितृभ्यः श्राद्धं दद्युः, न स्वपितृभ्यः इत्यत्र पारमार्थिकः पक्षो विधीयते । अन्यथा स्वपितृभ्य इत्यस्यानुषङ्गकल्पनाया अन्याय्यत्वात् पितृव्यादीनामपि पितृवत्स्वपितृभ्यो दानाविशेषे स्वपितृभ्यः पिता दद्यादित्यस्यानर्थक्यापत्तेः । पितुः पितृव्यादिषु वैलक्षण्यद्योतक तुशब्दानुपपत्तेः । उपनेयस्य प्रदेयकन्यायाश्च मुख्याधिकारित्वेन तदीयपित्रादीनामिज्यत्वौचित्याच्च ।**

**हेमाद्रीनें** तर वचनांतील शब्दांसच अनुसरून अप्राप्तविधित्व दाखविण्याकरितां निराळी व्याख्या केली आहे. ती अशीः—"पिता नसल्यास जो कोणी दुसरा संस्कार करील त्यानें '**तत्क्रमात्**' म्हणजे ज्याचा संस्कार कर्तव्य आहे त्या कुमाराच्या बापापासून आरंभ करून जो पितरांचा क्रम त्या क्रमानें दान करावें, स्वतःच्या पितरांस दान करूं नये. म्हणून चुलता, आचार्य, व मामा इत्यादिकांनीं ज्याचा उपनयनादि संस्कार कर्तव्य आहे त्याच्याच पितरांस उद्देशून श्राद्ध द्यावें, स्वतःच्या पितरांस देऊं नये,

असा अपूर्वविधि मानिला पाहिजे. असा अर्थ न मानिल्यास ‘ तत्क्रमात् ’ इत्यादि वाक्यामध्यें ‘ **स्वपितृभ्यः** ’ या शब्दाचा संबंध निरर्थक होईल, पित्याप्रमाणें पितृव्यादिकांनींही स्वतःच्या पित्रांदिकांस उद्देशून दान केलें असतां दानांत कांहीं विशेष [ फरक ] होत नसल्यामुळें ‘ **स्वपितृभ्यः पिता दद्यात्** ’ या वाक्यास निरर्थकत्व येईल, तसेंच पिता व पितृव्यादिक यांच्यामध्यें वैलक्षण्य दाखविणारा जो ‘ **तु** ’ शब्द आहे त्याचा अर्थ बरोबर लागणार नाहीं. ज्याचें उपनयन कर्तव्य आहे असा मुलगा व जीचें दान कर्तव्य आहे अशी कन्या, हेच मुख्य अधिकारी असल्यामुळें त्यांच्या पितरांनांच दान करणें योग्य आहे.

**महार्णवोदाहृते ‘गर्भाष्टमे वर्षे ब्राह्मण आत्मानमुपनाययेत्’ इत्यादिबुधस्मृत्यादिवाक्ये णिजन्तमुपनायनशब्दं व्याचक्षाणैरपरार्कादिभिरुपपादितं चोपनेयकन्ययोरेव उपनयनादौ मुख्याधिकारित्वमिति । अयमेव प्रकारः पितृव्यकर्तृकविवाहे बोध्यः । नच तत्र मानाभावः । पित्रभावे नामकरणे कर्त्रन्तरप्रापकशङ्खस्मृतौ ‘ अन्यो वा कुलवृद्ध ’ इत्यस्य नामकरणप्रभृतिसंस्कारविषयताया हेमाद्रिणैवोक्तत्वादिति ।**

“ गर्भापासून आठव्या वर्षीं ब्राम्हणानें आपलें उपनयन करवावें ” इत्यादि **महार्णवांत** सांगितलेल्या **बुधस्मृत्यादि**वाक्यांतील णिजंत उपनयन शब्दाची व्याख्या करणारे जे **अपरार्क** इत्यादि त्यांनीं, ज्याचें उपनयन करावयाचें तो व जिचें दान करावयाचें ती कन्या, यानांच उपनयनादिकांत मुख्य अधिकार आहे; असें प्रतिपादन केलें आहे. ” पितृव्यानें विवाह ( कन्यादान ) कर्तव्य असतां हीच व्यवस्था समजावी. पितृव्यादिकांनीं कन्यादान करण्याविषयीं प्रमाण नाहीं असें समजूं नये, कारण नामकरण संस्कारांत पिता नसल्यास इतरानें तें करावें याविषयींचें **शंखस्मृतींतील** ‘ दुसरा कोणी कुलांतील वृद्ध ’ हें वाक्य, केवळ नामकरणाविषयींच नसून नामकरण इत्यादि संस्कारांविषयीं आहे, याप्रमाणें **हेमाद्रीनेंच** सांगितलें आहे.

**अत्रापि पित्रभावो द्वेधा। मरणेन प्रवासादिना वा। पितरमारभ्येत्यपि इज्यत्वेन इज्योपलक्षणत्वेन वा। संस्कार्यस्येति षष्ठी क्रमनिरूपितसंबन्धार्थी । संस्कार्यं प्रति समावर्तनादौ इज्यदेवताक्रमो यो विहित इत्यर्थः। अतएवेज्यत्वमुपनेयादे-**

१ ब. छ. १ नये.

**रिति षष्ठ्यर्थः । ततश्चाजीवत्पितृकस्योपनयनं कुर्वन् मातुलादिस्तदीयजनकादीनुद्दिश्यैव कुर्याज्जीवत्पितृकस्य तु जनकस्य जनकादीन्। न तु परिशिष्टानुसारेण केवलान् प्रमीतानपि संस्कार्यमात्रादीन्। संस्कार्यं प्रति स्वसंस्कारे समावर्तनादौ कर्तव्ये तासामुक्तरीत्येज्यत्वाप्राप्तेः । अत उपनयने समावर्तन इव संस्कार्यस्यैव यद्यधिकारः स्यात्तदासंस्कार्यस्य नान्दीश्राद्धदेवताया औचित्याय तास्ता एवोद्दिश्य मातुलादिर्नान्दीश्राद्धं कुर्यादिति तात्पर्यार्थः । इति पित्रन्यकर्तृकनान्दीश्राद्धदेवतानिर्णयः ।**

येथेंही पित्याचा अभाव दोन प्रकारचा समजावयाचा. एक मरणामुळें व दुसरा प्रवास इत्यादिकांमुळें [ **कुमार** ] ‘ **पितरमारभ्य** ’ या वाक्यांतही [ पितृशब्दानें ] इज्य (मरणामुळें अभाव असल्यास मुख्य) व इज्योपलक्षित ( प्रवासादिकांमुळें अभाव असल्यास पितामह इत्यादि गौण ) असा दोन्हीं प्रकारचा पिता घ्यावयाचा. ‘ **संस्कार्यस्य** ’ ही षष्ठी क्रमामुळें असणारा जो संबंध त्याची बोधक आहे. म्हणून संस्कार्यास सोडमुंज इत्यादि संस्कारांत जो इज्यदेवतेचा क्रम सांगितला असेल त्या क्रमानें असा अर्थ होतो. म्हणूनच ‘ **उपनेयादेः** ’ या षष्ठीचा अर्थ ‘ **इज्यत्व** ’ असा होय. या करितां ज्याचा पिता जिवंत नाहीं त्याचें उपनयन करितानां मातुल इत्यादिकांनीं त्याच्याच ( बटूच्याच ) पित्रादिकांस उद्देशून श्राद्ध करावें. पिता जिवंत असल्यास [ संस्कार्यबटूच्या ] बापाचे पित्रादिक घ्यावे. **गृह्यपरिशिष्टा**च्या अनुरोधानें, संस्कार्याचे मात्रादिक जरी मृत असतील तरी त्यांस [ उद्देशून श्राद्ध ] करूं नये. कारण जर संस्कार्याचा समावर्तनादिक स्वसंस्कार कर्तव्य असता तर वर सांगितलेल्या रीतीनें त्यांस ( संस्कार्याच्या मृत मात्रादिकांस ) इज्यत्व आलें नसतें. म्हणून समावर्तनाप्रमाणें उपनयनांतही संस्कार्यासच जेव्हां अधिकार आहे तेव्हां संस्कार्याच्या नांदीश्राद्धांत ज्या देवता उचित असतील त्यांसच उद्देशून मातुलादिकांनीं नांदीश्राद्ध करावें. असें तात्पर्य जाणावें. याप्रमाणें **पित्याहून अन्य कर्ता असल्यास नान्दीश्राद्धांतील देवतांचा निर्णय** समाप्त झाला.

**श्रौतस्मार्ताधानातिरिक्तविषयं च नान्दीश्राद्धं पूर्वाण्हे कार्यम् । पार्वणं चापराण्हे तु प्रातर्वृद्धिनिमित्तकमिति शातातपोक्तेः। पूर्वाण्हे वै भवेद्वृद्धिरित्यात्रिवचनाच्च। आधानाङ्गं त्वपराण्हे।आमश्राद्धं तु पूर्वाण्हे सिद्धान्नेन तु मध्यतः। पार्वणं चापराण्हे स्याद्वृद्धिश्राद्धं तथाग्निकमिति गालववचनात् ।इदं चाधानपूर्वदिने**

बौधायनोक्तनान्दीश्राद्धविषयम् । आपस्तम्बसूत्रानुसारिणं तु यत्संभारस्पर्शोत्तरं भाष्यकारादिभिरुक्तं तत्पूर्वोत्तरपदार्थैर्निबद्धक्रमत्वान्न पृथक्कालमपेक्षत इति न तद्विषयम् । पुत्रजन्मनिमित्तकश्राद्धेऽपि न प्रातःकालनियमः। 'नियतेषु निमित्तेषु प्रातर्वृद्धिनिमित्तकम् । तेषामनियतत्वे तु तदानन्तर्यमिष्यत ' इति लौगाक्षिवचनात् ।

श्रौत व स्मार्त आधानांखेरीज इतर कर्मांचे ठिकाणीं करावयाचें जें नांदीश्राद्ध तें पूर्वाण्हीं करावें. कारण शातातपानें " पार्वणश्राद्ध अपराण्हकालीं व नांदीश्राद्ध प्रातःकालीं [करावें]" असें सांगितलें आहे. [त्याप्रमाणें] ' पूर्वाण्हीं नांदीश्राद्ध करावें ' असें अत्रीचेंही वचन आहे. आधानांगभूत [ नांदीश्राद्ध ] अपराण्हकालीं करावें. कारण आमान्नानें पूर्वाण्हकालीं श्राद्ध करावें, सिद्धान्नानें मध्यान्हकालीं करावें. पार्वणश्राद्ध व आधानाच्या अंगभूत नांदीश्राद्ध हीं अपराण्हकालीं करावीं, असें गालववचन आहे. बौधायनोक्त आधानाचे पूर्वदिवशीं करावयाचें जें नांदीश्राद्ध त्याविषयीं वरील शास्त्रार्थ समजावा. आपस्तंबसूत्रांस अनुसरून आधान करणारास भाष्याकारादिकांनीं जें संभारस्पर्शानंतर नांदीश्राद्ध करण्यास सांगितलें आहे त्या नांदीश्राद्धास वरील शास्त्रार्थ लागू नाहीं. कारण, त्या [ नांदीश्राद्धाच्या ] पूर्वींच्या व नंतरच्या कर्मांनीं [ त्याचा काल निश्चित झाल्यानें ] पूर्वीं सांगितलेला काल बाधित होतो. म्हणून त्या श्राद्धास निराळ्या कालाची अपेक्षा रहात नाहीं. पुत्रजन्मनिमित्तक श्राद्धाविषयींही प्रातःकालाचा नियम लागू नाहीं. कारण " ज्यांचा काल नियमित आहे अशा कर्मांत प्रातःकालीं नांदीश्राद्ध करावें. ज्या कर्मांचा काल नियमित नाहीं अशा कर्मांत त्याचें कारण ज्यावेळीं उत्पन्न होईल त्यावेळींच नांदीश्राद्ध करावें, असें लौगाक्षीचें वचन आहे.

अत्र पिण्डदानं कुलधर्मानुसारेण वैकल्पिकम्। पिण्डनिर्वपणं कुर्यान्न वा कुर्यान्नराधिप। वृद्धिश्राद्धे महाबाहो कुलधर्मानवेक्ष्य त्विति भविष्योक्तेः। पिण्डदाने विशेषः । शाल्यन्नं दधिमध्वक्तं बदराणि यवांस्तथेति प्रकृत्य, स्मृत्यन्तरे उक्तः । द्राक्षामलकमूलानि यवांश्च विनियोजयेत् । तान्येव दक्षिणार्थे तु दद्याद्विप्रेषु सर्वदेति । ब्राह्मणभोजनसमये जपविशेषो ब्रह्मपुराणे । पठेच्छकुनिसूक्तं तु स्वस्तिसूक्तं शुभं तथेति । संग्रहे । शुभाय प्रथमान्तेन वृद्धौ संकल्पमाचरेदिति । कारि-

१ ख. च. छ. निषिद्ध.

**कायाम्। सम्बन्धनामगोत्राणि वर्जयेदत्र कर्मणीति। चन्द्रोदये ' मालत्याः शतपत्र्या वा मल्लिकाकुरयोरपि। केतक्याः पाटलाया वा देया माला न लोहिता ' इति। सुवेषभूषणैस्तत्र सालंकारैस्तथा नरैः। कुङ्कुमाद्यनुलिप्ताङ्गैर्भाव्यं तु ब्राह्मणैः सहेति च।**

नांदीश्राद्धांत पिंडदान करणें तें कुलाचाराप्रमाणें वैकल्पिक आहे. " हे राजा ! नांदीश्राद्धांत पिंडदान करणें तें कुलाचार पाहून, करावें किंवा न करावें " असें **भविष्य पुराणां**तील वचन आहे. पिंडदानाविषयीं विशेष; **स्मृत्यंतरांत** सांगितला आहे. "भात, मधुयुक्त दहीं, बोरें, यव, मनुका, आंवळे, मूल, यांचे [ पिंड ] असावेत व ब्राह्मणांस दक्षिणा देणें ती याच द्रव्यांची द्यावी " ब्राह्मणभोजनाचे वेळीं **ब्रह्मपुराणांत** जप सांगितला आहे तो:—' **शकुनिसूक्त,** व शुभकारक स्वस्तिसूक्त यांचा जप करावा " " शुभकार्यांचे वेळीं नांदीश्राद्धांत [ मात्रादिपितरांचा उच्चार ] प्रथमाविभक्ती लावून करावा " असें **संग्रहग्रंथांत** सांगितलें आहे " नांदीश्राद्धांत संबंध, नांव, गोत्र, हीं वर्ज्य करावीं " [असें **कारिकेंत** सांगितलें आहे]. **चंद्रोदयांत**:—' मालती, शतपत्री, मोगरा, केवडा, गुलाब यांची माला [ ब्राम्हणांस ] द्यावी, तांबड्या माला देऊं नये. कर्त्यानें ब्राह्मणांसह चांगला वेष व अलंकार धारण करून अंगास केशर इत्यादि लावावें " [ असें सांगितलें आहे. ]

**वृद्धिश्राद्धारम्भे श्राद्धीयात्पाकात्पाकान्तरेण वैश्वदेवं सर्वैः कार्यम्। 'आदौ वृद्धौ क्षये चान्ते मध्ये दर्शे तु पार्वणे। एकोद्दिष्टे निवृत्ते तु वैश्वदेवो विधीयत' इति साङ्ख्यायनपरिशिष्टात्। अस्य बह्वृचैः पठ्यमानस्यापि होलाधिकरण न्यायेन सर्वसाधारण्यात्। यत्तु श्राद्धहेमाद्रौ शेषमन्नमनुज्ञाप्य वैश्वदेवक्रियां ततः। श्राद्धान्हि श्राद्धशेषेण सकलं तु समाचरेदिति चतुर्विंशतिमतादन्ते वैश्वदेवाचरणमुक्तम्। तच्छ्राद्धसामान्यविषयत्वाद्विशेषशास्त्रानुरोधेनाशक्तं प्रत्यनुकल्पभूतपक्षान्तरविधायकम्। अनेनैवाशयेन श्राद्धसामान्यपुरस्कारेणैव कालहेमाद्रावपि ईदृशोपन्यासाच्च।**

नांदीश्राद्धाच्या पूर्वीं निराळ्या पाकानें सर्वांनीं वैश्वदेव करावा, कारण " नांदीश्राद्धांत पूर्वीं, वर्षश्राद्धांत शेवटीं, दर्शांतील पार्वणश्राद्धांत मध्यें, व एकोद्दिष्टाच्या

१ ख. च. कुब्जयो.

शेवटीं वैश्वदेव करावा, " असें **सांख्यायनपरिशिष्टांत** सांगितलें आहे. जरी हें व
**सांख्यायनपरिशिष्टां**तील आहे तरी **होलाकाधिकरणन्यायानें*** तें सर्वशा
विषयीं समजावें. " श्राद्धदिवशीं शेषान्नाविषयीं आज्ञा घेऊन नंतर वैश्वदेव वगैरे
श्राद्धाच्या शेषान्नानेंच करावे " अशा **चतुर्विंशति** वाक्यावरून **श्राद्धहेमाद्रींत** शे
वैश्वदेव करण्याविषयीं जें आहे तें, सामान्य श्राद्धाविषयीं असल्यामुळें, विशेष शास्त्रा
( नांदीश्राद्धांत निराळ्या पाकानें पूर्वीं वैश्वदेव करावा याच्या ) अनुरोधानें [ श्र
हेमाद्रींतील वचन, भिन्नपाकानें वैश्वदेव करण्यास ] असमर्थ असणारास गौण
विधायक आहे. याच अभिप्रायानें **कालहेमाद्रींत**ही सामान्य श्राद्धप्रकरणांतच
सारख्या वचनांचा उल्लेख केला आहे.

**तथाचोक्तं दीपिकायाम् । भिन्नान्नेन तु वैश्वदेविकमनु श्राद्धं चरेत्सा
पश्चाद्भूतमखाद्यनग्निकजनस्त्वग्नौ कृतेर्वोत्तरम् । स्वस्त्युक्तेर्विकिरस्य चान्
तत्पाकान्तरेणाचरेद्देवाख्यं मखमन्ततः पितृयजेः स्याद्भूतयज्ञोऽथ वा । श्राद्धा
तदन्त एव सकलं स्याद्वैश्वदेवादिकमिति । अत्र सकलं साग्निककर्तृकं निर
ककर्तृकं च । न च पूर्वोक्तेन सह तुल्यविकल्पः । 'पक्षान्तं कर्म निर्वर्त्य वैश्
च साग्निकः । पिण्डयज्ञं ततः कुर्यात्ततोऽन्वाहार्यकं बुध' इत्याद्यनेकविशेषश
विरोधात् । पितृमात्राद्युद्देशेन नान्दीश्राद्धे पितुर्माता पितामही चेति पाठः ।
पार्वणविषयश्लोकैकदेशलोपः । केवलमातृपार्वणकरणे 'एता भवन्तु मे प्री
इत्यूहः । सूक्तवाकवदिष्टदेवतासंस्कारार्थत्वाच्छ्लोकपाठस्य। इति नान्दीश्राद्धनि**

**दीपिकेंत**:—" साग्निकानें निराळ्या पाकानें वैश्वदेव करून नंतर श्राद्ध क
नंतर भूतयज्ञ करावा. अनग्निकानें श्राद्धामध्यें अग्नौकरणानंतर किंवा स्वस्तिवा
नंतर अथवा विकिरानंतर निराळ्या पाकानें वैश्वदेव करून श्राद्ध संपल्यावर भू
करावा, किंवा श्राद्धाच्या शेवटीं श्राद्धान्नानेंच वैश्वदेव इत्यादि सकल कर्म करा
या वचनांतील '**सकलं**' या पदानें साग्निक व निरग्निक या दोघांनींही करा
वैश्वदेवादि कर्म असा अर्थ समजावा. पूर्वीं सांगितलेला पक्ष ( नांदीश्राद्धाच्या
निराळ्या पाकानें वैश्वदेव करावा ) व हा पक्ष ( श्राद्धाच्या शेवटीं श्राद्धशेषानें
देवादिक करावें ) यांचा विकल्प समजूं नये, कारण " साग्निक विद्वान् मनु
इष्टी करून वैश्वदेव व त्या नंतर पिंडयज्ञ करावा, नंतर अन्वाहार्य (दर्शश्राद्ध) क

* " होलाकाधिकरण " पा० ९६ टीप पहा.

इत्यादि अनेक विशेषशास्त्रांचा विरोध येतो. पित्याच्या मातृत्रयी इत्यादिकांस उद्देशून नांदीश्राद्ध करणें झाल्यास [ पुढें सांगितलेल्या ] '**माता पितामही चैव**' इत्यादि श्लोकांच्या पूर्वीं '**पितुः**' हें पद लावावें, ज्या पार्वणाचा लोप असेल त्याविषयींचा श्लोकांतील भाग गाळावा, केवळ मातृपार्वणच करणें असल्यास ['**एते भवन्तु मे प्रीताः**' याच्या ऐवजीं ] '**एता भवन्तु मे प्रीताः**' असा ऊह करावा, कारण **सूक्तवाकां**[1]-प्रमाणें श्लोकाचा पाठ हा इष्ट देवतेच्या संस्कारार्थ आहे. याप्रमाणें **नांदीश्राद्धाचा निर्णय** सांगितला.

**अथ मातृकापूजनादिनान्दीश्राद्धप्रयोगः । गौरी पद्मा शची मेधा सावित्री विजया जया । देवसेना स्वधा स्वाहा मातरो लोकमातरः । धृतिः पुष्टिस्तथा तुष्टिरात्मनः कुलदेवता । ब्राह्मी माहेश्वरी चैव कौमारी वैष्णवी तथा । वाराही च तथेन्द्राणी चामुण्डाः सप्त मातरः । गौर्यादिषोडशमातृब्राह्म्यादिसप्तमातृश्च एतेष्वक्षतपुञ्जेष्वावाहयामि । ॐ भूर्भुवः स्वः मातृभ्यो नम, इति नाममन्त्रेण ध्यानादि दक्षिणासमर्पणान्तां पूजां कृत्वा । गौरीर्मिमायसलिला० परमेव्योमन् मन्त्रपुष्पं समर्पयामि । इति मातृकापूजनम् । अथ नान्दीश्राद्धम् । सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः नान्दीमुखाः भूर्भुवः स्वः इदं वः पाद्यं स्वाहा नम इयं च वृद्धिः । मातृपितामहीप्रपितामह्यः नान्दीमुखाः भू० इदं वः पाद्यं० । पितृपितामहप्रपितामहाः नान्दीमुखाः भूर्भुवः स्वः इदं वः पाद्यं० । मातामहमातुः पितामहमातुः प्रपितामहाः पत्नीसहिताः नान्दीमुखाः भूर्भुवः स्वः इदं वः पाद्यं स्वा० । ततः पूर्ववत्सत्यवसुसंज्ञका इत्यादि आसनगन्धाद्युपचारकल्पनं स्वाहा नम इयं च वृद्धिः । एवं मातृपितामहीप्रपितामह्यः । पितृपितामहप्रपितामहाः । एवं मातामह इत्यादि । पुनः सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः नान्दीमुखाः भूर्भुवः स्वः इदं दास्यमानं वो युग्म ब्राह्मणभोजनपर्याप्तमन्नमामं वा यथाशक्ति सोपस्करं हिरण्यं वा स्वाहा नम इयं च वृद्धिः । मातृपितामहीप्रपितामह्यः० भू० दास्यमानमित्यादि । पितृपितामहप्रपितामहाः नान्दीमुखाः भूर्भुवः स्वः दास्यमानमित्यादि । एवं मातामह० सपत्नीका इत्यादि । गौर्यादिषोडशमातरः ब्राह्म्यादिसप्तमातरश्च वः युग्मब्राह्मण० । उपास्मैगा० ५ । अक्षन्नमीमदंत १ । कृतस्य नान्दीश्राद्धस्य पूर्ण-**

---

१ "**इदं द्यावापृथिवी भद्रमभूत्**" इत्यादि मंत्रांस सूक्तवाक ही संज्ञा आहे. यागकालीं इष्टदेवतांचे मंत्र म्हटले असतां त्या त्या देवतांस संस्कार होतो. **जै. न्या. मा. ३।२।५**

तासिद्धये द्राक्षामलकं तत्प्रतिनिधित्वेन द्रव्यं वा दक्षिणात्वेन स्वाहा नम०। इदं च श्राद्धीयान्नादिप्रतिग्रहीतृभ्यो देयम् । प्रजापतेनत्वदेतेति मन्त्रं जप्त्वा । अनेन नान्दीश्राद्धेन नान्दीमुखदेवताः प्रीयन्तां वृद्धिः। माता पितामही चैव तथैव प्रपितामही । पिता पितामहश्चैव तथैव प्रपितामहः । मातामहस्तत्पिता च प्रमातामहकादयः । एते भवन्तु मे प्रीताः प्रयच्छन्तु चं मङ्गलम् । इळामग्नेपुरुदंसं०१ इति यथाचारं मुद्रापात्रसंघट्टनेन शब्दं कुर्यात् । ततः उत्तिष्ठब्रह्मणस्पते०१ । अभ्यारमि० १ । यान्तु देवगणाः सर्वे० । इत्यादिवैदिकपौराणमन्त्रैरावाहितदेवता उत्थापयेत्[2] ।

आतां मातृकपूजन व नांदीश्राद्ध यांचा प्रयोग सांगतों " गौरी पद्मा शची मेधा सावित्री विजया जया । देवसेना स्वधा स्वाहा मातरो लोकमातरः। धृतिः पुष्टिस्तथा तुष्टिरात्मनः कुलदेवता । ब्राह्मी माहेश्वरी चैव कौमारी वैष्णवी तथा। वाराही च तथेन्द्राणी चामुण्डाः सप्त मातरः। गौर्यादिषोडशमातृः, ब्राह्म्यादिसप्तमातॄश्च एतेष्वक्षतपुंजेष्वावाहयामि" [असें म्हणून आवाहन करावें. नंतर] ॐ भूर्भुवः स्वः। मातृभ्यो नमः, या नाममंत्रानें ध्यानापासून दक्षिणासमर्पणापर्यंत पूजा करून 'गौरीर्मिमाय० मंत्रपुष्पं समर्पयामि' असें म्हणून मंत्रपुष्प द्यावें. याप्रमाणें मातृकापूजन समाप्त झालें. आतां नान्दीश्राद्ध सांगतों "सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः नान्दीमुखाः भूर्भुवःस्वः इदं वः पाद्यं स्वाहा नम इयं च वृद्धिः। मातृपितामहीप्रपितामह्यः नान्दी० भू० इदं वः पाद्यं० । पितृपितामहप्रपितामहाः नान्दी० भू० इदं वः पाद्यं० । मातामहमातुःपितामहमातुःप्रपितामहाः पत्नीसहिताः नान्दीमुखाः भूर्भुवःस्वः इदं वः पाद्यं स्वाहा नम इयं च वृद्धिः " [ असें म्हणून पाद्य द्यावें ] नंतर पूर्वीप्रमाणेंच ' सत्यवसुसंज्ञका विश्वदेवाः ' इत्यादि म्हणून आसन, गंध इत्यादि उपचार देऊन अंतीं 'स्वाहा नम इयं च वृद्धिः' असें म्हणावें. याप्रमाणेंच 'मातृपितामहीप्रपितामह्यः०। पितृपितामहप्रपितामहाः०। मातामहमातुःपितामह ' इत्यादि म्हणून पूर्वोक्त उपचार द्यावे. नंतर " सत्यवसुसंज्ञका विश्वदेवाः नान्दीमुखाः भूर्भुवःस्वः इदं दास्यमानं वो युग्मब्राह्मणपर्याप्तमन्नमामं वा यथाशक्ति सोपस्करं हिरण्यं वा स्वाहा नम इयं च वृद्धिः। मातृपितामहीप्रपितामह्यः० भू० दास्यमानं०। पितृपितामहप्रपितामहाः नान्दीमुखाः भूर्भवः स्वः ' दास्यमानं० । मातामह० सपत्नीकाः०'। गौर्यादिषो-

१ छ. सु । २ ख. ग इत्यनन्तदेवीये संस्कारकौस्तुभे सनिर्णयं मातृकापूजनं नान्दीश्राद्धं च.

डशमातरः ब्राह्म्यादिसप्तमातरश्च वः युग्मब्राह्मण० । उपास्मैगा० " अक्षन्नमीमदंत० " [ असें म्हणून सिद्धान्न, आमान्न किंवा त्यांच्याबद्दल द्रव्य द्यावें ]. नंतर " कृतस्य नान्दीश्राद्धस्य पूर्णतासिद्धये द्राक्षामलकं तत्प्रतिनिधित्वेन द्रव्यं वा दक्षिणात्वेन स्वाहा नम० असें म्हणून दक्षिणा द्यावी. ही दक्षिणा ज्यांस अन्न दिलें असेल त्यास द्यावी. प्रजापतेनत्वदेता० या मंत्राचा जप करून "अनेन नान्दीश्राद्धेन नान्दी मुखदेवताः प्रीयन्तां वृद्धिः । माता पितामही चैव तथैव प्रपितामही । पिता पितामहश्चैव तथैव प्रपितामहः । मातामहस्तत्पिता च प्रमातामहकादयः । एते भवन्तु मे प्रीताः प्रयच्छन्तु च मंगलम् " असें म्हणावें. नंतर 'इळामग्नेपुरुदंसं०' हा मंत्र म्हणून आचारानुसार पात्रावर मुद्रेनें ( पैसा इत्यादिकानें ) वाजवून शब्द करावा. मग ' उत्तिष्ठब्रह्मणस्पते० । अभ्यारमि० । ' यान्तु देवगणाः० 'इत्यादि वैदिक व पुराणोक्त मंत्र म्हणून आवाहन केलेल्या देवतांचें विसर्जन करावें.

विश्वेदेवा गर्भाधाने दक्षक्रतुसंज्ञकाः । ततोऽग्निध्यानादौ कृते चक्षुषी आज्येनेत्यन्ते प्रजापतिं चरुणा, विष्णुं षड्वारं प्रजापतिं चाज्येन, शेषेण स्विष्टकृतमित्यादिप्रणीतानिधानान्ते, प्रजापतये त्वा जुष्टं निर्वपामि, प्रोक्षामीति निर्वापप्रोक्षणाद्यग्न्यर्चनान्ते पत्न्यन्वारब्ध इध्माधानाद्याज्यभागान्तं कृत्वा, चरुमवदानधर्मेणावदाय, अन्वारब्धः सव्यपाणिमूर्ध्वाङ्गुलिं हृदये निधाय, प्रजापतये स्वाहेत्याहुतिं हुत्वा, प्रजापतय इदं न ममेति त्यजेत् । ततो विष्णुर्योनिमिति तिसृणां त्वष्टा विष्णुरनुष्टुप् । गर्भाधानप्रधानाज्यहोमे विनियोगः । ॐ विष्णुर्योनिंकल्पयतु० स्वाहा। विष्णव इदं० ३ । नेजमेषेति तिसृणां त्वष्टा विष्णुरनुष्टुप् । गर्भाधानप्रधानाज्य० । ॐ नेजमेषपरापत० स्वाहा । विष्णव इदं० । ऋचः ३ ।

गर्भधानांत दक्षक्रतुसंज्ञक विश्वेदेव ध्यावे, नंतर अग्नीचें ध्यान इत्यादि केल्यावर, 'चक्षुषी आज्येन' येथपर्यंत म्हटल्यानंतर "प्रजापतिं चरुणा, विष्णुं षड्वारं प्रजापतिं चाज्येन, शेषेणस्विष्टकृतं " इत्यादि म्हणावें. प्रणीता स्थापन झाल्यानंतर, " प्रजापतये त्वा जुष्टं निर्वपामि, व प्रोक्षामि " असें म्हणून निर्वाप व प्रोक्षण केल्यानंतर अग्नीच्या पूजेपर्यंत कर्म केल्यावर पत्नीनें अन्वारब्ध ( ज्यास स्पर्श केला आहे ) अशा [यजमानानें] इध्माधानापासून आज्यभागान्त कर्म करून, अवदानधर्मानें* चरू घेऊन, [पत्नीनें] अन्वारब्ध होऊन, बोटें वर होतील अशा रीतीनें डावाहात हृदयावर ठे-

* पंचावत्ती असल्यास तीन वेळां, नाहीं तर दोन वेळां अवदान घेणें.

१५

वून, "**प्रजापतये स्वाहा**" या नाममंत्रानें आहुति देऊन, "**प्रजापतय इदं न मम**" असा त्याग करावा. नंतर "**विष्णुर्योनिमिति तिसृणां त्वष्टा विष्णुरनुष्टुप्। गर्भाधानप्रधानाज्यहोमे विनियोगः। ॐ विष्णुर्योनिंकल्पयतु० स्वाहा। विष्णव इदं० ३। नेजमेषेति तिसृणां त्वष्टा विष्णुरनुष्टुप्। गर्भाधानप्रधानाज्य०। ॐ नेजमेषपरापत० स्वाहा। विष्णव इदं० ३** [ याप्रमाणें म्हणावें. ]

**यद्यप्यनुक्रमण्यनुसारेण विष्णुर्योनिमित्यादिहोमेषु लिङ्गोक्तत्वष्ट्रादिदेवता उचिताः। तथापि पारिजातादिग्रन्थैः सकलशिष्टाचारैश्चानादृता इति मयापि नादृताः। प्रजापते हिरण्यगर्भः प्रजापतिस्त्रिष्टुप्। गर्भाधानप्र०। ॐ प्रजापतेन० स्वाहा। प्रजापतय इदं०। अन्वारब्ध एवैवं सप्ताज्याहुतीर्हुत्वा। पत्न्या मूर्धानं दक्षिणपाणिनाभिमृशेत्। अपनःशोशुचदघमिति सूक्तस्य कुत्सोऽग्निर्गायत्री। मूर्धाभिमर्शने वि०। ॐ अपनःशोशुचदघं० इति सूक्तान्ते मूर्ध्नि हस्तं निधाय। ततस्तमपसार्य,याः फलिनीरिति जपेत्। याः फलिनीरित्यस्य आथर्वणोभिषगोषधयोऽनुष्टुप्। जपे विनि०। ॐ याः फलिनीर्या०१। ततोऽग्नेर्वायव्यांदिशि तिष्ठन्नुपतिष्ठते। वधेनदस्युमिति षण्णां वसुश्रुतोऽग्निस्त्रिष्टुप्। अग्न्युपस्थाने वि०। ॐ वधेनदस्युंप्रहिचातयस्व० ऋचः६। अग्निस्तुविश्रवस्तमामिति द्वयोर्वसूयवोऽग्निरनुष्टुप्। अग्न्युपस्थाने वि०। ॐ अग्निस्तुविश्रवस्तमं० ऋचः२। ततः सूर्योपस्थानं कृत्वा, स्विष्टकृदादिहोमशेषं समापयेत्। परिशिष्टस्वारसिकप्रतीतेः। परिशिष्टान्मूर्धालम्भात्पूर्वं वा सूर्योपस्थानम्। होमशेषं समाप्य सूर्योपस्थानमिति वृद्धाः। सूर्योनोदिवस्पात्विति पञ्चर्चस्य सूक्तस्य चक्षुः सूर्यो गायत्री। सूर्योपस्थाने वि०। ॐ सूर्योनोदिवस्पातु० ऋचः५, इति सपत्नीकः सूर्यमुपस्थाय। ब्राह्मणान् शतं, दश, त्रीन् वा भोजयित्वा, तदाशिषोगृहीत्वा, भुक्त्वा, अनुकूलनिशायां कृतनित्यक्रियः स्वलंकृतः स्वलंकृतया पत्न्या सह स्वलंकृतं गृहं प्रविशेत्।**

जरी सर्वानुक्रमाच्या अनुरोधानें '**विष्णुर्योनिं०**' इत्यादि मंत्रांनीं होम कर्तव्य असतां लिंगोक्त (मंत्रांतील शब्दांनीं बोधित होणाऱ्या) त्वष्ट्रादि देवता घेणेंच उचित आहे, तथापि **पारिजातादिग्रंथांत** त्या देवता घेतल्या नसून सर्व शिष्टलोकही त्या घेत नाहींत म्हणून मींही त्या सांगितल्या नाहींत. '**प्रजापते हिरण्यगर्भः प्रजापतिस्त्रिष्टुप्। गर्भाधानप्र०। ॐ प्रजापतेन० स्वाहा। प्रजापतय इदं०**' अन्वारब्ध होऊन

---

१ ख. अ. विष्ण्वादि च. त्वाष्ट्रादि। २ ख. ग. ज. छ. स्यभिष।

याप्रमाणें सात आज्याहुती देऊन स्त्रीच्या मस्तकास उजव्या हातानें स्पर्श करावा. **'अपनःशोशुचदघमिति सूक्तस्य कुत्सोऽग्निर्गायत्री । मूर्धाभिमर्शने विनियोगः । ॐ अपनःशोशुचदघं०'** हें सूक्त म्हटल्यानंतर मस्तकावर हात ठेवून, पुन्हां तो काढून '**याःफलिनीः०**' याचा जप करावा. "**याःफलिनीरित्यस्य आथर्वणो भिषगोषधयोऽनुष्टुप् । जपे विनियोगः । ॐ याःफलिनीः०**" नंतर अग्नीच्या वायव्यदिशेस उभें राहून उपस्थान करावें. "**वधेनदस्युमिति षण्णां वसुश्रुतोऽग्निस्त्रिष्टुप् । अग्न्युपस्थाने वि० । ॐ वधेनदस्युंप्रहिचातयस्व० ६ । अग्निस्तुविश्रवस्तममिति द्वयोर्वसूयवोऽग्निरनुष्टुप् । अग्न्युपस्थाने वि० । ॐ अग्निस्तुविश्रवस्तमं० २**" नंतर सूर्योपस्थान करून स्विष्टकृदादि होमशेष समाप्त करावा. असें **परिशिष्टकाराच्या** स्वारस्यावरून दिसतें. **परिशिष्टांत** सांगितलेल्या मस्तकास स्पर्श करण्याच्या पूर्वी सूर्योपस्थान करावें [ असाही एक पक्ष आहे ]. होमशेष समाप्त करून सूर्योपस्थान करावें असें **वृद्ध** म्हणतात. "**सूर्योनोदिवस्पात्विति पञ्चर्चस्य सूक्तस्य चक्षुः सूर्यो गायत्री । सूर्योपस्थाने वि० । ॐ सूर्योनोदिवस्पातु० ५**" याप्रमाणें स्त्रीसहित सूर्योपस्थान करून, शंभर, दहा किंवा तीन ब्राम्हणांस भोजन घालून त्यांचे कडून आशीर्वाद घेऊन भोजन करावें. नंतर शुभरात्रीं नित्यकर्में आटोपल्यावर अलंकार धारण करून अलंकार धारण केलेल्या पत्नीसह शृंगारलेल्या गृहांत ( सुशोभित महालांत ) प्रवेश करावा ।

**तत्र पर्यङ्कारूढस्तां शुभे मुहूर्ते पर्यङ्कमारोप्य, सूक्ष्मवस्त्रेणाश्वगन्धाकल्कं संवेष्ट्य, उदीर्ष्वेति द्वयोः सूर्यासावित्री ऋषिका, सूर्यासावित्री देवता, आद्या त्रिष्टुप्, अन्त्यानुष्टुप्, भार्यायाः नासापुटे अश्वगन्धारससेचने विनियोगः । पक्षान्तरे दूर्वारससेचने इति विशेषः । ॐ उदीर्ष्वातःपतिवती० स्वाहेति स्वाहाकारान्ताभ्यां मन्त्राभ्यां प्राङ्मुख्याः प्राङ्मुखः पृष्ठतस्तिष्ठन्नासापुटयोः सिञ्चेत् । यथा रस उदरपर्यन्तमायाति । उभयोर्नासाबिलयोर्निषिञ्चेयेति परिशिष्टात् । दक्षिणनासापुट एव वा सिञ्चेत् । नस्तो दक्षिणतो निषिञ्चेदिति परिशिष्टान्तरात् ।**

तेथें पलंगावर बसून स्त्रीसही शुभवेळीं पलंगावर बसवावी व अश्वगंधेची वांटलेली गोळी बारीक वस्त्रांत बांधून, "**उदिर्ष्वेति द्वयोः सूर्यासावित्री ऋषिका, सूर्यासावित्री देवता, आद्या त्रिष्टुप्, अन्त्यानुष्टुप्, भार्याया नासापुटे अश्वगन्धारससेचने विनियोगः**, किंवा **दूर्वारससेचने वि० । ॐ उदीर्ष्वातःपतिवती० स्वाहा.**" या-

प्रमाणें स्वाहाकारान्त मंत्रांनीं पूर्वेकडे तोंड करून बसलेल्या स्त्रीच्या पाठीमागें आपण पूर्वाभिमुख उभें राहून तिच्या दोन्हीं नाकपुड्यांत तो रस पोटांत जाईल अशा बेतानें पिळावा. कारण ' दोन्हीं नाकपुड्यांत पिळावा ' असें **परिशिष्ट** आहे. अथवा उजव्या नाकपुडींतच पिळावा, कारण ' उजव्या नाकपुडींतच पिळावा ' असें **इतर परिशिष्टांत** सांगितलें आहे.

**ततस्तामाचमय्य । ॐ गन्धर्वस्यविश्वावसोर्मुखमसीति मन्त्रेण पूर्वोक्तर्ष्यादिभिर्विष्णुर्योनिमिति तिसृभिः, नेजमेष इति तिसृभिः, तिसृभिरङ्गुलीभिः योनिमभिमृश्य । तांपूषन्निति मन्त्रस्य सूर्यासावित्री ऋषिका । सूर्यासावित्री देवता । त्रिष्टुप्छन्दः । जपे विनियोगः । ॐ तांपूषन्छिवतमामेरयस्व० १ । योगर्भमित्यस्य वसिष्ठः पर्जन्यो गायत्री । जपे वि० । ॐ योगर्भमोषधीनां० १ । अहंगर्भमित्यस्य प्रजावान्प्राजापत्यो गर्भ इन्द्रस्त्रिष्टुप्[1] । जपे विनि० । ॐ अहंगर्भमदधा० १ । इति जपित्वा । सकृदुपगच्छेत् । रेतःसेककाले । प्राणे ते रेतो दधाम्यसाविति अनुप्राण्य । यथा भूमिरग्निगर्भा यथा द्यौरिन्द्रेण गर्भिणी । वायुर्यथा दिशां गर्भ एवं ते गर्भं दधाम्यसाविति स्त्रीहृदयमभिमृश्याचामेत् । असावित्यस्य स्थाने प्रथमैकवचनान्तं स्वीयं नाम वाच्यम् । संप्रदायानुसारेणोक्तमेतत् ।**

नंतर स्त्रीकडून आचमन करवावें. व " **ॐ गंधर्वस्यविश्वावसोर्मुखमसि** " या मंत्रानें व पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ऋष्यादिकांनींयुक्त अशा ' **विष्णुर्योनिं०** ' या तीन व '**नेजमेष०**' या तीन ऋचांनीं, तीन अंगुलींनीं योनीस स्पर्श करून "**तांपूषन्निति मंत्रस्य सूर्यासावित्री ऋषिका, सूर्यासावित्री देवता, त्रिष्टुप् छन्दः, जपे विनि० । ॐ तांपूषनृछिवतमामेरयस्व० । योगर्भमित्यस्य वसिष्ठः पर्जन्यो गायत्री । जपे वि० । ॐ यो गर्भमोषधीनां० १ । अहंगर्भमित्यस्य प्रजावान् प्राजापत्यो गर्भ इन्द्रस्त्रिष्टुप्, जपे विनि० । ॐ अहंगर्भमदधा०** " । याप्रमाणें जप करून, एकवेळां गमन करावें. वीर्यपतनकालीं ' **प्राणे ते रेतो दधाम्यसौ** ' असें म्हणून अनुप्राणन करून "**यथा भूमिरग्निगर्भा यथा द्यौरिन्द्रेण गर्भिणी । वायुर्यथा दिशां गर्भ एवं ते गर्भं दधाम्यसौ** " याप्रमाणें मंत्र म्हणून स्त्रीच्या हृदयास स्पर्श करून आचमन करावें. वरील वचनांतील ' **असौ** ' या पदाबद्दल प्रथमाविभक्त्यन्त स्वतःचें नांव उच्चारावें. वरील प्रकार संप्रदायास अनुसरून सांगितला आहे.

---

१ च. छ. ज. ञ. स्त्रोनुष्टुप् ।

परिशिष्टे तु । गन्धर्वस्यविश्वावसोर्मुखमसीति उपस्थमभिमृश्य । विष्णुर्योनिंकल्पयत्विति द्वाभ्यां विहृत्य । योगर्भमोषधीनामहंगर्भमदधामोषधीष्विति जपित्वोपगच्छेत् । प्राणेतेरेतोदधाम्यसावि० अभिमृशेत् । नैके गमने मन्त्रविधिमिच्छन्ति । न त्वनेन किञ्चित्संस्क्रियत इति । तत्रौषधिनिषेकं कृत्वोपगच्छे[1]दित्युक्तम् । परिशिष्टान्तरे तु गन्धर्वस्यविश्वावसोर्मुखमसीत्युपस्थं प्रजनयिष्यमाणोऽभिमृशेत् । विष्णुर्योनिमिति द्वारं विदारयेत् । तांपूषञ्छिवतमामेरयस्वेत्यनुप्रहरेत् । समाप्तेऽर्थे जपेत् । प्राणेतेरेतोदधाम्यसाविति अनुप्राण्यात् । यथा भूमिरग्निगर्भा यथा द्यौरिन्द्रेण गर्भिणी । वायुर्यथा दिशां गर्भ एवं ते गर्भं दधाम्यसाविति चोक्तम् ।

परिशिष्टांत तर 'गंधर्वस्यविश्वावसोर्मुखमसि,' यानें योनीस स्पर्श करून 'विष्णुर्योनिं कल्पयतु०' या दोन मंत्रांनीं विहार करून, 'योगर्भमोषधीनां०, अहंगर्भमदधामोषधीषु०'। या मंत्रांचा जप करून गमन करावें. 'प्राणे ते रेतो दधाम्यसौ' असें म्हणून अनुप्राणन करून 'यथाभूमि०' इत्यादि म्हणून स्त्रीच्या हृदयास स्पर्श करावा. कित्येकांच्या मतें गमनाविषयीं मंत्रविधि नाहीं, कारण, या मंत्रांनीं कांहीं संस्कार केला जात नाहीं. म्हणून केवळ रस सेचन करूनच गमन करावें. असें त्यांनीं सांगितलें आहे. इतर परिशिष्टांत तर 'गंधर्वस्यविश्वावसोर्मुखमसि' या मंत्रानें गमन करणाऱ्यानें योनीस स्पर्श करावा. 'विष्णुर्योनिं०' या मंत्रानें द्वाराचें विदारण करावें. 'तापूषञ्छिवतमा०' या मंत्रानें अनुप्रहार करावा. कृत्य समाप्त झाल्यावर जप करावा. 'प्राणे ते रेतो दधाम्यसौ' या मंत्रानें अनुप्राणन करून 'यथा भूमिरग्निगर्भा०' [ या मंत्रानें पूर्वीप्रमाणें स्त्रीच्या हृदयास स्पर्श करावा. ] असें सांगितलें आहे.

उक्तहोमासंभवे पूर्वोत्तरपाकयज्ञतन्त्रसहिताः पञ्चाज्याहुतयो होतव्याः । अग्नयेस्वाहा । इन्द्रायस्वाहा । प्रजापतयेस्वाहा । विश्वेभ्योदेवेभ्यः स्वाहा । ब्रह्मणे स्वाहा । तत्र परिस्तरणमाज्यभागौ ब्रह्मा चेत्यङ्गानि कृताकृतानि । सर्वथैव होमासंभवे अश्वगन्धामूलं पेषयित्वा । उदीर्ष्वातः पतिवतीत्येकयैव ऋचा दक्षिणस्यां नासिकायां निषिच्योपगमनं कार्यम् । यथोक्तं सिद्धान्तभाष्ये । तत्रैके ऋतुकाले अनादेशहोममिच्छन्ति । अपरे तु उदीर्ष्वेत्यनया दक्षिणस्यां नासिकायां

१ ख. ग. च. ञ. गच्छन्तीत्युक्तम्.

नस्तः करोतीत्येतद्गर्भलम्भनमिति। अनुसृतं च होमरहितस्य एकयर्चा नस्तः-करणमात्रस्य सौत्रगर्भलम्भनपदार्थत्वं जयन्तेन। तदनुसारिणा कारिका-कृतापि। उक्तं चेत्थम् शौनकेनापि 'उदीर्ष्वातः पतिवतीत्येतामृचमुदीर्य त्वित्या-दिना ग्रन्थेन। नचोपगमनमन्त्रा अप्यावश्यकाः, जयन्तादिभिरनादरणात्। उदाहृतपरिशिष्टाच्च। प्राजापत्यचरुहोमकरणपक्षेऽपि प्रथमर्तावेवासौ कार्यः। अश्वगन्धारसेन नस्तःकरणं तु प्रत्यृतु आवर्तते। परिशिष्टे 'अथर्तुमत्याः प्राजा-पत्यमृतौ प्रथमे' इत्युपक्रम्य होमाम्नानात्। अथ गर्भलम्भनमृताविति ऋतुसामा-न्यमधिकृत्य नस्तःकरणाम्नानात्। तथैव भाष्यकारादिभिः संकथनाच्च। इत्य-नन्तदेवीये संस्कारकौस्तुभे गर्भाधानम्।

पूर्वी सांगितलेला होम करण्याची शक्ति नसल्यास पूर्वोत्तरांगसहित स्थालीपाक-तंत्र करून ' **अग्नये स्वाहा। इंद्राय०। प्रजापतये०। विश्वेभ्योदेवेभ्यः०। ब्रह्मणे०।** याप्रमाणें पांच आज्याहुती द्याव्या. यापक्षीं परिस्तरण, आज्यभाग व ब्रह्मा हीं अंगें कृताकृत आहेत ( करावीं अगर करूं नयेत ). सर्वथा होमाचा असंभव असल्यास अ-श्वगंधेच्या मुळीचा रस ' **उदीर्ष्वातःपतिवती०**' या एका ऋचेनें [स्त्रीच्या] उजव्या नाकपुडींत पिळून गमन करावें. याविषयीं **सिद्धांतभाष्यांत**:—कित्येक गर्भाधानकालीं अनादेश होम करावा असें म्हणतात. दुसरे कित्येक, ' **उदीर्ष्वातः०** ' या ऋचेनें उजव्या नाकपुडींत रस पिळावा, हाच गर्भसंस्कार होय असें म्हणतात. '**जयंतानें**' व त्याचें अनुसरण करणारा '**कारिकाकार**' यानें, होम न करतां केवळ एका ऋचेनें [ नाकांत ] रस पिळणें, हेंच सूत्रांत सांगितलेलें गर्भसंस्कारकर्म मानिलें आहे. **शौन-कानें**ही " **उदीर्ष्वातःपतिवती०** ही ऋचा म्हणून " इत्यादि ग्रंथानें हेंच सांगि-तलें आहे. गमन करण्याविषयींही मंत्राची आवश्यकता नाहीं, कारण **जयंतादिकांनीं** त्याचा आदर केला नाहीं व त्याप्रमाणें पूर्वोक्त **परिशिष्ट**ही आहे. प्रजापतिदेव-तेस उद्देशून चरूनें होम करावयाचा तो प्रथमऋतुकालींच करावा. अश्वगंधेचा रस पिळणें तो मात्र प्रत्येक ऋतूच्या वेळीं पिळला पाहिजे, कारण, **परिशिष्टांत** ' **अ-थर्तुमत्याः प्राजापत्यमृतौ प्रथमे** ' ( ऋतुमती स्त्रीच्या प्रथम ऋतूचे वेळीं प्रजापतीस उद्देशून होम करावा.) असा उपक्रम करून होम सांगितला आहे, व **अथ गर्भलम्भ-नमृतौ** ' ( आतां ऋतुकालीं गर्भसंस्कार सांगतों ) या प्रमाणें सामान्य ऋतुकालीही **नस्तःकरणं** ( अश्वगंधेचा रस नाकांत पिळणें ) सांगितलें आहे. व त्याचप्रमाणें

भाष्यकारादिकांनींही कथन केलें आहे. **याप्रमाणें अनंतदेव यानीं केलेल्या संस्कारकौस्तुभ ग्रंथांतील गर्भाधानप्रकरण** समाप्त झालें.

**एवं जातगर्भाया धर्मा उच्यन्ते । पाद्मे गर्भिण्यधिकारे ' नावस्कारेषूपविशेन्मुसलोलूखलादिषु । जलं च नावगाहेत शून्यागारं च वर्जयेत् । वल्मीकं नाधितिष्ठेत न चोद्विग्नमना भवेत् । विलिखेन्न नखैर्भूमिं नाङ्गारेण न भस्मना । न शयालुः सदा तिष्ठेद्व्यायामं च विवर्जयेत् । न तुषाङ्गारभस्मास्थिकपालेषु समाविशेत् । वर्जयेत्कलहं गेहे गात्रभङ्गं तथैव च । न मुक्तकेशा तिष्ठेत नाशुचिः स्यात्कदा च न । न शयीतोत्तरशिरा न चैवाधःशिरा क्वचित् । न वस्त्रहीना नोद्विग्ना न चार्द्रचरणा तथा । नामङ्गल्यं वदेद्वाचा न च हास्याधिका भवेत् । कुर्याच्छ्वशुरयोर्नित्यं पूजां माङ्गल्यतत्परा । तिष्ठेत्प्रसन्नवदना भर्तुः प्रियहिते रतेति**

आतां **गर्भिणीस्त्रीचे धर्म** सांगतों—गर्भिणीस उद्देशून **पद्मपुराणांत**:—[ गर्भिणी स्त्रीनें ] केरावर, मुसळावर व उखळावर बसणें; पाण्यांत स्नान करणें; ओसाड घरांत जाणें; वारुळावर बसणें; मनांत खिन्न असणें; नखानें, कोळशानें, व राखेनें जमीनीवर रेघा ओढणें; सर्वकाल निजणें; मेहनत करणें; कोंडा, कोळसे, राख, हाडकें व मस्तकाच्या कवच्या यांवर बसणें; घरांत भांडण करणें; अंगाची हाडें मोडणें; केंस मोकळे सोडून बसणें; अमंगळ राहाणें; उत्तरेस डोकें करून निजणें; डोकें खालीं करून निजणें; वस्त्ररहित असणें; उद्विग्न असणें; ओले पाय ठेवणें; वाणीनें अपशब्द बोलणें व अति हसणें; या गोष्टी वर्ज्य कराव्या. मंगलकर्माविषयीं तत्पर राहून सासूसासऱ्यांची शुश्रूषा करावी व प्रफुल्लितमुखानें भर्त्याचें प्रिय व हित करीत असावें.

**पाद्मे । सन्ध्यायां नैव भोक्तव्यं गर्भिण्या वरवर्णिनि । न स्थातव्यं न गन्तव्यं वृक्षमूले च सर्वदा । सर्वौषधीभिः कोष्णेन वारिणा स्नानमाचरेत् । कृतरक्षा सुभूषा च वास्तुपूजनतत्परा । दानशीला तृतीयायां पार्वत्यां नक्तमाचरेत् । गर्भिणी कुञ्जराश्वादिशैलहर्म्यादिरोहणम् । व्यायामं शीघ्रगमनं शकटारोहणं त्यजेत् । शोकं रक्तविमोकं च साध्वसं कुक्कुटासनम् । व्यवायं च दिवास्वापं रात्रौ जागरणं त्यजेत् । अतिक्षारं तु नाश्नीयादत्यम्लमतिभोजनम् । अत्युष्णमतिशीतं च गुर्वाहारं परित्यजेत् । इतिवृत्ता भवेन्नारी विशेषेण तु**

गर्भिणी । यश्च तस्यां भवेत्पुत्रः स्थिरायुर्वृद्धिसंयुतः । अन्यथा गर्भपतनमवाप्नोति न संशय' इति । मार्कण्डेयपुराणे गर्भं प्रकृत्य । तस्य रक्षां सदा कुर्यान्नित्यं शौचनिषेवणात् । प्रशस्तमन्त्रालिखनाच्छस्तमाल्यानुलेपनात् । विशुद्धगेहवसनादनायासाच्च वै द्विजेति । तत्रैव गर्भिणीं प्रकृत्य 'अतो न वृक्षं नैवाद्रिं प्राकारं न पयोनिधिम् । परिखां वा समाक्रामेदबला गर्भधारिणीति ।

पद्मपुराणांतः—" हे प्रिये, गर्भिणीनें संध्याकाळीं भोजन करणें, झाडाखालीं जाणें व उभें राहाणें हीं वर्ज्य करावीं. सर्वौषधिमिश्रित कोमट पाण्यानें स्नान करावें. उत्तम भूषणें धारण करून [ मंत्रादिकांनीं ] रक्षाविधि करून, गृहदेवतेचें पूजन करावें. दानधर्म करीत असावें. जिची देवता पार्वती अशा तृतीयेस नक्त करावें. हत्ती, घोडे इत्यादिकांवर बसणें व पर्वत, माड्या इत्यादिकांवर चढणें, मेहनत करणें, जलदीनें चालणें, गाडींत बसणें, शोक करणें, अंगांतील रक्त काढणें, भीति, (भयजनक पदार्थ पाहाणें), कुक्कुटासन, मैथुन, दिवसां निजणें, रात्रीं जागरण करणें, हीं कृत्यें गर्भिणीनें वर्ज्य करावीं. त्याचप्रमाणें अति खारट, अति आंबट, अति खाणें, फार ऊन, फार थंड, व जड अन्न, यांचाही त्याग करावा. सामान्य स्त्रियांनींही असें आचरण ठेवावें आणि गर्भिणीनें तर विशेषें करून ठेवावें, म्हणजे तिला होणारा पुत्र दीर्घायुषी व निरोगी होईल, नाहींपेक्षां निःसंशय गर्भपात होईल. " याचप्रमाणें **मार्कंडेयपुराणांत** गर्भास उद्देशून " हे ब्राह्मणा [ गर्भिणीनें ] नेहमीं शुद्ध राहून प्रशस्त मंत्र लिहून उत्तम माळा व चंदन, यांचें धारण करून, शुद्ध अशा घरांत राहून श्रम न करितां नेहमीं गर्भाचें रक्षण करावें. " असें सांगितलें आहे. त्याच पुराणांत गर्भिणीस उद्देशून " या करितां वृक्ष, पर्वत, कोट, समुद्र व खंदक, यांचें उल्लंघन गर्भिणी स्त्रीनें करूं नये. " असें सांगितलें आहे.

अथ गर्भिणीपतिधर्माः । सङ्ग्रहे । गर्भिणी वाञ्छितं द्रव्यं तस्यै दद्याद्यथोचितम् । सूते चिरायुषं पुत्रमन्यथा दोषमर्हतीति । कालविधाने । क्षौरं शवानुगमनं नखकृन्तनं च युद्धं च वास्तुकरणं त्वतिदूरयानम् । उद्वाहमम्बुधिजलस्पृशनोपयोगमायुःक्षयो भवति गर्भिणिकापतीनामिति । क्षौरं वपनम् । तच्चात्र कर्तनस्याप्युपलक्षणम् । नोदन्वतोऽम्भसि स्नायान्न च श्मश्र्वादि कर्तयेत् । अन्तर्वत्न्याः पतिः कुर्वन्नप्रजा भवति ध्रुवमिति ऋतुस्मरणात् । यत्तु वपनस्य निषेधेऽपि कर्त्तनं च विधीयत ' इति स्मृत्यन्तरवचनम्, तद्गर्भिणीपतिव्यतिरि-

**क्तानां जीवत्पितृकादीनां यो वपननिषेधस्तत्र कर्त्तनविधानपरम् । संग्रहे । दहनं वपनं चैव चौलं वै गिरिरोहणम् । नाव आरोहणं चैव वर्जयेद्गर्भिणीपतिरिति[1] । ' केशान् मासत्रयादूर्ध्वं धारयेद्गर्भिणीपतिः । जायायां तु प्रसूतायां दशमेऽहनि वापयेत् ' इति शौनकः । स्मृत्यन्तरे । सिन्धुस्नानं द्रुमच्छेदं वपनं प्रेतवाहनम् । विदेशगमनं चैव न कुर्याद्गर्भिणीपतिरिति । एतदपवादस्तत्रैव । क्षौरं नैमित्तिकं कुर्यान्निषेधे सत्यपि ध्रुवम् । पित्रोः प्रेतविधानं च गर्भिणीपतिराचरेत् । एते[2] च नियमाः सप्तममासादूर्ध्वं भवन्ति । ' वपनं मैथुनं तीर्थं वर्जयेत् गर्भिणीपतिः । श्राद्धं च सप्तमादूर्ध्वम् ' इत्याश्वलायनोक्तेः । श्राद्धं श्राद्धभोजनम् । तीर्थम् तीर्थयात्राम् । इति गर्भिणीपतिधर्माः ।**

आतां **गर्भिणीस्त्रीच्या पतीचे** नियम [ सांगतों ] **संग्रहांत**ः—" गर्भिणीस योग्य असे इच्छित पदार्थ द्यावे, असें केल्यानें ती चिरायु पुत्रास प्रसवते. नाहींतर दोषयुक्त अपत्य होतें" **कालविधानांत**ः—" क्षौर, प्रेताबरोबर जाणें, नखें काढणें, लढाई करणें, घर बांधणें, फार लांब जाणें, विवाह व समुद्रस्नान, हीं कृत्यें गर्भिणीच्या पतीनें केल्यास त्याचें आयुष्य क्षीण होतें." **क्षौर=श्मश्रू करविणें.** या शब्दानें केंस कातरविणें हा अर्थही लक्षित होतो. कारण " गर्भिणीपतीनें समुद्रोदकांत स्नान करणें व श्मश्रू कातरविणें, हीं कृत्यें करूं नयेत, केल्यास त्याची स्त्री प्रजाहीन होते, अशी **ऋतुस्मृति** आहे. आतां " वपनाचा निषेध असला तरी कर्तन करावें " असें जें स्मृत्यंतरांतील वचन आहे तें गर्भिणीस्त्रीच्या पतीखेरीज इतर जे जीवत्पितृकादिक त्यांस जेथें वपनाचा निषेध सांगितला आहे तेथें [ केशांचें ] कर्तन करविण्याविषयीं समजावें. **संग्रहांतः**—" प्रेत जाळणें, वपन, चौल, पर्वत व नौका यांवर चढणें, हीं कृत्यें गर्भिणीपतीनें वर्ज्य करावीं " असें [सांगितलें आहे.] **शौनकः**—" गर्भिणी स्त्रीच्या पतीनें ( गर्भिणीस ) तीन महिने झाल्यानंतर केश धारण करावे. भार्या प्रसूत झाल्यावर दहावे दिवशीं श्मश्रू करवावी. " **स्मृत्यंतरः**—" गर्भिणीपतीनें समुद्रस्नान, झाड तोडणें, क्षौर, प्रेतवहन व परदेशगमन हीं कृत्यें करूं नयेत." याचा अपवादही तेथेंच सांगितला आहे. " जरी निषेध आहे तथापि गर्भिणीस्त्रीच्या पतीनें नैमित्तिक ( पित्रादिमरण निमित्तक ) क्षौर करावें. त्याचप्रमाणें आईबापांचें और्ध्वदेहिक कर्महीं करावें. " हे नियम ( गर्भिणीस ) सात महिने झाल्यानंतर समजावे. कारण

---

१ ख. च. छ. ञ. रितिस्मृत्य । २ ख. ग. ते चत्वारोनिय.

वपन, मैथुन, तीर्थयात्रा, व श्राद्धभोजन हीं कर्में सातव्या महिन्यानंतर गर्भिणीपतीनें वर्ज्य करावीं " असें **आश्वलायनवचन** आहे. **'श्राद्ध'=श्राद्धभोजन** व **'तीर्थ'=तीर्थयात्रा.** याप्रमाणें **गर्भिणीस्त्रीच्या पतीचे धर्म** [ समाप्त झाले ].

**यदि कृतेऽपि गर्भाधाने गर्भोत्पत्त्यभावः तदा प्रतिबन्धकप्रेतोपद्रवनिवृत्त्यै नारायणबलिनागबली कार्यौ । परिशिष्टे । अथ नारायणबलिः । अर्वाक् संवत्सराच्छुद्धकाले शुक्लैकादश्यां स्नातः शुचौ देशे विष्णुं वैवस्वतं यमं च यथावदभ्यर्च्य, तदग्रे तिलमिश्रान् मधुघृतप्लुतान् दश पिण्डान्, विष्णुरूपं प्रेतं ध्यायन्, काश्यपगोत्रासौ विष्णुदैवत अयं ते पिण्ड इति दक्षिणाग्रेषु दर्भेषु दक्षिणामुखः प्राचीनावीती पराचीनेन पाणिना दत्वा, पिण्डान्[1] गन्धादिभिरभ्यर्च्य प्रवाहणान्तं कृत्वा नद्यां क्षिपेत् । अथ रात्रावयुग्मब्राह्मणान् निमन्त्र्योपोषितः श्वो मध्यंदिने विष्णुमभ्यर्च्य प्रेतमुद्दिश्य ब्राह्मणानेकोद्दिष्टविधिना भोजयित्वा तृप्तेषु ब्राह्मणसमीपे पिण्डे[2]विधिना निनयनान्तं तूर्ष्णीं कृत्वा विष्णवे, ब्रह्मणे, शिवाय, सपरिवाराय यमाय, विष्णो अयं ते पिण्ड इत्येवं चतुरः पिण्डान् भुक्त[3]शेषेण दक्षिणसंस्थान् दत्वा, अथ पञ्चमं काश्यपगोत्र देवदत्तेति प्रेतं ध्यात्वा, तद्रूपाय विष्णोऽयं ते इति दद्यात् ।**

याप्रमाणें गर्भाधान संस्कार केला असतांही गर्भधारण होत नसेल तर गर्भास प्रतिबंधक जो प्रेताचा ( ज्याची क्रिया झाली नाहीं अशा मृत मनुष्याचा ) उपद्रव, तो दूर होण्याकरितां **नारायणबलि** व **नागबलि** करावे. **परिशिष्टांत**:—" **आतां नारायणबलि** [ **सांगतों** ] वर्षाच्यापूर्वीं शुद्ध एकादशीस चांगल्या वेळीं स्नान करून शुद्धभूमीवर विष्णु, व वैवस्वत यम, यांची यथाविधि पूजा करून त्यांच्या पुढें दक्षिणाग्रदर्भांवर [ कर्त्यानें ] दक्षिणेस तोंड करून व अपसव्य करून तीळ, मध व घृत यांनीं युक्त असे दहा पिंड उताण्या हातानें अंगठ्याचे बाजूनें द्यावे. पिंड देतेवेळीं विष्णुरूपीप्रेताचें ध्यान करून " **काश्यपगोत्रासौ विष्णुदैवत अयं ते पिंडः** " याप्रमाणें मंत्र म्हणावा. नंतर पिंडांची गंधादिकांनीं पूजा करून प्रवाहणापर्यंत कर्म करून नदींत टाकावे. नंतर रात्रीं उपोषित राहून विषमसंख्याक ब्राम्हणांस आमंत्रण करून दुसरे दिवशीं मध्यान्हकालीं विष्णूची पूजा करून, प्रेतास उद्देशून एकोद्दिष्ट विधीनें ब्राम्हणांस भोजन घालून, ब्राम्हण तृप्त झाल्यानंतर त्यांच्या जवळ पिंडपितृ-

---

१ च. ञ. दीनद्यांदिभि । २ खग. ण्डयज्ञवि । ३ छ. भक्त ।

यज्ञांत सांगितल्याप्रमाणें निनयनान्त ( उदकदानान्त ) कृत्य ' **तूष्णीं** ' ( मंत्ररहित ) करून, विष्णु, ब्रह्मा, शिव व सपरिवार यम यांस उद्देशून, राहिलेल्या भातानें चार पिंड ' **विष्णो अयं ते पिंडः** ' इत्यादि नाम मंत्रांनीं दक्षिणसंस्थ ( उत्तरेकडून आरंभ करून दक्षिणेस समाप्ति होईल असें ) द्यावे. नंतर विष्णुरूपीप्रेताचें ध्यान करून ' **काश्यपगोत्र देवदत्त विष्णोऽयं ते पिंडः** ' असें म्हणून पांचवा पिंड द्यावा.

**अथाचान्तान् दक्षिणया सन्तोष्यैकं तेषु गुणवन्तं विशेषतो वस्त्राभरणगोहिरण्यैः प्रेतबुद्ध्या तोषयेत् । अथ तैः पवित्रपाणिभिः प्रेताय काश्यपगोत्राय ते तिलोदकाञ्जलिरिति तिलोदकं दापयित्वा, अनेन नारायणबलिकर्मणा भगवान् विष्णुरिमं देवदत्तं शुद्धमपापमर्हं करोत्विति वाचयित्वा विसृजेत् । एष नारायणबलिकल्पः । एवमन्यामपि स्वाभिमतदेवतां यमद्वितीयायामभ्यर्च्य विधिमिमं कुर्यात् । सोऽप्येनमपापं करोति । न तु पुण्यकृतोऽपि बलिमेनमकृत्वा पारलौकिकं कुर्यात् । कृतं नोपातिष्ठतेऽन्तरिक्ष एव विनश्यति । तस्माद्यथासंभवमपि कुर्यादिति ।**

नंतर ब्राम्हणांनीं आचमन केल्यावर त्यांस दक्षिणा देऊन संतुष्ट करून त्यांतील एका गुणवान् ब्राम्हणास वस्त्र, अलंकार, गाय व सुवर्ण, प्रेतबुद्धीनें देऊन संतुष्ट करावा. नंतर हातांत पवित्र धारण केलेल्या अशा त्या ब्राह्मणांकडून ' **प्रेताय काश्यपगोत्राय ते तिलोदकाञ्जलिः** ' असें म्हणून तिलोदक देववावें, व " **अनेन नारायणबलिकर्मणा भगवान् विष्णुरिमं देवदत्तं शुद्धमपापमर्हं करोतु** " असें ब्राह्मणांनीं म्हटल्यानंतर त्यांचें विसर्जन करावें. **याप्रमाणें नारायणबलीचें विधान आहे.** आपल्या दुसऱ्या इष्टदेवतेचीही यमद्वितीयेच्या दिवशीं पूजा करून हा विधि करावा. त्या योगानेंही प्रेत पापरहित होतो. जरी प्रेतमनुष्य पुण्य करणारा असला तरी त्याची क्रिया नारायणबलि केल्याशिवाय करूं नये. केल्यास ती आकाशांतच नष्ट होऊन [प्रेतास] प्राप्त होत नाहीं. म्हणून संभव असेल त्या रीतीनें तरी [नारायणबलि] करावा. "

**अथ प्रयोगः । शुक्लैकादश्यां नदीतीरादिशुचिदेशे स्नानादिनित्यक्रियान्ते प्राणायामादितिथ्यादिसंकीर्तनान्ते मदीयकुलाभिवृद्धिप्रतिबन्धकप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्यर्थं नारायणबलिं करिष्ये इति संकल्प्य, कलशस्थापनविधिना स्थापितकलशद्वये सुवर्णादिजातीयप्रतिमयोः** ' विष्णुमावाहयामि । **वैवस्वतं यममा-**

वाहयामि' इत्यावाह्य । पुरुषसूक्तेन, यमायसोमंसुनुतेति च षोडशोपचारैः संपू तत्पूर्वभागे रेखायां दक्षिणाग्रकुशास्तरणान्ते, शुन्धन्तां विष्णुरूपीप्रेत इति दश नेषु दक्षिणसंस्थमपो निनीय, मधुघृततिलान् दश पिण्डान् सतिलान् काश्यपग चैत्रप्रेत विष्णुदैवतायं पिण्ड इति दक्षिणामुखः प्राचीनावीती दक्षिणाग्रेषु कु पराचीनपाणिना सव्यं जान्वाच्य विष्णुरूपं प्रेतं ध्यायन् दद्यात् । गन्धादि रभ्यर्च्य प्रवाहणान्तं कृत्वा नद्यादौ क्षिपेत् । तस्यामेव रात्रौ श्वः करिष्यम श्राद्धे क्षणः क्रियतामित्येवमेकं त्रीन् पञ्च वेत्येवमयुग्मान् ब्राह्मणान् श्राद्धोद्दे निमन्त्र्योपोषणं कुर्यात् ।

आतां प्रयोग [ सांगतों ] शुद्ध एकादशीस नदीचें तीर इत्यादि पवित्र ठिक स्नानादि नित्यकर्में केल्यानंतर प्राणायामादिक करून तिथि इत्यादिकांचा उ केल्यानंतर " मदीयकुलाभिवृद्धिप्रतिबन्धकप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्यर्थं नारायण करिष्ये" याप्रमाणें संकल्प करावा. नंतर यथाविधि स्थापन केलेल्या दोन कलश सुवर्णादिक धातूंच्या दोन प्रतिमा ठेवून " विष्णुमावाहयामि, वैवस्वतं यममाव यामि " अशा मंत्रांनीं त्या प्रतिमांवर विष्णु व यम यांचें आवाहन करून पुरुषसूक्त व 'यमायसोमं सुनुत०' या मंत्रानें त्यांची षोडशोपचार पूजा करावी. नंतर त्या पूर्वभागीं एक रेखा ( रेघ ) काढून तिजवर दक्षिणाग्र कुश पसरून त्यांवर ' शुन्ध विष्णुरूपी प्रेतः ' या मंत्रानें दहा ठिकाणीं दक्षिणसंस्थ उदक द्यावें. नंतर दक्षि तोंड करून अपसव्य करून विष्णुरूपी प्रेताचें ध्यान करीत; त्या दक्षिणाग्र कुश मध, तूप व तीळ यांनीं युक्त असे दहा पिंड, " काश्यपगोत्र चैत्रप्रेत विष्णुदैव पिण्डः " या मंत्रानें पराचीनहस्तानें डावा गुडघा जमीनीवर टेंकून द्यावे. पिंडांची गंधादिकांनीं पूजा करून प्रवाहणापर्यंत कर्म करून नदी इत्यादि पिंडांचें विसर्जन करावें. त्याच रात्रीं " श्वः करिष्यमाणश्राद्धे क्षणः क्रियताम् " म्हणून एक, तीन, किंवा पांच अशा विषम संख्येच्या ब्राम्हणांस श्राद्धाकरितां आ करून उपोषण करावें.

श्वोभूते मध्यान्हे विष्णुमभ्यर्च्य प्रेतं विष्णुरूपिणमुद्दिश्यैकोद्दिष्टवि पादप्रक्षालनादितृप्तिप्रश्नान्तं कृत्वा ब्राह्मणसमीपे पिण्डपितृयज्ञवदुल्लेखन वनेजनान्तं तूष्णीं कृत्वा, विष्णवे, ब्रह्मणे, शिवाय, सपरिवाराय यमाय च, मन्त्रैः चतुरः पिण्डान् दत्वा, विष्णोऽयं ते पिण्ड इति विष्णुरूपं प्रेतं ध्य

**पञ्चमं पिण्डं च दत्वार्चनादिप्रवाहणान्तं कृत्वा, आचान्तान् दक्षिणया सन्तोष्य, तेष्वेकस्मै गुणवते प्रेतबुद्धया वस्त्राभरणगोहिरण्यानि दत्वा ब्राह्मणान् वदेत् । भवन्तः प्रेताय तिलोदकाञ्जलिदानं कुर्वन्त्विति । ते च पवित्रपाणयः सकुशतिलतुलसीपत्रतोयाञ्जलिं प्रेताय देवदत्ताय काश्यपगोत्राय विष्णुरूपिणेऽयं तिलोदकाञ्जलिरिति दद्युः । ततो ब्राह्मणान्वाचयेत् । अनेन नारायणबलिकर्मणा भगवान् विष्णुरिमं देवदत्तं शुद्धमपापमर्हं करोत्विति । ततः स्नात्वा भुञ्जीत, इति परिशिष्टोक्तनारायणबलेः स्मृत्यर्थसारानुसारी प्रयोगः ।**

दुसरे दिवशीं मध्यान्हकालीं विष्णूची पूजा करून, विष्णुरूपी प्रेतास उद्देशून, एकोद्दिष्टविधीनें [ ब्राम्हणांच्या ] पादप्रक्षालनापासून तृप्तिप्रश्नापर्यंत कर्म करावें. नंतर ब्राम्हणांच्या जवळ पिंडपितृयज्ञांतील विधीप्रमाणें, उल्लेखनापासन ( दर्भानें रेघ ओढण्यापासून) पादप्रक्षालनापर्यंत कर्म तूष्णीं (मंत्ररहित) करून विष्णु, ब्रह्मा, शिव व सपरिवार यम यांस नाममंत्रांनीं चार पिंड देऊन विष्णुरूपी प्रेताचें ध्यान करीत ‘ **विष्णोऽयं ते पिण्डः** ’ असें म्हणून पांचवा पिंड द्यावा. नंतर पिंडपूजेपासून प्रवाहणान्त कर्म करून ब्राम्हणांनीं आचमन केल्यावर त्यांस दक्षिणा देऊन संतुष्ट करावे. त्यांपैकीं एका गुणवान् ब्राम्हणास प्रेतबुद्धीनें वस्त्र, अलंकार, गाय व सुवर्ण देऊन, “ **भवन्तः प्रेताय तिलोदकाञ्जलिदानं कुर्वन्तु** ” अशी ब्राम्हणांची प्रार्थना करावी. नंतर ब्राम्हणांनीं हातांत पवित्र घालून “ **प्रेताय देवदत्ताय काश्यपगोत्राय विष्णुरूपिणेऽयं तिलोदकाञ्जलिः** ” असें म्हणून ओंजळीनें कुश, तीळ व तुलसीपत्र यांनीं युक्त उदक द्यावें. नंतर [ यजमानानें ] ब्राम्हणांकडून “ **अनेन नारायणबलिकर्मणा भगवान् विष्णुरिमं देवदत्तं शुद्धमपापमर्हं करोतु** ” असें म्हणवावें. नंतर [ कर्त्यानें ] स्नान करून भोजन करावें. याप्रमाणें **परिशिष्टांत सांगितलेल्या नारायणबलीचा प्रयोग स्मृत्यर्थसारग्रंथाच्या अनुरोधानें** सांगितला.

**अथ नागबलिः । तत्र[1] शौनकः । अथ वक्ष्यामि सर्पस्य संस्कारविधिमुत्तमम् । सिनीवाल्यां पौर्णमास्यां कारयेद्विधिवत्ततः । कृतसर्पवधो विप्रः पूर्वजन्मनि वा यादि । स्नात्वागत्य ततो ब्रह्मदण्डं दद्यात् द्विजातये । वधं प्रख्यापयेच्चापि चरेत्कृच्छ्राँश्चतुर्दश । वधे ह जन्मनि कृते लोहदण्डं द्विजातये । दद्यात्पापविशुद्धयर्थं श्रोत्रियाय कुटुम्बिने । विप्राय दण्डमूल्यं वा ह्यभावे सति दापयेत् । स[2]र्पवधात्कर्मकर्तु-**

१ ख. ग. परिशिष्टे । २ च. साक्षाद्वधातक ।

रेतदेव प्रदापयेत् । निष्कत्रयं द्विनिष्कं वा निष्कमेकं कनीयसम् । अनुमत्यादिकर्तृणां निष्कमर्धंतदर्धकम् । वित्तशाठ्यं न कुर्वीत दद्याद्वित्तानुसारतः । अनुज्ञां च गुरोर्लब्ध्वा संस्कुर्यात्तदनन्तरम् । प्रियङ्गुव्रीहिगोधूमतिलपिष्टेन वाथवा । कृत्वा सर्पाकृतिं तेन नवशूर्पे निधाय च । अनेन वक्ष्यमाणेन मन्त्रेण प्रार्थयेदहिम् ।

आतां नागबलि [ सांगतों ] त्याविषयीं शौनकः—" आतां सर्पसंस्कार करण्याचें उत्तम विधान सांगतों. तें विधान सिनीवाली, ( चतुर्दशीयुक्त अमावास्या ) किंवा पूर्णिमा या दिवशीं यथाशास्त्र करावें. ब्राम्हणानें [ या जन्मीं ] किंवा पूर्वजन्मीं सर्पाचा वध केला असल्यास त्यानें स्नान करून येऊन ब्राम्हणांस ब्रम्हदंडाबद्दल द्रव्य देऊन [ सर्पाचा ] वध केल्याचें सांगावें. नंतर चवदा कृच्छ्रें प्रायश्चित्त करावें. सर्पवध केला असल्यास त्याचें पातक दूर होण्याकरितां श्रोत्रिय व कुटुंबवत्सल अशा ब्राम्हणास लोहाचा दंड, ( काठी ) द्यावा. तो नसल्यास त्याची किंमत द्यावी. कर्त्यानें सर्पवधाबद्दल तीन, दोन किंवा निदान एक निष्क [ चार रुपये ] [ दाक्षिणेबद्दल ] द्यावा. ज्यांनीं सर्पवध करण्याविषयीं अनुमोदन वगैरे दिलें असेल त्यांनीं एक, अर्धा किंवा पाव निष्क द्यावा. द्रव्याविषयीं कृपणपणा न करितां, द्रव्य असेल त्या मानानें द्यावें. नंतर गुरूची आज्ञा घेऊन सर्पसंस्कार करावा. राळे, तांदूळ, गहूं किंवा तीळ यांच्या पिठानें सर्पाची आकृति करून [ तो सर्प ] नव्या सुपांत ठेवून पुढील मंत्रानें सर्पाची प्रार्थना करावी.

एहि पूर्वं मृत सर्प अस्मिन् पिष्टे समाविश । संस्कारार्थमहं भक्त्या प्रार्थयामि समाहितः । वस्त्रोपवीतगन्धाद्यैरक्षतैः कुसुमादिभिः । कर्ता पुष्पाञ्जलिं दत्वा प्रणिपत्य हरेद्बलिम् । प्रक्षालिताङ्घ्रिपाणिस्तु ह्याचम्योपविशेद्भुवि । कुर्यात्संस्कारसंकल्पं प्राणायामपुरःसरम् । यज्ञोपवीतिना कार्यं सर्पसंस्कारकर्म तु । लौकिकाग्निं प्रतिष्ठाप्य समिदाधानमाचरेत् । ततोऽग्नेरग्निदिग्भागे भूमिं संप्रोक्ष्य वारिभिः । चितिं कृत्वाथ संस्तीर्य कुशैराग्नेयकाग्रकैः । पर्युक्ष्याग्निं परिस्तीर्य परिषिच्य समर्चयेत् । कृत्वेध्माधानपर्यन्तं षट्पात्रासादनादिकम् । आघारचक्षुषी हुत्वा सर्पिषा च यथाविधि ।

तो मंत्र असाः—"एहि पूर्वं मृत सर्प अस्मिन् पिष्टे समाविश । संस्कारार्थमहं भक्त्या प्रार्थयामि समाहितः" नंतर कर्त्यानें वस्त्र, यज्ञोपवीत, चंदन, अक्षता व पुष्पें

इत्यादिकांनीं [ सर्पाची पूजा करून ] पुष्पांजलि देऊन नमस्कार करून बलि द्यावा. नंतर हातपाय धुवून भमीवर बसून आचमन व प्राणायाम करून संस्काराचा संकल्प करावा. सर्पसंस्कार सव्यानेंच करावा. लौकिक अग्नि स्थापन करून अन्वाधान करावें. नंतर अग्नीच्या आग्नेयी दिशेस भूमीवर पाणी शिंपडून तिजवर चिता करून, ज्यांचीं अग्र आग्नेयीदिशेस आहेत असे कुश पसरून, अग्नीचें पर्युक्षण, परिस्तरण व परिषेचन करून पूजा करावी. नंतर सहा पात्रांच्या आसादनापासून इध्माधानापर्यंत कर्म करून तुपानें यथाविधि आघार व चक्षुषी द्याव्या.

**सर्पं गृहीत्वा यत्नेन चितिमारोपयेत्सुधीः। अपः स्पृष्ट्वा स्पृशेच्छ्रोत्रं गत्वा चाग्निसमीपतः। स्रुवेण जुहुयादाज्यमग्नौ व्याहृतिभिस्त्रिभिः। सर्पास्ये जुहुयादाज्यं व्याहृत्या च समस्तया। आज्यशेषं स्रुवेणैव सर्पदेहे निषेचयेत्। स्रुवं तत्र निधायाथ यज्ञपात्राणि बर्हिषि। चितिं प्रदक्षिणं कृत्वा प्रणिपत्य क्षमापयेत्। चमसस्थैर्जलैः सर्पं व्याहृत्याभ्युक्ष्य पाणिना। अग्नेरक्षाण इत्यनया सर्पायाग्निं प्रदापयेत्। उपतिष्ठेद्दह्यमानं नमो अस्तु सर्पेति मन्त्रतः**

नंतर बुद्धिमान् मनुष्यानें तो सर्प घेऊन चितेवर ठेवून उदक स्पर्श करून कानास हात लावावा. नंतर अग्नीच्या जवळ जाऊन, तीन [व्यस्त] व्याहृतींनीं स्रुव्यानें अग्नींत घृताचा होम करावा व सर्पाच्या मुखांत समस्तव्याहृतीनें आज्याहुती द्यावी आणि बाकी राहिलेलें तूप स्रुव्यानें सर्पाच्या देहावर शिंपडावें. नंतर स्रुवा व यज्ञपात्रें बर्हीवर ठेवून चितेस प्रदक्षिणा व नमस्कार करून क्षमा मागावी. व चमसांतील उदक व्याहृतिमंत्राचा उच्चार करून हातानें सर्पावर शिंपडावें. नंतर 'अग्नेरक्षाण०' या ऋचेनें सर्पास अग्नि द्यावा. सर्पाच्या दहनकालीं '**नमो अस्तु सर्पेभ्यः०**' इत्यादि मंत्रानें उपस्थान करावें.

**ज्ञानतोऽज्ञानतो वापि कृतः सर्पवधो मया। पूर्वजन्मनि वा सर्प तत्सर्वं क्षमयस्व मे। इति संप्रार्थ्य नागेन्द्रं स्नात्वागत्य पुनः पुनः। क्षीराज्येन ततश्चाग्निं प्रोक्ष्य व्याहृतिभिस्त्रिभिः। हुते सर्पे जलेनाग्निमभिषिञ्चेत्ततः परम्। नास्थिसंचयनं कुर्यात्स्नात्वाचम्य गृहं व्रजेत्। ब्रह्मचर्यादिकं कार्यं त्रिरात्राच्छुद्धिरिष्यते। चतुर्थेऽहनि संप्राप्ते सचैलं स्नानमाचरेत्। घृतपायसभक्षैश्च द्विजानष्टौ तु भोजयेत्। कर्ता नामपदैर्विप्रानर्चयेद्वक्ष्यमाणकैः। सर्पोऽनन्तस्तथा शेषः कपिलो नाग एव च। कालिकः शङ्खपालश्च भूधरश्च प्रकीर्तितः। पादप्रक्षालनं**

**कुर्यादेभिर्नामपदैः पृथक् । गन्धपुष्पाक्षतैर्धूपदीपाद्यैरर्चयेत् द्विजान् । एवं कृते विधाने वै सर्पसंस्कारकर्मणि । सर्पहिंसाकृतात्पापान्मुच्यते नात्र संशयः । कुष्ठव्याध्यादिभिर्मुक्तः सर्वथा भेषजं त्विदम् । आयुरारोग्यमैश्वर्यं प्राप्य कामानवाप्नुयादिति ।**

नंतर " **ज्ञानतोऽज्ञानतो वापि कृतः सर्पवधो मया । पूर्वजन्मनि वा सर्प तत्सर्वं क्षमयस्व मे** " याप्रमाणें सर्पाची वारंवार प्रार्थना करून, स्नान करून येऊन नंतर तीन व्याहृतींचा उच्चार करून तूप व दूध यांनीं अग्नीचें प्रोक्षण करावें. सर्पाचें दहन झाल्यानंतर चितेवर पाणी टाकावें. अस्थिसंचयन करूं नये. नंतर स्नान व आचमन करून घरीं जावें आणि ब्रह्मचर्यादि नियम धारण करून तीन दिवस आशौच धरावें. चवथ्यादिवशीं सचैल स्नान करून घृत व पायस इत्यादिकांनीं आठ ब्राह्मणांस भोजन घालावें व पुढील आठ नांवांचा उच्चार करून ब्राह्मणांची पूजा करावी. तीं नांवें:—' १ सर्प, २ अनंत, ३ शेष, ४ कपिल, ५ नाग, ६ कालिक, ७ शंखपाल, ८ भूधर.' याचप्रमाणें [आठ] नांवांनीं [आठ ब्राह्मणांचें ] वेगवेगळें पादप्रक्षालन करावें व गंध, अक्षता, पुष्प, धूप, दीप, इत्यादिकांनीं पूजा करावी. याप्रमाणें सर्पसंस्काराचा विधि केला असतां सर्प वधामुळें झालेल्या पापापासून मुक्त होतो यांत संशय नाहीं. तसाच कुष्टादिव्याधींपासूनही मुक्त होतो. कारण हें कर्म [व्याधींपासून मुक्त होण्यास] औषधरूपी आहे. तसेंच आयुष्य, आरोग्य, ऐश्वर्य हीं मिळून, इच्छित फलप्राप्ति होते. "

**अथ नागबलिसंस्कारप्रयोगः । स तु सिनीवाल्यां पौर्णमास्यां पञ्चम्यामाश्लेषायुक्तनवम्यां वा कार्यः । पर्षदं प्रदक्षिणीकृत्य नत्वा तदग्रे निष्कं तदर्द्धं वा विधाय, ममेह जन्मनि जन्मान्तरे वा ज्ञानादज्ञानाद्वा जातसर्पवधदोषपरिहारार्थं प्रायश्चित्तमुपदिशन्तु भवन्तः । तद्यथा 'सर्वे धर्मविवेक्तारः०' इति श्लोकान्पठित्वा मामनुगृण्हन्तु भवन्त इति प्रणमेत् । तैरुपादिष्टः चतुर्दशकृच्छ्रप्रायश्चित्तं यथोक्तप्रत्याम्नायेन करिष्ये इति संकल्पपूर्वकं वपनादिविधिना तदाचरेत् ।**

आतां **नागबलि संस्काराचा प्रयोग** [सांगतों.] हा संस्कार सिनीवाली, पूर्णिमा, पंचमी, किंवा आश्लेषायुक्त नवमी या दिवशीं करावा. [ब्राम्हणांच्या] सभेस नमस्कार करून त्यांच्यापुढें निष्क किंवा अर्धा निष्क ठेवून, माझ्या हातून या जन्मीं किंवा

जन्मांतरीं जाणून अगर न जाणतां झालेल्या सर्पवधाच्या दोषाचा परिहार होण्याकरितां आपण प्रायश्चित्त सांगावें. अशी त्यांची प्रार्थना करून, **'सर्वे धर्मविवेक्तारः'** इत्यादि श्लोक म्हटल्यावर **' मामनुगृण्हन्तु भवन्तः '** असें म्हणून नमस्कार करावा. त्यांनीं ( ब्राम्हणांनीं ) आज्ञा दिल्यावर **' चतुर्दशकृच्छ्रप्रायश्चित्तं यथोक्तप्रत्याम्नायेन करिष्ये '** असा संकल्प करून क्षौरविधिपूर्वक प्रायश्चित्त करावें.

**ततो ब्राह्मणं संपूज्य, पूर्वोच्चरितएवंगुणविशेषेण विशिष्टायां पुण्यतिथौ मम सर्पवधदोषपरिहारार्थं इमं लोहदण्डं अमुकगोत्रायामुकशर्मणे ब्राह्मणाय इमां दक्षिणां च तुभ्यमहं संप्रददे प्रतिगृह्यताम् । देवस्यत्वासवितुः० प्रतिगृण्हामीति विप्रः । ततो गुर्वाज्ञां लब्ध्वा प्रियङ्गुव्रीहिगोधूमतिलपिष्टेषु एकतमपिष्टेन सर्पाकृतिं कृत्वा शूर्पे निधाय, सर्पं प्रार्थयेत् । एहि पूर्वं मृत सर्प ह्यस्मिन् पिष्टे समाविश । संस्कारार्थमहं भक्त्या प्रार्थयामि समाहितः । ततः 'भुजङ्गेशाय विद्महे सर्पराजाय धीमहि । तन्नो नागः प्रचोदयात् ' इति आवाहनादिषोडशोपचारपूजां कृत्वा पुष्पाञ्जलिं दत्वा प्रणिपत्य, 'भो सर्पेमं बालिं गृहाण, ममाभ्युदयं कुरु' इति बलिं समर्प्य । हस्तौ पादौ प्रक्षाल्याचामेत् ।**

नंतर ब्राह्मणांची पूजा करून **पूर्वोच्चरितएवंगुणविशेषेण विशिष्टायां पुण्यतिथौ मम सर्पवधदोषपरिहारार्थं इमं लोहदण्डं अमुकगोत्राय अमुकशर्मणे ब्राह्मणाय इमां दक्षिणां च तुभ्यमहं संप्रददे प्रतिगृह्यताम्"** असें म्हणावें. ब्राह्मणानें **' देवस्यत्वासवितुः० प्रतिगृण्हामि '** हा मंत्र म्हणावा. नंतर आचार्याची आज्ञा घेऊन, राळे, तांदूळ, गहूं व तीळ यांपैकीं कोणत्या तरी धान्याच्या पिठाचा सर्प करून तो सुपांत ठेवून त्याची प्रार्थना करावी. ती अशीः—**"एहि पूर्वं मृत सर्प ह्यस्मिन् पिष्टे समाविश । संस्कारार्थमहं भक्त्या प्रार्थयामि समाहितः"** नंतर **"भुजङ्गेशाय विद्महे सर्पराजाय धीमहि । तन्नो नागः प्रचोदयात् "** या मंत्रानें आवाहनादि षोडशोपचार पूजा करून पुष्पांजलि देऊन नमस्कार करून **' भो सर्प इमं बलिं गृहाण, ममाभ्युदयं कुरु '** असें म्हणून बली दिल्यावर हातपाय धुवून आचमन करावें.

**शुद्धभूमौ स्थित्वा प्राणानायम्य संकल्पं कुर्यात् । ममेह जन्मनि जन्मान्तरे वा ज्ञानादज्ञानाद्वा जातसर्पवधोत्थदोषपरिहारार्थं सर्पसंस्कारकर्म करिष्ये ।**

**ततो लौकिकाग्निं प्रतिष्ठाप्यान्वादध्यात् । अस्मिन् सर्पसंस्कारहोमकर्मणि देवतापरिग्रहार्थमन्वाधानं करिष्ये । अस्मिन्नन्वाहितेऽग्नावित्याद्याघारचक्षुष्यन्तमुक्त्वा, अत्र प्रधानं, अग्निं, वायुं, सूर्यं, एताः प्रधानदेवता आज्येन, भूर्भुवःस्वरिति सर्पमुखे प्रजापतिमाज्येन, आज्यशेषेण सर्पं सद्यो यक्ष्ये । समिधमाधाय, ततोऽग्नेरग्निदिशि भूमौ जलेन प्रोक्ष्य, चितिं कृत्वा, अग्निं चितिं च परिसमूह्य, आग्नेय्याग्रकैर्दर्भैः पिण्डपितृयज्ञवत्परिस्तीर्य, परिषिच्य, षट् पात्राण्यासाद्य, इध्माधानाद्याघारचक्षुष्यन्तं कुर्यात् । ततः सर्पं गृहीत्वा चित्यामारोप्य, अपः स्पृष्ट्वा अग्निसमीपमेत्य ततः प्रधानहोमः ।**

नंतर शुद्ध भूमीवर बसून प्राणायाम करून संकल्प करावा. तो असाः—**ममेह जन्मनि जन्मान्तरे वा ज्ञानादज्ञानाद्वा जातसर्पवधोत्थदोषपरिहारार्थं सर्पसंस्कारकर्म करिष्ये** " नंतर लौकिकाग्नि स्थापन करून अन्वाधान करावें. तें असेंः—" **अस्मिन्सर्पसंस्कारहोमकर्मणि देवतापरिग्रहार्थमन्वाधानं करिष्ये । अस्मिन्नन्वाहितेऽग्नौ जातवेद० चक्षुषी आज्येन, अत्र प्रधानं, अग्निं, वायुं, सूर्यं, एताः प्रधानदेवता आज्येन, भूर्भुवःस्वरिति सर्पमुखे प्रजापतिमाज्येन, आज्यशेषेण सर्पं सद्यो यक्ष्ये.** " नंतर समिध देऊन अग्नीच्या आग्नेयी दिशेस भूमीवर उदक शिंपडून चिता करून तिच्या भोंवतीं परिसमूहन करून, पिंडपितृयज्ञांत सांगितल्याप्रमाणें आग्नेयी दिशेस अग्रें होतील अशा रीतीनें परिस्तरण करून, पर्युक्षण करावें. नंतर सहा पात्रें मांडून इध्माधानापासून आघारचक्षुषीपर्यंत कर्म करावें, नंतर सर्पास चितेवर ठेवून जलस्पर्श करून अग्नीजवळ यावें व प्रधानहोम करावा.

**व्यस्तसमस्तव्याहृतीनां विश्वामित्रजमदग्निभरद्वाजप्रजापतय ऋषयः । अग्निवायुसूर्यप्रजापतयो देवताः । गायत्र्युष्णिगनुष्टुब्बृहत्यश्छंदांसि । आज्यहोमे वि० । ॐ भूः स्वाहा । अग्नय इदं न ममेत्यादिव्याहृतित्रयमग्नौ जुहुयात् । चतुर्थीं सर्पमुखे जुहुयात् । आज्यशेषं स्रुवेणैव सर्पदेहे निषेचयेत् । ततो हस्तगृहीतैश्चमसजलैः समस्तव्याहृत्या पाणिनाभ्युक्ष्य, अग्नेरक्षाणो वसिष्ठोऽग्निर्गायत्री । सर्पायाग्निप्रदाने विनि० । ॐ अग्नेरक्षाणोअंहसः० १ । तत उपस्थानम् । ॐ नमोअस्तुसर्पेभ्योयेकेचपृथिवीमनु । येअन्तरिक्षेयेदिवितेभ्यःसर्पेभ्योनमः । येदोरोचनेदिवोयेवासूर्यस्यरश्मिषु । येषामप्सुसदःकृतंतेभ्यःसर्पेभ्यो०। याइषवोयातुधानानांयेवावनस्पतीँ॥रनु । येवावटेषुशेरतेतेभ्यःसर्पेभ्यो नमः ।**

तो असाः—" **व्यस्तसमस्तव्याहृतीनां विश्वामित्रजमदग्निभरद्वाजप्रजापतय ऋषयः, अग्निवायुसूर्यप्रजापतयो देवताः, गायत्र्युष्णिगनुष्टुब्बृहत्यश्छंदांसि, आज्यहोमे विनियोगः** " ' **ॐ भूः स्वाहा। अग्नय इदं न मम** ' याप्रमाणें तीन व्याहृतींनीं अग्नींत होम करावा. चौथी आहुती सर्पाच्या मुखांत द्यावी. राहिलेलें तूप स्रुव्यानें सर्पाच्या देहावर शिंपडावें. नंतर हातांत घेतलेल्या चमसांतील उदकानें समस्तव्याहृतींचा उच्चार करून ( सर्पावर ) सेचन करून [ पुढील मंत्रानें अग्नि द्यावा. तो मंत्रः—**अग्नेरक्षाणो वसिष्ठोऽग्निर्गायत्री। सर्पायाग्निप्रदाने विनि०। ॐ अग्नेरक्षाणो अंहसः०** १. नंतर उपस्थान करावें. तें असेंः—" **नमोअस्तुसर्पेभ्यो० तेभ्यः सर्पेभ्यो नमः** [ हे वैदिक मंत्र होत. ]

अथ **पौराणमन्त्राः**। "**ककोंटक नमस्तेऽस्तु शङ्खपाल नमोऽस्तु ते। नागराज महादेव तव रूपाणि ते नमः। अफणाः फणिनो ये च सविषा निर्विषाश्च ये। सर्वे सर्पा वटे शय्याः पुण्यमूर्ते नमोऽस्तु ते। त्वयेयं जगती स्वामिन् स्वफणामण्डलोपरि। धृतैकदेशे ह्यणुवत्तस्मै तुभ्यं नमोऽस्तु ते। त्वया भगवते श्रीमद्वासुदेवाय निर्मितम्। स्वभोगेनैव पर्यङ्कमायतं भोगिनां वर। त्राहि त्राहि महाभोगिन् सर्पोपद्रवदुःखतः। सन्ततिं देहि मे पुण्यां निर्दुष्टां दीर्घदेहिनीम्। प्रपन्नं पाहि मां भक्त्या कृपालो दीनवत्सल। ज्ञानतोऽज्ञानतो वापि कृतः सर्पवधो मया। जन्मान्तरे तथैतस्मिन्मत्पूर्वैरथवा विभो। तत्पापं नाशय क्षिप्रमपराधं क्षमस्व मे"। इति संप्रार्थ्य नागेन्द्रं स्नात्वागत्य ततः पुनः। क्षीराज्येनाग्निं संप्रोक्ष्य ततो व्याहृतिभिस्त्रिभिः। हुते सर्पे जलेनाग्निमभिषिञ्चेत्ततः परम्। नास्थिसंचयनं कुर्यात्स्नात्वाचम्य गृहं व्रजेत्। ब्रह्मचर्यादिकं कार्यं त्रिरात्राच्छुद्धिरिष्यते " इति शौनकः। बौधायनमते तु एकरात्राशौचम्। अत्र कर्तुरेवाशौचम्। अशौचं पिण्डदः कुर्यान्न तु तद्बन्धुगोत्रजा इति वचनात्। चतुर्थेऽहनि संप्राप्ते सचैलं स्नानमाचरेत्। घृतपायसभक्षैस्तुद्विजानष्टौ तु भोजयेत्।**

आतां **पुराणोक्त मंत्रः—"ककोंटक नमस्तेऽस्तु० अपराधं क्षमस्व मे"** याप्रमाणें सर्पाची प्रार्थना करून स्नान करून येऊन तीन व्याहृतींचा उच्चार करून दूध व तूप यांनीं अग्नीचें प्रोक्षण करावें. सर्पाचें दहन झाल्यानंतर चितेवर पाणी शिंपडावें. अस्थिसंचयन करूं नये. नंतर स्नान व आचमन करून घरीं जावें. ब्रम्हचर्यादि नियम धारण करून तीन दिवस अशौच धरावें. याप्रमाणें **शौनकाचें** मत आहे. **बौधायनाचें**

मत एकरात्रच अशौच धरावें असें आहे. या कर्मांत कर्त्यासच अशौच आहे. का
पिंड देणाऱ्यानेंच अशौच धरावें, त्याच्या बांधवांनीं किंवा गोत्रजांनीं धरूं
असें वचन आहे. चवथ्या दिवशीं सचैल स्नान करून घृत पायस इत्यादिकांनीं
ब्राम्हणांस भोजन घालावें.

**कर्ता नामपदैर्विप्रानर्चयेद्वक्ष्यमाणकैः। सर्पस्वरूपिणे ब्राह्मणाय इदं ते
द्यम्। अनन्तस्वरूपिणे०। शेषस्वरूपिणे०। कपिलस्व०। नागस्वरू०। कालि
स्वरू०। शङ्खपालस्वरू०। भूधरस्व०। इति पादौ प्रक्षाल्याचम्य। ततो भू
स्वरिदमासनं आस्यताम्। सर्पस्थाने क्षणः क्रियताम्। ॐ तथा प्राप्नोतु भव
प्राप्नवानि। एवं शेषादिभ्यः। भो सर्पस्वरूप इदं गन्धम्। एवं पुष्पधूप
वस्त्रादिदानम्। एवं शेषादीनामपि गन्धादिदानम्। सर्पाय इदमन्नं परि
परिवेक्ष्यमाणं चातृप्तेर्दास्यमानं स्वाहा संपद्यन्ताम्। इदं न मम। एवं शेष
भ्योप्यन्नदानम्। आचान्तेषु विप्रेषु सर्पादिनाममन्त्रैर्बलिदानम्। वस्त्रादि
कार्या। ततो ब्राह्मणानां ताम्बूलसुवर्णादिदक्षिणादानं च। तत आचार्य
पूजयित्वा सुवर्णनागदानं कार्यम्। " इति सर्पस्य संस्कारं कृत्वा नाग
ततः। दत्वा स्वर्णमयं नागमपराधात्प्रमुच्यत " इति वचनात्।**

[नंतर] कर्त्यानें पुढील सांगितलेल्या नांवांनीं ब्राम्हणांची पूजा करावी " **सर्प
पिणे ब्राह्मणाय इदं ते पाद्यम्। अनन्तस्वरूपिणे०। शेषस्वरूपिणे०। कपिल
पिणे०। नागस्वरूपिणे०। कालिकस्वरू०। शंखपालस्वरूपिणे०। भूधरस्व**
असें म्हणून पादप्रक्षालन करून आचमन करावें. नंतर " **भूर्भुवःस्वरिदम
आस्यताम्। सर्पस्थाने क्षणः क्रियताम्। ॐ तथा प्राप्नोतु भवान्। प्राप्नव**
[ याप्रमाणें आसन व क्षण द्यावा. ] याप्रमाणें शेषादिकांसही द्यावा.
**सर्पस्वरूप इदं गन्धं** " याप्रमाणें पुष्प, धूप, दीप व वस्त्र वगैरे द्यावें. याप्र
शेषादिकांनाही गंध वगैरे द्यावें. नंतर " **सर्पाय इदमन्नं परिविष्टं परिवेक्ष
चातृप्तेर्दास्यमानं स्वाहा संपद्यन्ताम् इदं न मम** " [याप्रमाणें अन्न निवेदन क
याप्रमाणें शेषादिकांनाही अन्न निवेदन करावें. ब्राम्हणांनीं भोजन करून
मन केल्यावर सर्पादि नाममंत्रांनीं बलिदान व वस्त्रादिक पूजा
नंतर ब्राम्हणांस तांबूल व सुवर्णादि दक्षिणा द्यावी. नंतर आचार्य इत्यादि

१ ख. ग. अनन्तादि। २ ख. ग. अनन्तादीनां।

पूजा करून सुवर्णाच्या नागाचें दान करावें. कारण " याप्रमाणें सर्पसंस्काररूप नागबलि करून सुवर्णाचा नाग दिला असतां अपराधापासून मुक्त होतो " असें वचन आहे.

ततः कलशे स्वर्णनागमावाहनादिषोडशोपचारैः संपूज्य प्रार्थयेत् । ब्रह्मलोके च ये सर्पाः शेषनागपुरोगमाः । नमोऽस्तु तेभ्यः सुप्रीताः प्रसन्नाः सन्तु मे सदा । विष्णुलोके च ये सर्पा वासुकिप्रमुखाश्च ये । नमोऽस्तु तेभ्यः सुप्रीताः प्रसन्नाः सन्तु मे सदा । रुद्रलोके च ये सर्पास्तक्षकप्रमुखास्तथा । नमोऽस्तु तेभ्यः० । खाण्डवस्य तथा दाहे स्वर्गे ये च समाश्रिताः । नमोऽस्तु तेभ्यः० । सर्पसत्रे च ये सर्पा आस्तिकेन च रक्षिताः । नमोऽस्तु तेभ्यः० । मलये चैव ये सर्पाः कर्कोटप्रमुखाश्च ये । नमोऽस्तु तेभ्यः० । धर्मलोके च ये सर्पा वैतरण्यां समाश्रिताः । नमोऽस्तु तेभ्यः० । समुद्रे चैव ये सर्पा वैतरण्यां समाश्रिताः । नमोऽस्तु तेभ्यः० । ये सर्पाः पार्वतीयेषु दरीसन्धिषु संस्थिताः । नमोऽस्तु तेभ्यः० । ग्रामे वा यदि वारण्ये ये सर्पाः प्रचरन्ति हि । नमोस्तु० । पृथिव्यां चैव ये सर्पा ये सर्पा बिलसंस्थिताः । नमोऽस्तु तेभ्यः० । रसातले च ये सर्पा अनन्ताद्या महाबलाः । नमोऽस्तु० । एवं स्तुत्वा तु नागेन्द्रमाचार्याय निवेदयेत् । देशकालौ संकीर्त्य कृतस्य सर्पसंस्कारकर्मणः साङ्गतासिद्ध्यर्थं इमं हेममयं नागं सकलशं सवस्त्रं सदक्षिणं तुभ्यमहं संप्रददे न मम । अनेन स्वर्णनागदानेन अनन्तादयो नागदेवताः प्रीयन्ताम् । तत आचार्याय गोदानं देयम् । इमां गां सवत्सां स्वर्णशृङ्गीं रौप्यखुरीं ताम्रपृष्ठीं कांस्यदोहां सवस्त्रां सदक्षिणां तुभ्यमहं संप्रददे । अनेनानन्तादयः प्रीयन्ताम् ।

नंतर कलशावर सुवर्णाच्या नागाची आवाहनादि षोडशोपचार पूजा करून प्रार्थना करावी. "ब्रह्मलोके च ये सर्पाः० सन्तु मे सदा" याप्रमाणें नागेंद्राचें स्तवन करून तो नाग आचार्यास द्यावा. देशकालांचा उच्चार करून (अद्य ब्रम्हणो द्वितीय० इत्यादि म्हणून ) " कृतस्य सर्पसंस्कारकर्मणः साङ्गतासिद्ध्यर्थं इमं हेममयं नागं सकलशं सवस्त्रं सदक्षिणं तुभ्यमहं संप्रददे न मम । अनेन स्वर्णनागदानेन अनन्तादयो नागदेवताः प्रीयन्ताम् [ असें म्हणून नाग द्यावा. ] नंतर आचार्यास गोप्रदान करावें. त्याचा संकल्पः—" इमां गां सवत्सां स्वर्णशृंगीं रौप्यखुरीं ताम्रपृष्ठीं कांस्यदोहां सवस्त्रां सदक्षिणां तुभ्यमहं संप्रददे । अनेनानन्तादयः प्रीयन्ताम् "

**आचार्याय ततो दद्यात् कृष्णां गां वृषभेण हि। वस्त्रालंकरणैः पूज्य ब्राह्मणं ब्राह्मणीं तथा। यस्य स्मृत्या च नामोक्त्येति०। मया यत्कृतं सर्पसंस्काराख्यं कर्म तद्भवतां ब्राह्मणानां वचनात् श्रीपरमेश्वरप्रसादात्सर्वं परिपूर्णमस्तु। तथास्त्विति ते ब्रूयुः। पूजयेद्विधिवद्भक्त्या ब्राह्मणांश्चैव तोषयेत्। कृत्वा सर्पस्य संस्कारमनेन विधिना नरः। विरोगो जायते क्षिप्रं सन्ततिं लभते शुभाम्। सर्पोपद्रवनिर्मुक्तो भवेत्सर्पप्रसादतः। ततः पूर्वकृतं कर्म याति नाशं महामते। क्षीणपापो विशुद्धात्मा विष्णुलोके महीयते। ततः साङ्गतासिद्ध्यर्थं ब्राह्मणभोजनं कार्यम्। इति नागबलिविधानं समाप्तम्। एवं नागबलिं कृत्वाऽजातौर्ध्वदेहिकतया निर्णीतस्य तत्कार्यं, गयाश्राद्धं च। अतादृशस्य गयाश्राद्धमेव कार्यम्।**

[ गोप्रदान करण्याविषयीं वचन ] " नंतर वस्त्रालंकारांनीं आचार्य व आचार्यपत्नी यांची पूजा करून आचार्यास वृषभानें युक्त ( जिचा बालवत्स वृषभ आहे ) अशी कपिला गाय द्यावी. " " **यस्य स्मृत्या च०। मया यत्कृतं सर्पसंस्काराख्यं कर्म तद्भवतां ब्राम्हणानां वचनात् श्रीपरमेश्वरप्रसादात्सर्वं परिपूर्णमस्तु.** " [ असें यजमानानें म्हटल्यावर ] ब्राम्हणांनीं '**तथास्तु**' असें म्हणावें. ब्राम्हणांची भक्तीनें यथाविधि पूजा करून त्यांस संतुष्ट करावें. मनुष्यानें याप्रमाणें विधि करून सर्पसंस्कार केला असतां तो मनुष्य रोगहीन होऊन त्यास चांगली संतति प्राप्त होते. व सर्पाच्या प्रसादानें तो उपद्रवापासून मुक्त होतो. नंतर पूर्वीं केलेलें कर्म (सर्पवधरूप ) नाश पावल्यामुळें त्या मनुष्याचें पातक क्षीण होतें व तो शुद्ध होऊन विष्णुलोकास जातो. नंतर सांगतासिद्धि होण्याकरितां ब्राम्हणभोजन करावें. **याप्रमाणें नागबलीचें विधान समाप्त झालें.** याप्रमाणें नागबलि करून ज्याचें और्ध्वदेहिक (उत्तरकार्य) झालें नसेल त्याचें तें करून मग गयाश्राद्ध करावें. और्ध्वदेहिक झालें असल्यास फक्त गयाश्राद्धच करावें.

**एवमपि फलासिद्धौ महार्णवोक्तो विधिः कार्यः। स यथा। वायुपुराणे। 'चतुर्विधा च या वन्ध्या भवेद्दृत्सवियोजनात्। वक्ष्ये तस्याः प्रतीकारं तत्स्वरूपं निबोधय। हिरण्येन यथाशक्त्या सवत्सां कारयेत् दृढाम्। धेनुं पलेन वत्सं च पादेन गुरुरब्रवीत्। हिरण्येन यथाशक्त्येति। पलेन वा तदर्धेन तदर्धेनापि वा पुनरितिपरिभाषोक्तप्रकारेण कुर्यादित्यर्थः। धेनुं रौप्यखुरां रत्नं तस्याः पुच्छे नियोजयेत्। घण्टां गले निबध्नीयात्सवत्सां प्राङ्मुखः सुधीः। चन्दनागरुकर्पूर-**

**गन्धमाल्यैः सुशोभनैः। उपचारैः षोडशभिर्नैवेद्यं पायसं भवेत्। मोदकं च तथापूपं गुडं लवणमेव च। जीरकं च सुविस्तीर्णे शूर्पे वेणुमये दृढे। धेनोरेकं प्रदातव्यं ब्राह्मणस्त्रीषु चैव हि। षडष्टौ दश वा दद्यात्तदनन्तरमेव च। 'उपचारैः षोडशभिः' पूजयेदिति शेषः। मोदकादिभिः परिपूरितमेकं शूर्पं धेनोः स्थापयित्वोक्तद्रव्यपूरितान्येव शूर्पाणि षडष्टौ दश वा सभर्तृकाभ्यो ब्राह्मणीभ्यो दद्यादित्यर्थः। 'ब्राह्मणं सर्वशास्त्रार्थकुशलं धर्मवेदिनम्। विद्याविनयसंपन्नं शान्तं चैव जितेन्द्रियम्। अलोलुपं सर्वजनप्रियं कल्मषवर्जितम्। आहूय भक्त्या संपूज्य वस्त्राद्यैर्गन्धपुष्पकैः। तेनैव कारयेत्पूजामादितो धेनुवत्सयोः। होमं च कारयेत्तत्र समिदाज्यचरूत्कटम्'।**

याप्रमाणें करूनही फलसिद्धि होत नसल्यास **महार्णवग्रंथांत** सांगितलेला विधि करावा. तो असाः—**वायुपुराणांत**ः—" [ गाईचा ] वत्साशीं वियोग केला असतां जी चार प्रकारची वंध्या होते. तिचा प्रतीकार सांगतों तो श्रवण कर. सोन्याची यथाशक्ति सवत्स गाय करावी. पलभार सुवर्णाची धेनु व त्याच्या चतुर्थांशानें वत्स करावा, याप्रमाणें **बृहस्पति** म्हणतो." '**यथाशक्ति**' असें म्हटल्यानें पलाची किंवा अर्ध्या पलाची किंवा पाव पलाची अशा रीतीनें परिभाषेंत सांगितल्याप्रमाणें धेनु करावी असा अर्थ होतो. "गाईचे खुर रुप्याचे करून तिच्या पुच्छाचे ठिकाणीं रत्नाची योजना करावी व गळ्यांत घांट बांधावी. नंतर सुज्ञमनुष्यानें पूर्वाभिमुख होऊन उत्तम चंदन, अगरु, कापूर, गंध व पुष्पें यांनीं सवत्सगाईची षोडशोपचार पूजा करावी. नैवेद्य पायसाचा असावा. मोदक, अनरसे, गूळ, मीठ व जिरें हीं एका वेळूच्या विस्तीर्ण बळकट सुपांत घालून, तें सूप धेनूस द्यावें. व [ याप्रमाणें भरलेलीं ] सहा, आठ किंवा दहा सुपें सुवासिनींस द्यावीं. '**उपचारैः षोडशभिः**' याच्या पुढें '**पूजयेत्**' असा अध्याहार करावा. मोदकादिकांनीं भरलेलें एक सूप धेनूस देऊन वर सांगितलेल्या मोदकादि पदार्थांनीं भरलेलीं सहा, आठ किंवा दहा सुपें सुवासिनी स्त्रियांस द्यावीं, याप्रमाणें अर्थ समजावा. सर्वशास्त्रांत निपुण, धर्मवेत्ता, विद्या व विनय यांनींयुक्त, शांत, जितेंद्रिय, अलोभी, सर्वलोकांना प्रिय, व पातक रहित अशा ब्राह्मणास बोलावून त्याची वस्त्र, गंध, पुष्पें इत्यादिकांनीं भक्तीनें पूजा करावी. त्या ब्राह्मणांकडून आरंभापासून धेनू व वत्स यांची पूजा करवावी. नंतर समिधा आज्य व चरु यांचा मोठा होम करवावा.

पूजायां होमे च मन्त्रमाह । सोमोधेनुमिति मन्त्रं समुच्चार्य ततः पुनः। अस्य गौतम ऋषिः, सोमस्त्रिष्टुप्। विहितार्थे वि० । ॐ सोमोधेनुंसोमोअर्वंत० । सोमे विनियुक्ताया अप्यस्याः संयोगपृथक्त्वन्यायेन धेनुरपि देवता । होममुत्कटं कारयेदित्यभिधानात् समिदादिभिः प्रत्येकमष्टोत्तरसहस्रं कुर्यात् । धेनुदानमाह 'प्राङ्मुखायोपविष्टाय प्रदद्यात्तामुदङ्मुखः । मन्त्रेण तस्य विधिवत्पुच्छं हस्ते निधाय च' । दानमन्त्रमाह सार्द्धश्लोकद्वयेन 'धेनुर्याङ्गिरसां सत्रे प्रविष्टा सुरभेश्च या । दुहिता या तथा भानोरग्नेश्च वरुणस्य च १ । या वै गावः प्रवर्तन्ते वनेषूपवनेषु च। प्रीणन्तु ता मम गृहं पुत्रपौत्रप्रदाः सुखम् २। प्रयच्छन्तु दिवारात्रमविच्छेदं तथान्वये । एवं दत्त्वा तु तद्दानं प्रणिपत्य विसर्जयेदिति । इति वन्ध्यात्वहरसुवर्णधेनुदानम् ।

[ धेनूची ] पूजा करितेवेळीं व होमाचे वेळीं [ म्हणावयाचे ] मंत्र सांगतों. " सोमोधेनुं० " या मंत्राचा उच्चार करून नंतर 'अस्य गौतम ऋषिः सोमस्त्रिष्टुप्, विहितार्थे विनियोगः, असें म्हणून " ॐ सोमोधेनुंसोमोअर्वंतमाशुं० ' हा मंत्र म्हणावा." जरी या ऋचेचा सोमाविषयीं विनियोग सांगितला आहे तथापि संयोगपृथक्त्व* न्यायानें धेनूही या ऋचेची देवता होय. 'मोठा होम करवावा' असें म्हटलें आहे म्हणून समिधा, आज्य व चरू या प्रत्येकाचा अष्टोत्तरसहस्र १००८ होम करावा.[ आतां ] धेनूचें दान सांगतों. [कर्त्यानें] उत्तराभिमुख होऊन पूर्वेस मुख करून बसलेल्या ब्राह्मणास, त्याच्या हातांत [ गाईचें ] पुच्छ देऊन, पुढील मंत्रानें गाय द्यावी. " तो मंत्र अडीच श्लोकांनीं सांगतों. " धेनुर्याङ्गिरसां सत्रे प्रविष्टा सुरभेश्च या। दुहिता या तथा भानोरग्नेश्च वरुणस्य च। या वै गावः प्रवर्तन्ते वनेषूपवनेषु च। प्रीणन्तु ता मम गृहं पुत्रपौत्रप्रदाः सुखम्। प्रयच्छन्तु दिवारात्रमविच्छेदं तथान्वये " याप्रमाणें दान करून नमस्कार करून विसर्जन करावें. याप्रमाणें वंध्यात्व ( वांझपणा ) नाहींसें करणारें सुवर्णधेनूचें दान समाप्त झालें.

---

* 'दध्नेन्द्रिय कामस्यजुहुयात्' या श्रुतीनें शक्तीची इच्छा असल्यास दह्यानें होम करावा, असें सांगितलें आहे. दुसऱ्या श्रुतींत ' दध्ना जुहोति ' म्ह० दह्यानें होम करावा. यांत इच्छेचा संबंध न दाखवितां नित्यत्वानें दधिहोमाचें विधान सांगितलें आहे तेव्हां एकाच दधिहोमाला वरील दोन्हीं श्रुतींमुळें नित्यत्व व काम्यत्व येतें, यास संयोगपृथक्त्वन्याय म्हणतात. प्रस्तुतस्थलीं एकाच मंत्राचा विनियोग ' सोम व धेनु ' या दोन देवतांकडे, याच न्यायानें होतो. पू. मी. ४।३।३

यद्वा सूर्यारुणसंवादोक्तं कार्यम्। तद्यथा 'निक्षेपाहरणाच्चैव ह्यनपत्यः प्रजायत' इत्युपक्रम्य। अरुण उवाच। वृथा धनं गृहं धान्यमपुत्रं जन्म निष्फलम्। ममोपरि दयां कृत्वा प्रायश्चित्तं वदस्व मे। श्रीसूर्य उवाच। तीर्थयात्रा प्रकर्तव्या रेवातापीसमुद्भवा। एकेनापि हि वस्त्रेण दंपती स्नानमुत्तमम्। श्रवणं हरिवंशस्य ब्राह्मणोद्वाहनं खग। अष्टोत्तरशतं विप्रान् मिष्टान्नेन तु तर्पयेत्। ईशान इति मन्त्रेण जपं कुर्यात्सहस्रकम्। दशांशहोमसंयुक्तं कुर्याच्च विधिवत्ततः। पद्मैस्तु लक्षसंख्याकैः शिवं संपूज्य यत्नतः। स्वर्णधेनुः प्रदातव्या सवत्सा सुरभिस्तथा। घृतकुम्भं वैनतेय ब्राह्मणाय निवेदयेत्। एवं कृतेन वै तस्य ह्यपत्यं जायते कलाविति।

किंवा **सूर्य व अरुण** यांच्या संवादांत सांगितल्याप्रमाणें करावें. तें असें:— ठेव हरण केली असतां अपत्य होत नाहीं असा उपक्रम करून **अरुण** विचारतो. " ज्यास पुत्र नाहीं त्याचें धन, गृह, धान्य, व जन्म हीं निष्फळ होत. याकरितां मजवर दया करून त्याबद्दल प्रायश्चित्त सांग. **श्रीसूर्य सांगतो.** नर्मदा व तापी यांची स्त्रीपुरुषांनीं यात्रा करून एका वस्त्रानें स्नान करावें. किंवा हरिवंशाचें श्रवण करावें, अथवा ब्राह्मणाचा विवाह करावा. एकशें आठ ब्राह्मणांस मिष्टान्न घालून संतुष्ट करावें. '**ईशानः०**' या मंत्राचा एक हजार जप करावा. नंतर जपाच्या दशांशानें यथाविधि होम करावा. प्रयत्नानें लाख कमळांनीं शिवाची पूजा करून सुवर्णाची गाय व वत्सासह प्रत्यक्ष गाय [ ब्राह्मणास ] द्यावी. त्याचप्रमाणें, हे अरुणा, ब्राह्मणास घृताचा कुंभ द्यावा. कलियुगांत याप्रमाणें केलें असतां त्या मनुष्यास संतति होते. "

द्विविधस्याप्यस्य कर्मविपाककर्मणः कृच्छ्रादिप्रायश्चित्तपूर्वकमेवानुष्ठेयताया महार्णवादिसंमतत्वात्संक्षेपेण कृच्छ्रादिलक्षणान्युच्यन्ते। तत्र याज्ञवल्क्यः। एकभुक्तेन नक्तेन तथैवायाचितेन च। उपवासेन चैवायं पादकृच्छ्रः प्रकीर्तितः। यथा कथंचित् त्रिगुणः प्राजापत्योऽयमुच्यते। अत्रापस्तम्बः। सायं द्वाविंशतिर्ग्रासाः प्रातः षड्विंशतिः स्मृताः। चतुर्विंशतिरायाच्याः परे निरशनास्त्रयः। प्रातः पादं चरेच्छूद्रः सायं वैश्यस्य दापयेत्। अयाचितं च राजन्ये त्रिरात्रं ब्राह्मणे स्मृतमिति। पादकृच्छ्रविधावित्थं व्यवस्थामुक्त्वार्द्धस्य पादोनस्य च विनियोगे विशेषमाह। सायंप्रातर्विनार्द्धं स्यात्पादोनं नक्तवर्जितमिति।

( ११ ) याप्रमाणें कर्मविपाकाचा प्रतिकार होण्याकरितां जें दोन प्रकारचें कर्म सांगितलें तें कृच्छ्रादि प्रायश्चित्त करून नंतरच केलें पाहिजे असें **महार्णवादिग्रंथांत** सांगितलें असल्यामुळें संक्षेपानें **कृच्छ्रादिप्रायश्चित्तांची लक्षणें सांगतों.** त्याविषयीं **याज्ञवल्क्यः**—" [ प्रथम दिवशीं ] एकदां भोजन, [ दुसरे दिवशीं ] नक्त, [ तिसरे दिवशीं ] अयाचित अन्न भक्षण व [ चवथे दिवशीं ] उपवास, याप्रमाणें केलें असतां **पादकृच्छ्र** होतो. याचीच तीनदां आवृत्ति केली असतां **प्राजापत्यकृच्छ्र** समजावा. " याविषयीं **आपस्तंबः**—" नक्ताचे दिवशीं २२ ग्रास, एकभुक्ताचे दिवशीं प्रातःकाळीं ( दिवसा ) २६ ग्रास, अयाचिताचे दिवशीं २४ ग्रास, [ याप्रमाणें ग्रास घ्यावे ] व तीन दिवस उपोषण करावें. शूद्रानें **पादकृच्छ्र** करणें झाल्यास तीन दिवस एकभुक्त करावें, वैश्यानें तीन दिवस नक्त करावें, क्षत्रियानें तीन दिवस अयाचित अन्न भक्षण करावें व ब्राह्मणानें तीन दिवस उपोषण करावें. " याप्रमाणें **पादकृच्छ्राची** व्यवस्था सांगून **अर्धकृच्छ्र** व **पादोनकृच्छ्र** यांविषयीं विशेष सांगतो. " [वर जें आपस्तंबाच्या मतें कृच्छ्राचें लक्षण सांगितलें त्यापैकीं] एकभुक्त व नक्त हीं शिवाय करून ( अयाचित ३ व उपवास ३ केले असता ) **अर्धकृच्छ्र** होतो. व नक्त सोडून (एकभुक्त ३, अयाचित ३, व उपवास ३, केले असता) **पादोनकृच्छ्र** होतो, "

**याज्ञवल्क्यः । अयमेवातिकृच्छ्रः स्यात्पाणिपूरान्नभोजनः । कृच्छ्रातिकृच्छ्रः पयसा दिवसानेकविंशतिम् । द्वादशाहोपवासेन पराकः परिकीर्तितः । येषु नवदिनेषु भोजनं प्राप्तं तत्र पाणिपूरान्नं नियम्यते । पत्रपुटिकादिना ग्रासपरिमाणं कृत्वा, एकग्रासपर्याप्तं दुग्धमेकविंशतिदिनेष्वश्नीयात् । प्राजपत्योक्तद्वाविंशत्यादिसंख्यया वा । यावता प्राणधारणं भवति तावद्वेति मदनपारिजातः । पयोऽत्र पानीयम् । अब्भक्षः कृच्छ्रातिकृच्छ्र इति गौतमोक्तेरिति भवदेवः । गोमूत्रं गोमयं क्षीरं दधि सर्पिः कुशोदकम् । जग्ध्वा परेऽह्न्युपवसेत्कृच्छ्रं सान्तपनं चरेत् । पृथक् सान्तपनद्रव्यैः षडहः सोपवासकः । सप्ताहेन तु कृच्छ्रोऽयं महासान्तपनं स्मृतम् । तप्तक्षीरघृताम्बूनामेकैकं प्रत्यहं पिबेत् । एकरात्रोपवासश्च तप्तकृच्छ्र उदाहृतः ।**

**याज्ञवल्क्यानें**:—"हातांत मावेल इतकेंच अन्न खाल्लें असतां हाच '**अतिकृच्छ्र**' होतो. एकवीस दिवस फक्त दूध प्राशन केलें असतां '**कृच्छ्रातिकृच्छ्र**' व १२ दिवस उपोषण केलें असतां '**पराक**' होतो." [असें सांगितलें आहे.] ['**प्राजापत्य कृच्छ्र**' बारा

दिवसांनीं होतो ] त्यांपैकीं नऊ दिवस भोजन करावयाचें तें फक्त हातांत मावेल इतक्याच अन्नाचें करावें, असा या वचनांत नियम केला आहे. " द्रोणानें वगैरे ग्रासाचें परिमाण करून एका ग्रासाइतकें दूध, २१ दिवस भक्षण करावें किंवा प्राजापत्य कृच्छ्रांत सांगितल्याप्रमाणें २२ इत्यादि ग्रासांइतकें अथवा प्राणधारणास पुरेल इतकेंच दूध घ्यावें" असें **मदनपारिजात**ग्रंथांत सांगितलें आहे. वरील वचनांत **पय ह्म० उदक,** कारण, उदक भक्षण केल्यानें **कृच्छ्रातिकृच्छ्र** होतो असें **गौतमवचन** आहे, असें **भवदेव** म्हणतो. गोमूत्र, गोमय, दूध, दहीं, तूप व कुशोदक हीं [ एक दिवशीं ] भक्षण करून दुसऱ्या दिवशीं उपवास करावा म्ह० **सांतपनकृच्छ्र** होतो. पूर्वीच्या गोमयादिक सहा पदार्थांपैकीं एकेक पदार्थ एकेक दिवशी खाऊन शेवटीं उपोषण केलें असतां सात दिवसांत **महासांतपनकृच्छ्र** होतो. तापलेलें दूध, तूप व पाणी क्रमानें एकेक दिवस पिऊन एक दिवस उपवास करावा म्ह० **तप्तकृच्छ्र** होतो.

**अङ्गिराः। 'कपिलायां तु दुग्धायां धारोष्णं तु पयः पिबेत्। एष व्यासकृतः कृच्छ्रः श्वपाकमपि शोधयेत्' इति। तिथिवृद्ध्या चरेत्पिण्डान् शुक्ले शिख्यण्डसंमितान्। एकैकं ह्रासयेत्पिण्डं कृष्णे चान्द्रायणं चरन्। एतद्यवमध्यचान्द्रायणम्। कृष्णादिशुक्लान्तं तु पिपीलिकामध्यमित्युच्यते। बौधायनस्तु। चतुर्दश्यामुपोष्य केशादि वापयित्वा पर्वणि पञ्चदशग्रासनियमं कृत्वा चान्द्रायणमारभेतेत्याह।**

**अंगिराः**—कपिला गाईचें धारोष्ण दूध प्यावें, हा **व्यास**प्रोक्त **कृच्छ्र** चांडालासही शुद्ध करील.-चांद्रायण करणारानें शुक्ल पक्षीं एकेक तिथीस, मोराच्या अंड्या एवढा एका पासून आरंभ करून एकेक ग्रास वाढवीत जावा व कृष्ण पक्षांत एकेक कमी करावा. हें **यवमध्यचांद्रायण** होय. कृष्णपक्षापासून आरंभ करून शुक्लपक्षीं पूर्णिमेस समाप्ति केली असतां **पिपीलिकामध्य चांद्रायण** होतें. **बौधायन** तर चतुर्दशीस उपोषण व क्षौर करून पूर्णिमेस १५ ग्रासांचा नियम करून चांद्रायणास प्रारंभ करावा असें म्हणतो.

**अथ प्रत्याम्नायाः। अपरार्के। समिद्घृतहविर्धान्यं तिलान्वा मारुताशनः। हुत्वा द्वादशसाहस्रं गायत्र्या कृच्छ्रमाप्नुयात्। द्वादशैव सहस्राणि जपेद्देवीमुपोषितः। जलान्ते विधिवन्मौनी प्राजापत्योऽयमुच्यते। अन्नदानहिरण्येन द्वादशब्राह्मणान् शुचीन्। तर्पयेन्मारुताशी च श्रोत्रियान् कृच्छ्र उच्यते। उपोष्य श्रद्धया युक्तास्तिलपात्राणि धर्मतः। द्वादश ब्रह्मवादिभ्यः प्राजापत्येन तत्समम्।**

**स्वयमाहृत्य यो मूर्ध्ना तृणभारानुपोषितः। दद्याद्गोमण्डले कृच्छ्रो द्वादशैव न संशयः। भारो द्विसहस्रपलपरिमितः। प्राणायामशतं कृत्वा द्वात्रिंशोत्तरमार्तिषु। अहोरात्रोषितस्तिष्ठेत्प्राङ्मुखः कृच्छ्र उच्यते। नमस्कारसहस्राणि द्वादशैव दृढव्रतः गोविप्रपितृदेवेषु कुर्यात्कृच्छ्रत्रयं भवेत्।**

आतां **प्रत्याम्नाय** [ सांगतों ] **अपरार्कः**—"वायु भक्षण करून समिधा, घृत, हवीस योग्य धान्य, किंवा तीळ यांचा गायत्रीमंत्रानें १२००० होम केला असतां **कृच्छ्राचें** फळ प्राप्त होतें. उपोषण करून व मौन धरून, जलाजवळ यथाविधि १२००० गायत्रीचा जप केला असतां **प्राजापत्यकृच्छ्र** होतो. आपण स्वतः वायु भक्षण करून पवित्र व श्रोत्रिय अशा बारा ब्राम्हणांस अन्न व सुवर्ण यांनीं संतुष्ट करावें, म्ह० **कृच्छ्र** होतो. उपोषण करून १२ ब्रम्हवेत्त्या ब्राह्मणांस श्रद्धेनें यथाविधि तिलपात्रें दिलीं असतां **प्राजापत्यकृच्छ्र** केल्याप्रमाणें होतें. उपोषित राहून तृणाचा भारा स्वतः मस्तकावरून आणून गाईंस घातला असतां **१२ कृच्छ्र** होतात यांत संशय नाहीं." भार म्हणजे २००० पळें होतात. "संकटकालीं १३२ प्राणायाम करून उपोषित राहून अहोरात्र पूर्वेस तोंड करून उभें रहावें म्हणजे **कृच्छ्र** होतो. दृढ नियम धरून गाय, ब्राम्हण, पितर व देव, यांना १२००० नमस्कार घातले असतां **तीन कृच्छ्र** होतात.

**कौर्मे। तिलपात्रं त्रिधा प्रोक्तं कनिष्ठोत्तममध्यमम्। ताम्रपात्रं दशपलं जघन्यं परिकीर्तितम्। द्विगुणं मध्यमं प्रोक्तं त्रिगुणं चोत्तमं स्मृतम्। सर्वत्र यात्रायां कृच्छ्रसंख्यया योजनसंख्या स्यादिति उत्सर्गोक्तिः। स्मृत्यर्थसारे वसिष्ठः। गोमूत्रेण समायुक्तं यावकं चोपयोजयेत्। कृच्छ्रमेकाहिकं प्रोक्तं दृष्टमङ्गिरसा स्वयम्। निश्यासीनो दिवा तिष्ठेत् त्रिरात्रं मारुताशनः। प्राजापत्यं विजानीयात् कूष्माण्डैर्जुहुयात् घृतमिति। पराशरः। कृच्छ्रो देव्ययुतं चैव प्राणायामशतद्वयम्। पुण्यतीर्थेनार्द्रशिराः स्नानं द्वादशसंख्ययेति। माधवीये 'प्राजापत्यं चरन्विप्रो यद्यशक्तः कथंचन। अहानि पञ्च विप्राग्र्यान् भोजयेत्सम्यगीप्सितान्। एकमध्ययनं कुर्यात्प्राजापत्यमथापि वा। दद्यात् द्वादशसाहस्रं गवां मुष्टिं विचक्षणः,।**

**कूर्मपुराणांतः**—"तिलपात्र उत्तम, मध्यम व कनिष्ठ असें तीन प्रकारचें आहे. दहा पळभार ताम्रपात्र हें कनिष्ठ, याच्या दुप्पट ( २० पळभार ) मध्यम व तिप्पट ( ३० पळभार ) उत्तम होय." यात्रेमध्यें एक योजन ( चार कोस ) यात्रा केली

म्हणजे **एक कृच्छ्र** होतो, असा सामान्य नियम आहे. **स्मृत्यर्थसारांत वसिष्ठः**—गोमूत्रानें युक्त सातू भक्षण करावे, म्हणजे एका दिवसांत कृच्छ्र होतो. तीन दिवस वायुभक्षण करून, रात्रीं बसावें व दिवसां उभें असावें, नंतर कूष्मांड होम करावा. म्ह० **प्राजापत्यकृच्छ्र** होतो. " **पराशरः**—" दहा हजार गायत्रीचा जप, दोनशें प्राणायाम किंवा मस्तक आर्द्र ( ओलें ) ठेवून पुण्यतीर्थांत बारा वेळां स्नान, हीं **कृच्छ्रप्रमाणें** होत. " "**माधवग्रंथांतः**—प्राजापत्यकृच्छ्र करण्याविषयीं जो ब्राम्हण अशक्त असेल त्यानें पांच दिवस श्रेष्ठ ब्राम्हणांस उत्तम प्रकारचें इच्छाभोजन घालावें, किंवा वेदाचें एक पारायण करावें, अथवा गाईस १२००० मुठी [ गवत ] घालावें.

**चतुर्विंशतिमते । कृच्छ्रो देऽयुतं चैव प्राणायामशतद्वयम् । तिलहोमसहस्रं तु वेदपारायणं तथा । विप्रा द्वादश वा भोज्याः पावकेष्टिस्तथैव च । अन्या वा पावमानेष्टिः समान्याहुर्मनीषिणः । स्मृत्यर्थसारे 'रुद्रैकादशिनी कृच्छ्रो द्वादशांशो निवर्तनात्' । तत्र दशहस्तेन दण्डेन त्रिंशद्दण्डा निवर्तनमित्यस्य द्वादशांशभूमिदानेन कृच्छ्र इत्यर्थः । माधवीये । प्राजापत्यक्रियाशक्तो धेनुं दद्यात्पयस्विनीम् । धेनोरभावे दातव्यं तुल्यं मूल्यं न संशयः । मदनरत्ने ब्राह्मे । गवामभावे निष्कं स्यात्तदर्द्धं पाद एव वा । याज्ञवल्क्यः । निष्कं सुवर्णाश्चत्वार इति । एतत्परिमितं हेम रूप्यं वा । अत्यशक्तौ पादार्द्ध, तत्समं धान्यादि वा दद्यात् इति स्मृत्यर्थसारः। षडुपवासाः प्राजापत्यप्रत्याम्नायः। एकविप्रभोजनमुपवासश्चेति च। पक्षिवधे नक्तं रूप्यमाषकं वा दद्यादिति हारीतोक्तेः । रूप्यमाषकदानं नक्तस्येति शूलपाणिः ।**

**चतुर्विंशतिमतांतः**—" गायत्रीचा दहा हजार जप, २०० प्राणायाम, तिळांचा एक हजार होम, वेदाचें पारायण, बारा ब्राह्मणांस भोजन, पावकेष्टि किंवा पावमानेष्टि हीं **कृच्छ्रा** बरोबर आहेत असें **विद्वान्** म्हणतात. " **स्मृत्यर्थसारः**—रुद्राची एकादशनी किंवा निवर्तनाच्या बाराव्या हिश्शाइतकें [ भूमिदान ] हें **कृच्छ्रा** सारखें आहे. दहा हात म्ह० एकदंड व ३० दंड म्ह० एक निवर्तन होतें त्याच्या बाराव्या हिश्शाइतकी भूमि दिली असतां कृच्छ्र होतो असें समजावें. **माधवग्रंथांतः**—प्राजापत्यकृच्छ्र करण्याचें सामर्थ्य नसल्यास दुभती गाय द्यावी. धेनूच्या अभावीं तिची योग्य किंमत द्यावी. **मदनरत्नांत ब्रह्मपुराणांतील** वाक्यः—"धेनूच्या अभावीं निष्क किंवा अर्धानिष्क किंवा पावनिष्क [ द्यावा ]" निष्क म्ह० चारसुवर्ण असें **याज्ञ-**

**वल्क्य** म्हणतो. निष्क परिमाण सोनें किंवा रुपें. अगदींच अशक्त असेल त्यानें निष्काचा आठवा हिस्सा किंवा तितक्या किंमतीचें धान्य द्यावें असें **स्मृत्यर्थसार**-ग्रंथांत सांगितलें आहे. " सहा उपवास किंवा एका ब्राह्मणास भोजन घालून एक उपवास केला असतां प्राजापत्याचा प्रत्याम्नाय होतो. " असेंही सदर ग्रंथांत सांगितलें आहे. " पक्ष्याचा वध केला असतां नक्त [ करावें ] किंवा मासाभर रुपें द्यावें " असें **हारीतानें** सांगितलें असल्यामुळें मासाभर रुपें देणें हा नक्ताचा प्रत्याम्नाय होय असें **शूलपाणि** म्हणतो.

**षट्त्रिंशन्मते। धेनुः पञ्चभिराद्यानां मध्यानां त्रिपुराणिका। कार्षापणैकमूल्यादि कनिष्ठानां प्रकीर्तिता। द्वात्रिंशत्कृष्णलपरिमितं रजतं पुराणः। द्वात्रिंशत्पणिका गावो वत्सः पौराणिका भवेदिति च। यज्ञविषयमेतदिति शूलपाणिः कात्यायनः। द्वात्रिंशत्पणिका गावः दश कार्षापणा धेनाविति। षट्त्रिंशन्मते प्राजापत्ये तु गामेकामतिकृच्छ्रे द्वयं स्मृतम्। चतुर्विंशतिमते 'प्राजापत्ये तु गामेकां दद्यात्सान्तपने द्वयम्। पराके नव तप्तातिकृच्छ्रे तिस्रस्तु ताः स्मृताः। अष्टौ चान्द्रायणे ज्ञेयास्तिस्रो वा शक्त्यपेक्षया' शूलपाणिः। चान्द्रायणं तु कुर्वाणाः कुर्युः कृच्छ्रचतुष्टयम्। तथा 'चान्द्रायणपराकाभ्यां निष्कृतिं यो न शक्नुयात्। स करोत्यात्मशुद्ध्यर्थं प्राजापत्यस्य पञ्चकम्'। अत्र गुरुलघुपक्षाणां गुरुलघुकृच्छ्रादिभेदेन शक्ताशक्तभेदेन वा व्यवस्था। कृच्छ्रातिकृच्छ्रे धेनुचतुष्टयमिति भवदेवः।**

**षट्त्रिंशन्मतांत**:—" उत्तमांची धेनु पांच पुराणांची, मध्यमांची तीन पुराणांची व कनिष्ठांची एका कार्षापणाची समजावी. " ३२ गुंजाभार रुपें म्ह० एक पुराण समजावा. "३२ पणांची एक गाय व एक पुराणाचा वत्स होतो, " असेंही तेथें सांगितलें आहे. **शूलपाणीच्या** मतानें हा यज्ञविषयक [प्रत्याम्नाय] आहे. **कात्यायन**:— " ३२ पणांची किंवा १० कार्षापणांची गाय होते. " **षट्त्रिंशन्मतांत**:— प्राजापत्याबद्दल एक गाय व अतिकृच्छ्राबद्दल दोन गाई समजाव्या. " **चतुर्विंशतिमतांत**:—प्राजापत्याबद्दल एक गाय, सांतपनाबद्दल दोन, पराकाबद्दल नऊ, तप्तातिकृच्छ्राबद्दल तीन, चांद्रायणाबद्दल आठ किंवा शक्ति नसल्यास तीन याप्रमाणें द्याव्या. **शूलपाणि**:—" ज्यांस चांद्रायण करणें असेल त्यांनीं [ त्याबद्दल ] चार कृच्छ्र करावे. तसेंच चांद्रायण व पराक यांच्या योगानें [ पापाची ]

असमर्थ असेल त्यानें आपली शुद्धि होण्याकरितां पांच " या प्रकरणांत जे गुरु व लघु पक्ष सांगितले आहेत त्यांची व शक्ताशक्त भेदानें व्यवस्था समजावी ( म्ह० गुरुकृच्छ्रा समर्थ असेल त्याबद्दल गुरु पक्ष घ्यावा, दुसऱ्या विषयीं लघुपक्ष ..) " कृच्छ्रातिकृच्छ्रा बदल ४ गाई द्याव्या " असें **भवदेव** म्हणतो.

**अथ प्रायश्चित्तस्वीकारप्रकारः । पर्षदमुपवेश्य तस्यै धेनुवृषौ दत्वा, स्वपापं निवेदयेत् । पापं विख्यापयेत्पापी दत्वा धेनुं वृषं तथेति पराशरोक्तेः । महापातकादिष्वधिकं कल्प्यमिति मिताक्षरायाम् । विष्णुः । 'पादकृच्छ्रे वस्त्रदानं कृच्छ्रार्द्धे चैलकाञ्चनम् । पादहीने तु गामेकां कृच्छ्रे गोमिथुनं स्मृतम्' । अङ्गिराः । 'स चैलं वाग्यतः स्नात्वा क्लिन्नवासाः समाहितः । उपस्थाय ततः शीघ्रमार्तिमान् धरणीं गतः । गात्रैश्च शिरसा चैव न च किंचिदुदाहरेत्' । प्रदक्षिणीकुर्यादिति महार्णवे ।**

**आतां प्रायश्चित्त घेण्याचा प्रकारः**—सभा भरवून तिला गाय व बैल देऊन आपलें पातक सांगावें. कारण " गाय व बैल देऊन पातक्यानें आपलें पाप सांगावें " असें **पराशराचें** वचन आहे. " महापातकें इत्यादिकांमध्यें अधिक द्यावें " असें **मिताक्षरेंत** सांगितलें आहे. **विष्णुः**—" पादकृच्छ्र करणें असल्यास वस्त्र, अर्धकृच्छ्र करणें झाल्यास वस्त्र व सुवर्ण, पादोनकृच्छ्र करणें असल्यास एक गाय व कृच्छ्र करणें झाल्यास गाय व बैल [याप्रमाणें द्यावें]. " **अंगिराः**—" पश्चात्ताप झालेल्या मनुष्यानें सचैल स्नान करून वस्त्रें ओलीं असतांच एकाग्रचित्तानें, मौन धरून शीघ्र [ सभेपुढें ] येऊन साष्टांग नमस्कार करावा व कांहीं बोलूं नये. " " प्रदक्षिणा करावी " असें **महार्णवांत** सांगितलें आहे.

**सर्वे धर्मविवेक्तारो गोप्तारः सकला द्विजाः । मम देहस्य संशुद्धिं कुर्वन्तु द्विजसत्तमाः । मया कृतं महाघोरं ज्ञातमज्ञातकिल्बिषम् । प्रसादः क्रियतां मह्यं शुभानुज्ञां प्रयच्छत । पूज्यैः कृतः पवित्रोऽहं भवेयं द्विजसत्तमाः । मामनुगृण्हन्तु भवन्त इति वदेदित्याचारः । अङ्गिराः । वृद्धाः पृच्छन्ति किं कार्यमुपविश्याग्रतः स्थितम् । यदि चेद्रक्षसे सत्यं नियतं प्राप्स्यसे शुभम् । यद्यागतोऽस्यसत्येन न त्वं शुद्ध्यसि कर्हिचित् । एवं तैः समनुज्ञातः सर्वं ब्रूयादशेषतः । ततः पर्षदनुज्ञया**